**प्रकाशक** : अजीत सी. पटेल
दादा भगवान विज्ञान फाउंडेशन
1, वरूण अपार्टमेंट, 37, श्रीमाळी सोसायटी,
नवरंगपुरा पुलिस स्टेशनच्या समोर,
नवरंगपुरा, अहमदाबाद - 380009,
Gujarat, India.
**फोन :** +91 79 3500 2100, +91 9328661166/77



**प्रथम आवृत्ति** : 1000, मे, 2023

**भाव मूल्य** : 'परम विनय' आणि
'मी काहीच जाणत नाही', हा भाव!

**द्रव्य मूल्य** : 120 रुपये

**मुद्रक** : अंबा मल्टीप्रिंट
एच.बी.कापडिया न्यू हाइस्कूलच्या समोर,
छत्राल-प्रतापपुरा रोड, छत्राल,
ता. कलोल, जि. गांधीनगर-382729, गुजरात
**फोन :** +91 79 3500 2142

**ISBN/eISBN :** 978-93-91375-35-5

**Printed in India**

# त्रिमंत्र





नमो अरिहंताणं
नमो सिद्धाणं
नमो आयरियाणं
नमो उवज्झायाणं
नमो लोए सव्वसाहूणं
एसो पंच नमुक्कारो
सव्व पावप्पणासणो
मंगलाणं च सव्वेसिं
पढमं हवइ मंगलं ॥ १ ॥
ॐ नमो भगवते वासुदेवाय ॥ २ ॥
ॐ नमः शिवाय ॥ ३ ॥
जय सच्चिदानंद





## दादा भगवान कोण ?

जून 1958 संध्याकाळची अंदाजे सहाची वेळ, सुरत स्टेशनवर अलोट गर्दी होती. रेल्वेच्या प्लेटफॉर्म नंबर तीनच्या बाकावर बसलेल्या श्री अंबालाल मूळजीभाई पटेल रूपी देहमंदिरात नैसर्गिक स्वरूपात कित्येक जन्मांपासून व्यक्त होण्यासाठी आतूर असलेले 'दादा भगवान' संपूर्णपणे प्रकट झाले आणि निसर्गाने सर्जन केले अध्यात्माचे अद्‌भुत आश्चर्य! एका तासात त्यांना विश्वदर्शन लाभले! मी कोण? भगवंत कोण? जग कोण चालवित आहे? कर्म म्हणजे काय? मुक्ती कशाला म्हणतात? इत्यादी जगातील सर्व आध्यात्मिक प्रश्नांची रहस्ये संपूर्णपणे प्रकट झाली.

त्यांना प्राप्ती झाली तशी ते फक्त दोन तासात इतर मुमुक्षूनां सुद्धा आत्मज्ञानाची प्राप्ती करवित असत, त्यांच्या सिद्ध झालेल्या अद्‌भुत ज्ञान प्रयोगाद्वारे! त्याला अक्रम (क्रमविरहीत) मार्ग म्हटले जाते. क्रम म्हणजे पायरी पायरीने, क्रमाक्रमाने वर चढणे! अक्रम म्हणजे लिफ्ट मार्ग! शॉर्ट कट!

ते स्वत: प्रत्येकाला 'दादा भगवान कोण?' याबद्दलची फोड करून देताना म्हणायचे की, "हे दिसतात ते 'दादा भगवान' नाहीत. हे तर 'ए.एम. पटेल' आहेत. आम्ही ज्ञानी पुरुष आहोत आणि आत प्रकट झाले ते दादा भगवान आहेत. दादा भगवान तर 'चौदालोकाचे' नाथ आहेत, ते तुमच्यात पण आहेत, सर्वांमध्ये आहेत! तुमच्यात अव्यक्त रुपात आहेत आणि 'येथे' माझ्या आत संपूर्णपणे व्यक्त झालेले आहेत! मी स्वत: भगवान नाही. माझ्या आत प्रकट झालेले 'दादा भगवान' यांना मी पण नमस्कार करतो."

## आत्मज्ञान प्राप्तीची प्रत्यक्ष लींक

परम पूज्य दादा भगवान (दादाश्री) यांना 1958 मध्ये आत्मज्ञान प्रकट झाले. त्यानंतर 1962 ते 1988 पर्यंत देश-विदेश परिभ्रमण करून मुमुक्षुंना सत्संग आणि आत्मज्ञानाची प्राप्ती करवित असत.

दादाश्रींनी आपल्या हयातीतच आत्मज्ञानी पूज्य डॉ. नीरूबहन अमीन (नीरूमा) यांना आत्मज्ञान प्राप्त करवून देण्याची ज्ञानसिद्धी प्रदान केली होती. दादाश्रींच्या देहविलयानंतर नीरूमा त्यांच्याप्रमाणेच मुमुक्षुंना सत्संग व आत्मज्ञान प्राप्ती निमित्त भावाने करवित असत.

आत्मज्ञानी पूज्य दीपकभाई देसाई यांना सुद्धा दादाश्रींनी सत्संग करण्याची सिद्धी प्रदान केली होती. वर्तमानात पूज्य नीरूमांच्या आशीर्वादाने पूज्य दीपकभाई देश-विदेशात निमित्तभावाने आत्मज्ञान प्राप्ती करवित आहेत.

या आत्मज्ञान प्राप्तीनंतर हजारो मुमुक्षु संसारात राहून, सर्व जबाबदाऱ्या सांभाळत असताना सुद्धा आतून मुक्त राहून आत्मरमणतेचा अनुभव घेत आहेत.

# निवेदन

ज्ञानी पुरुष संपूज्य दादा भगवान यांच्या श्रीमुखातून अध्यात्म आणि व्यवहारज्ञाना संबंधीत जी वाणी निघाली, तिला रेकॉर्ड करून संकलन व संपादन करून पुस्तकाच्या रूपाने प्रकाशित केले जात आहे. विभिन्न विषायांवर निघालेल्या सरस्वतीचे अद्‌भुत संकलन ह्या पुस्तकात झाले आहे, जे नवीन वाचकांसाठी वरदान रूप सिद्ध होईल.

प्रस्तुत अनुवादामध्ये विशेष लक्ष ठेवलेले आहे की प्रत्येक वाचकाला दादाश्रींची प्रत्यक्ष वाणीच ऐकली जात आहे असा अनुभव व्हावा. याच कारणाने कदाचित काही ठिकाणी अनुवादाची वाक्य रचना मराठी व्याकरणानुसार त्रूटीपुर्ण जाणवेल, परंतु तिथे जर आशय समजून वाचण्यात आले तर अधिक लाभदायी होईल.

प्रस्तुत पुस्तकात काही ठिकाणी कंसात दर्शविलेले शब्द किंवा वाक्य दादाश्रींद्वारा बोलल्या गेलेल्या वाक्यांना अधिक स्पष्टतापूर्वक समजावण्यासाठी लिहिले गेले आहेत. तसेच काही ठिकाणी इंग्रजी शब्दांना मराठी अर्थाच्या रूपात ठेवले गेले आहेत. दादाश्रींच्या श्रीमुखातून निघालेले काही शब्द जसेच्या तसेच *इटालिक्स* मध्ये ठेवलेले आहेत, कारण त्या शब्दांसाठी मराठी भाषेत असे शब्द नाहीत की जे त्याचा पूर्ण अर्थ देऊ शकतील. तरी पण त्या शब्दांचे समानर्थी शब्द कंसात तसेच पुस्तकाच्या शेवटी पण दिले गेले आहेत.

ज्ञानींच्या वाणीला मराठी भाषेत यथार्थ रूपाने अनुवादित करण्याचा प्रयत्न केला आहे. परंतु दादाश्रींच्या आत्मज्ञानाचा आशय जसा आहे तसा तर आपल्याला गुजराती भाषेतच अवगत होईल. ज्यांना ज्ञानाचा गहन अर्थ समजून घ्यायचा असेल, ज्ञानाचे खरे मर्म समजायचे असेल त्यांनी ह्या हेतूने गुजराती भाषा शिकावी असा आमचा अनुरोध आहे. अनुवादासंबंधी उणीवांबद्दल आपले क्षमा प्रार्थी आहोत.

❖❖❖❖❖

# दादा भगवान फाउन्डेशनची प्रकाशित मराठी पुस्तकें

1. भोगतो त्याची चूक
2. एडजस्ट एवरीव्हेर
3. जे घडले तोच न्याय
4. संघर्ष टाळा
5. मी कोण आहे ?
6. क्रोध
7. चिंता
8. प्रतिक्रमण (सं, ग्रं)
10. भावना सुधारे जन्मोजन्म
11. कर्माचे विज्ञान
12. पाप-पुण्य
13. आई-वडील आणि मुलांचा व्यवहार (सं)
14. पति-पत्नीचा दिव्य व्यवहार (सं)
15. समजपूर्वक प्राप्त ब्रह्मचर्य (सं)
16. मानव धर्म
17. मृत्युवेळी, आधी आणि नंतर
18. सेवा-परोपकार
19. दान
20. त्रिमंत्र
21. वर्तमान तीर्थंकर श्री सीमंधर स्वामी
22. चमत्कार
23. सत्य-असत्याचे रहस्य
24. वाणी, व्यवहारात (सं)
25. पैशांचा व्यवहार (सं)
26. क्लेश रहित जीवन
27. निजदोष दर्शनाने... निर्दोष!
28. प्रेम
29. गुरू-शिष्य
30. अहिंसा
31. आप्तवाणी-1 ते 5
36. आत्मसाक्षात्कार
37. जगत् कर्ता कोण ?
38. कर्माचा सिद्धांत

# हिन्दी

1. आत्मसाक्षात्कार
2. ज्ञानी पुरुष की पहचान
3. सर्व दु:खों से मुक्ति
4. कर्म का सिद्धांत
5. आत्मबोध
6. मैं कौन हूँ ?
7. पाप-पुण्य
8. भुगते उसी की भूल
9. एडजस्ट एवरीव्हेयर
10. टकराव टालिए
11. हुआ सो न्याय
12. चिंता
13. क्रोध
14. प्रतिक्रमण (सं, ग्रं)
16. दादा भगवान कौन ?
17. पैसों का व्यवहार (सं, ग्रं)
19. अंत:करण का स्वरूप
20. जगत कर्ता कौन ?
21. त्रिमंत्र
22. भावना से सुधरे जन्मोंजन्म
23. चमत्कार
24. प्रेम
25. समझ से प्राप्त ब्रह्मचर्य (सं, पू, उ)
28. दान
29. मानव धर्म
30. सेवा-परोपकार
31. मृत्यु समय, पहले और पश्चात्
32. निजदोष दर्शन से... निर्दोष
33. पति-पत्नी का दिव्य व्यवहार (सं)
34. क्लेश रहित जीवन
35. गुरु-शिष्य
36. अहिंसा
37. सत्य-असत्य के रहस्य
38. वर्तमान तीर्थकर श्री सीमंधर स्वामी
39. माता-पिता और बच्चों का व्यवहार (सं)
40. वाणी, व्यवहार में... (सं)
41. कर्म का विज्ञान
42. सहजता
43. आप्तवाणी - 1 से 9
52. आप्तवाणी - 13 (पूर्वार्ध व उत्तरार्ध)
54. आप्तवाणी - 14 (भाग-1 से 3)
56. ज्ञानी पुरुष (भाग-1)
57. आप्तवाणी - 12 (पू)

## ( सं - संक्षिप्त, ग्रं - ग्रंथ, पू - पूर्वार्ध, उ - उत्तरार्ध )

**★ दादा भगवान फाउन्डेशन द्वारे गुजराती आणि इंग्रजी भाषेत सुद्धा बरीच पुस्तके प्रकाशित झाली आहेत. वेबसाइट www.dadabhagwan.org वर सुद्धा आपण ही सगळी पुस्तके प्राप्त करू शकता.**

**★ प्रत्येक महिन्यात हिन्दी, गुजराती आणि इंग्रजी भाषेत दादावाणी मेगेझीन प्रकाशित होत आहे.**

# समर्पण

''दादांची आप्तवाणी करते समर्पण,
आंतरशत्रुंचे बनले हे दर्पण.

अविरत वेदली आधी-व्याधी-उपाधी,
आप्तवाणींच्या शब्दांनी प्राप्त समाधी.

दादांच्या विश्वकल्याणाच्या वाटेत,
दीप प्रज्वलित करी वाणी प्रत्येकात.''

# संपादकीय

तत्त्वज्ञानाच्या अतिशय गहन गोष्टी ऐकण्यात आणि वाचनात अनेकदा आल्या आहेत. तळाशी राहून अनेक लोकांनी जीवनाच्या ध्येयाच्या शिखराकडे अंगुलीनिर्देश केला आहे! व्यवहारात ''काय सत्य, काय असत्य, चोरी म्हणजे काय, अचौर्य म्हणजे काय, परिग्रह म्हणजे काय, अपरिग्रह म्हणजे काय, तसेच 'हेय' (त्याज्य) काय आणि 'उपादेय' काय?'' या सगळ्यांचे वर्णन मोठमोठ्या ग्रंथांच्या रूपात प्रकाशित झाले आहे. परंतु असत्य, हिंसा, चोरी आणि परिग्रह हे का हेय आहेत, याचा मूळ आधार काय, हे कुठेही पाहायला मिळत नाही. काही मर्यादेपर्यंत त्याबद्दलही काही थोडे विचक्षण ज्ञानी सांगून गेले असतील, परंतु जीवनातील सामान्यातील सामान्य घटनांमध्ये देखील कषाय सूक्ष्मरूपाने कसे काम करतात याचा स्फोट या कलियुगात जर कोणी केला असेल तर तो फक्त 'अक्रम विज्ञानी' परमकृपाळूश्री दादाश्री यांनीच! त्यांच्या द्वारे प्रकट झालेल्या 'अक्रम विज्ञाना'त आत्मा, अनात्मा, आत्मा-अनात्मा या विषयीचे ज्ञान, त्याचप्रकारे विश्वकर्ता, जगतनियंता अशा गुह्य विज्ञानांचे प्रकटीकरण तर आहेच, पण त्याचबरोबर ते सर्वांना ग्रहण करता यावे आणि प्रत्यक्ष जीवनात त्याचा अनुभव व्हावा असे गुप्त व्यवहारज्ञान प्रकाशमान व्हावे असे लक्ष्य प्रस्तुत ग्रंथात ठेवण्यात आले आहे. वात्सल्यमूर्ती पूज्य दादाश्रींची वाणी प्रवचन, व्याख्यान किंवा उपदेशात्मक रूपाने वाहत नाही. जिज्ञासू, मुमुक्षु किंवा विचारवंत यांच्या हृदयातून वास्तव जीवनात उद्‌भवणाऱ्या प्रश्नांचे सर्व प्रकारे समाधान करणाऱ्या 'टेप'चे हे विज्ञान आहे! त्यात काही विवेचन नाही, किंवा लांबलचक कंटाळवाणी भाषणेही नाहीत! प्रश्नांची प्रत्युत्तरे बुद्धीला छिन्न-भिन्न करणारी आणि हृदयाच्या मर्माला भिडणारी असल्यामुळे त्यातून आत्मदर्शन फलित होते. हीच या महान स्वानुभवी 'ज्ञानी पुरुषां'ची अपूर्व खुबी आहे!

'ज्ञानी पुरुष' विश्वाची ऑब्जर्वेटरी (वेधशाळा) मानले जातात. हजारो लोकांच्या अनेक प्रश्नांची अचूक उत्तरे या ऑब्जर्वेटरीतून अगदी सहजपणे तात्काळ बाहेर पडतात, मग ते प्रश्न तत्वज्ञानाचे असोत, जीवन व्यवहाराचे असोत किंवा पशु-पक्ष्यांच्या दिनचर्यांचे असोत!

एका महान तत्वज्ञानींनी परमपूज्य दादाश्रींच्या उत्तरावर आफरीन होऊन त्यांना विचारले, 'दादा, आपण सगळ्या प्रश्नांची उत्तरे कुठून देता?'

तेव्हा पूज्य दादाश्रींनी हसत-हसत म्हटले ''मी हे वाचलेले बोलत नाही, मी हे 'केवळज्ञाना'त पाहून बोलत आहे.''

तरी पण एका व्यक्तीने विचारले, 'दादा, आपण इतक्या साऱ्या प्रश्नांची उत्तरे देता, तरी पण त्यात कधी एकही चूक निघत नाही, याचे कारण काय आहे?'

तेव्हा पूज्य दादाश्रींनी सांगितले ''हे 'टेप'मधून निघते, म्हणून! जर 'मी' बोलायला लागलो तर चुकाच चुका होतील!''

संपूर्ण निरहंकारीपणाचे हे साक्षात् दर्शन आहे.

कारुण्यमूर्ती दादाश्रींचा कोणताही पंथ नाही, कोणताही पक्ष नाही, कोणताही संप्रदाय नाही; कोणाचे खंडन नाही, कोणाचे मंडन (स्थापना) नाही. त्यांच्याकडे कुठलीच गादी नाही, किंवा कोणी गादीपती नाही! त्यांच्याकडे तर फक्त हा एक कारुण्यभाव आहे की कशा प्रकारे या जगातील लोकांना त्यांच्या असह्य आर्ततेतून मुक्त करून आत्म्याच्या अनंत समाधीत लीन करता येईल! पुण्याच्या आधारावर जो त्यांच्याकडे पोहोचला आणि त्यांना ज्ञान-अवतारी पुरुष म्हणून ओळखले त्याचा बेडा पार झाला! नाहीतर साधे-सरळ, आणि कोट-टोपीच्या शृंगाराने सजलेल्या या भव्य आत्म्याला सामान्य दृष्टीने कसे काय ओळखता येईल? त्याला तर जवाहिऱ्याचीच दृष्टी पाहिजे!

परमकृपाळू दादाश्रींच्या श्रीमुखातून वाहिलेल्या वाणीची यथासमज संकलन, जनसामान्य समक्ष प्रकट करण्यामागील एकमेव अंतरआशय हाच आहे की जगातील लोकांनी त्यांना ओळखावे, त्यांच्या ज्ञानाचा अलभ्य लाभ मिळवावा आणि प्रत्यक्ष योग साधून आधी-व्याधी आणि उपाधीतही निरंतर समाधी दशा प्राप्त करावी. जी आमच्यासारख्या हजारो पुण्यात्म्यांना प्राप्त झाली आहे!

**- डॉ. नीरूबहन अमीन यांचे जय सच्चिदानंद**

# उपोद्घात

पाचही इंद्रिये आपल्या आपल्या धर्मात आहेत. मन-बुद्धी-चित्त-अहंकारदेखील आपल्या आपल्या धर्मात आहेत. मग धर्मात कोण चुकला? तर आत्मा. कान ऐकतात आणि स्वतः मात्र मानतो 'मी ऐकतो.' डोळे पाहतात आणि स्वतः मात्र मानतो 'मी पाहतो.' या प्रकारे प्रत्येक इंद्रियाच्या धर्माला आपला स्वतःचा धर्म मानतो. आत्म्याचा धर्म तर फक्त पाहणे, जाणणे आणि परमानंदात राहणे एवढाच आहे. त्याऐवजी स्वधर्म सोडून तो परधर्मात प्रवेश करतो. दुसऱ्यांच्या धर्माला आपला धर्म मानतो आणि स्वतःचा धर्म विसरून गेला आहे. आत्मानुभावी आत्मज्ञानी पुरुष स्वरूपाचे भान करवून देतात, त्यामुळे त्याला स्वतःच्या धर्माचे भान होते, त्यामुळे आपोआपच दुसऱ्यांच्या धर्माला आपले मानणे थांबतो. स्वधर्मात आला तर इथेच मोक्षाचा अनुभव होतो!

स्वतः जो नाही, त्याला मी आहे असे मानणे, ही मिथ्यादृष्टी - उलट दृष्टी.

स्वतः जो आहे, त्याला मी आहे असे मानणे ही सम्यक् दृष्टी - सरळ दृष्टी.

सांसारिक जाणण्याचा प्रयत्न करणे ते मिथ्याज्ञान आहे-अज्ञान आहे. श्रद्धा उलट आहे म्हणून ज्ञान उलटे मिळाले आहे आणि त्यामुळे उलट चारित्र्य उत्पन्न झाले. आत्म्याला जाणून घेतले ते सम्यक् ज्ञान आहे.

भाव हा चार्ज आहे आणि घटना घडते ती डिस्चार्ज आहे. चोरी करण्याचा भाव करतो तो चोरीचे (कर्म) चार्ज करतो आणि त्याचे फळ पुढील जन्मात येते. मग त्या आधारावर तो पुढील जन्मात चोरी करतो! तो डिस्चार्ज आहे. आणि जर त्याबद्दल पश्चात्ताप केला, प्रतिक्रमण केले, तर तो त्यातून सुटतो. अक्रम मार्गात भाव-अभाव या दोन्हींमधून मुक्त होतो आणि मग फक्त 'पाहाणे आणि जाणणे' एवढेच शिल्लक राहते!

प्रत्येक जीव प्रवाह रूपात आहे. प्रवाहात तो पुढे जात राहतो. त्यात कोणीही कर्ता नाही, जे कर्ता दिसतात ते नैमित्तिक कर्ता असतात, स्वतंत्र कर्ता नाहीत. जर स्वतंत्र कर्ता असते तर स्वतः कायम बंधनातच राहिला

असता. पण नैमित्तिक कर्ता बंधनात येत नाही. नैसर्गिकपणे संयोगाच्या धक्क्याने हे जग चालले आहे. यात फक्त 'मी केले' ही रॉंग बिलीफ – चुकीची मान्यता निर्माण होते, आणि त्यामुळे पुढील जन्माचे कर्मबीज पेरले जाते!

म्हणून अखा भगत यांनी म्हटले आहे,

'जर तू जीव तर कर्ता हरि, जर तू शिव तर वस्तू खरी!'
'कर्ता मिटला तर सुटतील कर्मे, हेच आहे महाभजनाचे मर्म.'

अज्ञान दशेत अनौपचारिक व्यवहारामुळे आत्मा द्रव्यकर्माचा कर्ता होतो. जो सचर आहे, तो 'मेकॅनिकल' आत्मा आहे, प्रकृती आहे आणि मूळ आत्मा अचल आहे. पूर्ण जग प्रकृतीला स्थिर करण्याचा प्रयत्न करते. जिचा मूळ स्वभावच चंचल आहे, ती कशी बरे स्थिर होईल? माझे आत्मस्वरूप अचल आहे आणि बाकीची सर्व प्रकृती चंचल आहे, आणि ती माझ्यापासून पूर्णपणे वेगळीच आहे, एवढेच फक्त समजून घ्यायचे आहे. मग प्रकृती प्रकृतीत राहील आणि आत्मा आत्म्यात राहील, भिन्नपणे!

शास्त्र वाचून मानतात की 'मला सर्व समजते.' उलट त्यामुळे तर अहंकार वाढला, मग तो जाणार कसा? 'ज्ञानी पुरुष' भेटले तरच ते काम होऊ शकते.

हा जो बंधनात आहे, तो कोण आहे? तर अहंकार, त्याचा मोक्ष करायचा आहे. आत्मा तर मुक्तच आहे. अज्ञानामुळे मानतो की 'मी बांधला गेलो आहे', ज्ञान होताक्षणीच तो मुक्त होतो! मग अहंकार निघून जातो. अहंकार गेला की मग 'मी करतो, तो करतो, आणि ते करतात,' ही मिथ्यादृष्टी नष्ट होते.

प्रकृती करते वाकडे तर तू कर आतून सरळ. प्रकृतीने क्रोध केला तर तू आतून प्रतिक्रमण कर. आपण आतून सुधारावे, मग प्रकृतीने जरी कितीही वाकडे केले तरी त्यासाठी तू 'जबाबदार' नाहीस. प्रकृती पूर्णपणे वेगळीच आहे, आणि तिला वेगळेच ठेवायचे. परक्या त्रासात आपण पडायचे नाही. प्रकृती अभिप्राय ठेवते आणि आपण अभिप्रायरहित व्हावे.

वीतरागींची पद्धत काय असते? 'हे चुकीचे आहेत, हे लोक चुका

करतात' असे म्हटले की पकडले गेलात! तिथे कोणताच अभिप्राय देता कामा नये. आपण आपली दृष्टी बिघडवायचीच नाही!

अक्रम विज्ञानात सर्वच मोकळीक दिली आहे. कुठेही कर्मे बांधली जाणार नाहीत याची दादा गॅरंटी देतात. फक्त एकच धोक्याची जागा दाखवितात, आणि ती म्हणजे बिन हक्काचे विषय!

द्वेष आणि अभाव यात खूप फरक आहे. अभाव म्हणजे 'डिस्‌लाइक' (नावड) ती मानसिक असते. ती तर ज्ञानी लोकांनाही असते, लाइक एन्ड डिस्‌लाइक (आवड किंवा नावड)! आणि द्वेष मात्र अहंकाराशी निगडित गोष्ट आहे. जे अभिप्राय बनवलेले आहेत, त्याच्या फलस्वरूप अभाव होत असतो. त्यासाठी प्रतिक्रमणे करावी लागतात, तर अभाव संपतो.

मनाला दाबायचे नसते. त्याला समजावून-उमजावून शांत करायचे असते.

संयमी व्यक्तीला यमराज पण वश असतात. म्हणजेच त्यांना मृत्यूचे पण भय नसते!

आठवण येणे म्हणजे परिग्रह. स्वरूपापासून दूर करतो तो परिग्रह.

अक्रम विज्ञानाने स्वरूपाची प्राप्ती होते, आणि ती क्रोध-मान-माया-लोभ यांना संपविते! व्यवहार शुद्ध होतो आणि सर्व जग ते व्यवहार पाहून आश्चर्यचकित होते! परम पूज्य दादाजींचा असाच व्यवहार पाहायला मिळतो. ते पाहूनच आपल्याला तसे शिकायला मिळते.

ज्ञान मिळाले की परम विनय तर आपोआपच उत्पन्न होतो! परम विनयामुळे मोक्ष मिळतो, क्रियांमुळे नाही. मंदिरांमध्ये विनय असतो. ज्ञानींपाशी परम विनय उत्पन्न होतो. त्यामुळे संसारात अभ्युदय आणि मोक्षासाठी आनुषंगिक, अशी दोन्ही प्रकारची फळे मिळतात!

ज्यांचा विनय करता, त्यांची निंदा करू नये.

ज्ञानी पुरुष फक्त भाव पाहतात, क्रिया नाही.

एखाद्याने एखाद्याला मारले तर ते प्रकृती करते, तो हिशोब आहे,

'व्यवस्थित' आहे. इत्यादी सर्व ज्ञानाची अवलंबने फर्स्ट स्टेजची आहेत, आणि अंतिम स्टेजमध्ये तर, मूळ स्वभावात तर तो मरतच नाही, आणि नाशवंत वस्तू तर नष्ट होतच राहतात. म्हणून जग निर्दोष आहे. मारतो तोही निर्दोष आहे, मरतो तोही निर्दोष आहे, आणि वाचवतो तोही निर्दोष आहे!

सर्व दु:खांचे मूळ अज्ञान आहे. अज्ञानामुळे कषाय आहेत. आणि हे कषायच रात्रं-दिवस दु:ख देतात!

ज्ञान मिळाल्यानंतर जप-तप-क्रिया वगैरे साधनांची गरज राहत नाही. फक्त ज्ञानींच्या आज्ञेतच राहायचे, तर मोक्ष होईल!

ज्ञानी भेटल्यानंतरच अंतरभेदन होते आणि तेव्हाच आतले सगळे दिसू लागते आणि त्यामुळे मुक्त होता येते.

आत्म्याच्या अनुभवाच्या गोष्टी ज्ञानींपासून ऐकून बुद्धी ग्रहण करते. पण ज्ञानींच्याजवळ बसून प्रत्यक्ष ऐकून बुद्धी सम्यक् झाली असेल तरच ती त्या गोष्टी ग्रहण करू शकते, नाहीतर त्या गोष्टी कानापर्यंतच थांबतात. ज्ञानींची वाणी परमात्म्याला स्पर्श करून निघालेली असते. म्हणून आवरणे तोडून ती समोरच्याला स्पर्श करते आणि मन-बुद्धी-चित्त-अहंकार सर्वच त्या गोष्टी ग्रहण करतात. आणि इतरांची वाणी मनाला स्पर्श करून निघत असते, म्हणून ती फक्त मनालाच स्पर्श करते.

अवस्थांमध्ये तन्मयाकार होतो, तेव्हा अस्वस्थ होतो आणि अविनाशी आत्म्यात राहिला तर कायम स्वस्थच राहील! आत्मा पौद्गलिक अवस्थेला जाणतो आणि आत्मा स्वत: स्वत:लाच पाहतो. म्हणून सगळी आवरणे तुटतात आणि सगळे काही शुद्ध होते!

ज्ञानी निरंतर देहापासून वेगळेच राहतात. त्याचे फक्त ज्ञाता-द्रष्टाच राहतात. म्हणून त्यांना कोणतेच दु:ख स्पर्श करत नाही. आत्म्याचा असा स्वभावच नाही की त्याला कसलेही दु:ख स्पर्श करील!

खूप त्रास सोसावा लागतो तेव्हा सर्व रात्रभर जागून जो इन्वेन्शन करतो (शोध घेतो) तो प्रगती करतो. गारव्यात (सुखात) पडून राहणाऱ्यांची प्रगती थांबते.

मोक्षाला जायचा अधिकार प्रत्येक जीवाला आहे. मात्र त्यासाठी ज्ञानींच्या शरणी जावे लागते.

या काळात 'अक्रम विज्ञान' ही मोक्षाची शेवटची गाडी आहे. जो कोणी या शेवटच्या संधीचा फायदा घेईल तो वेगाने मोक्षाला जाईल. नंतर मात्र हजारो वर्षे मार्ग मिळणार नाही.

स्वतःहून आयुष्यात कोणीही फेरलबद्दल करू शकत नाही. परिवर्तन करता येत नाही. मग ते संत असोत, महात्मा असोत, ज्ञानी असोत वा तीर्थंकर असोत.

मृत्यूच्या वेळी ज्याचे समाधीमरण होते, त्याला शरीराच्या यातना त्रास देत नाहीत. शेवटचा तास संपूर्ण समाधीत जातो, आणि ज्यांना अक्रम ज्ञान मिळालेले असेल त्या सर्वांना तर अंतिम समयी दादा प्रत्यक्ष दिसतात किंवा 'मी शुद्धात्मा आहे' हेच फक्त लक्षात राहते, शरीर वेगळेच वाटते, जो मरत आहे तो वेगळाच आहे असे जाणवते. मृत्यूच्या वेळी संपूर्ण आयुष्याचा हिशोब समोर येतो!

सिद्ध भगवंत सिद्धक्षेत्रातच असतात, केवळज्ञान स्वरूपच असतात. निरंतर परम सुखात असतात आणि साऱ्या बह्मांडाला प्रकाशित करतात.

'शुद्धात्म्याला पाहायचे' म्हणजे काय? या डोळ्यांनी तर ते दिसत नाहीत. उदाहरणार्थ एखाद्या डबीत किमती हीरा बंद करून ठेवला असेल तर मग सतत लक्षात राहते की 'या डबीत हीरा आहे, तो असा आहे' वगैरे. त्याच प्रमाणे ज्ञान मिळाल्यावर मन-बुद्धी-चित्त आणि अहंकार सर्वच 'मी शुद्धात्मा आहे आणि सगळ्यांच्यातही शुद्धात्माच आहे' हे स्वीकारतात. त्यानंतर मग शंका येत नाही.

ज्ञानींची आराधना करणे हे शुद्धात्म्याची आराधना करण्यासारखेच आहे. तीच परमात्म्याची आराधना आहे आणि तीच मोक्षाला कारणीभूत होते.

आत्मसुखाची अनुभूती म्हणजे काय? ती कशी काय समजते? आत्मसुखाचे लक्षण म्हणजे निरंतर निराकूळता असते. आकूळता-व्याकूळता

झाली तर आपण उपयोग चुकलो, असे समजावे. शाता वेदनीय (सुख-परिणाम) किंवा अशाता वेदनीय (दु:ख परिणाम) दोन्हींना जाणतो तो आत्म अनुभव.

शारीरिक दु:ख कोणाला होते? आत्म्याला नाही, देहाला होते. ते पण 'व्यवस्थित' आहे. वेदना होतात तेव्हा आपण असे हळुवार हात फिरवून 'चंदुभाईला' (स्वत:च स्वत:ला) म्हणावे 'तुमचे डोके खूप दुखत आहे का? आता कमी होईल, लवकरच!' आणि तिथे जर 'मला' दुखत आहे असे वाटले तर ते भूत पाठी लागेल. म्हणूनच आता 'डिक्शनरी' बदला. अशाता सुखदायी आणि शाता दु:खदायी. 'ही सर्व सुख-दु:खे शेजाऱ्याची आहेत' असे समजा.

स्वत:च स्वत:बरोबर, प्रकृतीबरोबर वेगळेपणाचा व्यवहार सुरू करा. स्वत: स्वत:पासून वेगळे राहून त्याच्याशी (चंदुलालशी) वार्तालाप करावा, क्षत्रियासारखे, तर प्रकृती संपत जाईल. चंदुभाईला आरशासमोर घेऊन जा आणि त्याच्या डोक्यावर हात फिरवून वार्तालाप करावा, दिलासा द्यावा.

ज्ञान-दर्शन-चारित्र्य आणि तप, असे चार आधारस्तंभ भगवंतांनी मोक्षासाठी सांगितले आहेत. उणोदरी हे सर्वात मोठे बाह्यतप आहे. आणि मोक्षासाठी अंतरतपाची गरज आहे. भयंकर वेदना होत असताना देखील 'आपण' होम डिपार्टमेंटमध्येच राहावे, स्व-परिणतीतच राहावे. पर-परिणती उत्पन्नच होणारच नाही, असे तप करायचे आहे! हे सर्व पर-परिणाम आहेत, हे माझे परिणाम नाहीत, अशा प्रकारे स्व-परिणामात ठामपणे राहणे तेच तप! आणि त्यामुळेच मोक्ष आहे. वेदना ही परक्याची आहे असे जाणले तर तसे (फक्त) जाणतच राहाल आणि 'मला वेदना होत आहे' असे जर वाटले तर मात्र त्या वेदनेचे वेदन करावे लागेल. आणि 'ही सहन होत नाही' म्हटले की त्या वेदना दहा पट अधिक वाटू लागतील. जसे बोलता तसा परिणाम होत जातो. अशा वेळी क्षत्रियासारखे वागावे लागते.

आत्म्याचा स्वभाव कसा आहे? जसे चिंतन करील लगेच तो तसा होतो. सुखमय चिंतन केले तर सुखमय होतो आणि दु:खमय चिंतन केले तर तो दु:खमय होतो. म्हणून दु:खमय चिंतन होणार नाही यासाठी सतत

जागृत राहावे. 'माझे डोके दुखत आहे' असे कधीच बोलू नये. तेव्हा तर असेच म्हणावे की 'चंदुभाई'चे डोके दुखत आहे! पर-भावात पर-परिणती उत्पन्न होता कामा नये. पर-परिणामाला स्व-परिणाम मानणे म्हणजेच पर-परिणती.

ज्ञानींना, तीर्थंकरांनादेखील अशाता वेदनीय असते. पण ते त्या वेदनीयला जाणतात, केवळज्ञानाने जाणतात.

चित्ताला स्वरूपातच ठेवायचे आहे, वेदनेत किंवा विनाशी वस्तूत नाही. चित्त जर अविनाशी वस्तूत राहिले तर ते झाले शुद्ध. मग तो विदेही झाला! निज शक्ती स्वक्षेत्रातच आहे. ती उत्पन्न झाली की काम झाले.

आठमुठेपणा कशाला म्हणतात? स्वत:ची चूक झाली असेल, तर ती स्वत:ला कळते. तरी पण जर कोणी त्याबद्दल विचारले की 'असे का केले?' तर तेव्हा म्हणतो 'तसेच करणे योग्य होते.' यालाच आडमुठेपणा म्हणतात. चूक कळली असूनसुद्धा तिला झाकत राहणे म्हणजे सर्वात मोठा आडमुठेपणा.

दोन प्रकारची बक्षीसे असतात. लॉटरी लागली तर तो एक प्रकार, खिसा कापला तर तो दुसरा प्रकार, दोन्हीही व्यवस्थितच आहेत.

ज्यांची गच्छ-मत संबंधी वाणी नाही, जे फक्त आत्म्यासंबंधीच बोलतात, ते ब्रह्मस्वरूप आहेत असे म्हटले जाते.

आत्मे अनंत आहेत. मोक्षात प्रत्येक आत्मा वेगळा वेगळाच आहे, आणि निरंतर स्व-सुखातच असतात.

पूर्ण जीवन व्यवहार गलन स्वरूप (डिस्चार्ज स्वरूप)च आहे आणि व्यवस्थितही आहे. पाचही इंद्रिये उदयाधीनच असतात.

कर्मबंध कशामुळे आहे? 'मी चंदुलाल आहे' ही मान्यताच कर्मबंधाचे मूळ कारण आहे. हे सर्व फक्त समजून घेण्याचीच गरज आहे. हे विज्ञान आहे.

विचार येवोत, त्रास देणारे येवोत, त्यांना वेगळे राहून पाहातच

राहायचे. विचार मनातून येतात. मन म्हणेल गाडीची टक्कर झाली तर? तेव्हाही आपण त्या विचारांना पाहतच राहायचे आणि आरामात गाडीत बसून राहायचे. मनाबरोबर तन्मयाकार व्हायचे नाही. जास्त दु:खे आली तर त्यांना सांगावे 'दादांकडे जा.'

संसारातून बाहेर पडू देत नाही, ती बुद्धी. बुद्धी नफा-तोटा दाखवते, मनस्ताप करविते. ज्ञानींपाशी अंतरदाह कायमचा बंद होतो! स्मयक् बुद्धी असेल तिथे गच्छ-मत वगैरे काहीच नसते! हे माझे, हे तुमचे असे वेगळेपण नसते!

आउटर बुद्धी (बहिर्बुद्धी) मेकॅनिकल आहे आणि इनर बुद्धी (अंतर बुद्धी) स्वतंत्र बनविणारी आहे. ती बुद्धी पण मेकॅनिकल आहे. मग कोणीच उपरी राहत नाही, तशी स्वतंत्र बनवते. मेकॅनिकल बुद्धीमुळे सांसारिक गोष्टी मिळतात.

'मी कोण आहे? मी कोणाच्या आधारावर आहे?' या आधार-आधारीची माहिती असणे आवश्यक आहे. या जगात काय करावे, काय करू नये, काय जाणावे आणि काय जाणू नये, एवढेच समजून घ्यायचे.

विरह म्हणजे अजिबात चैन न पडणे, असे असेल तरच संसारातून सुटता येते. ज्ञानींसाठी विरह वाटला पाहिजे. त्यामुळे आतमध्ये वीज उत्पन्न होते आणि 'स्वरूप' तेजस्वी होते! विरह ही तर फार उत्तम गोष्ट म्हटली जाते. ज्याला ज्ञानींचा दीर्घ काळाचा परिचय झाला असेल त्याला विरह वाटतो. ज्याला मोक्षाला जायचे आहे, त्याच्यात ही विरहाची वेदना उत्पन्न होते!

आपले मूळ स्वरूप सच्चिदानंद स्वरूप आहे. 'ज्ञानी पुरुष' रॉंग बिलीफ फ्रेक्चर करतात आणि राईट बिलीफ बसवतात. मग 'मी आत्मा आहे', याचे भान होते, ज्ञान होते आणि निरंतर त्याचे लक्ष राहते! त्यानंतर मग माया जाते आणि मोह जातो.

गौतम स्वामींना महावीर स्वामींबद्दल जो मोह होता, त्याला प्रशस्त मोह म्हणतात. प्रशस्त मोहामुळे संसाराचे सर्व मोह संपतात आणि निश्चितपणे मोक्ष मिळतो. जे मोक्षाला नेणार आहेत त्यांच्याबद्दल वाटणारा

मोह म्हणजे प्रशस्त मोह, तो हानीकारक नाही, तो तर मोक्ष मिळवून देईल. वेळ थोडा जास्त लागेल, पण त्याने काय फरक पडतो? वीतरागींबद्दल मोह, वीतरागता आणणाऱ्या गोष्टींबद्दल मोह, हा प्रशस्त मोह आहे.

जिथे शंका असते, तिथे चक्री वादळे निर्माण होतात! आणि मोक्षासाठी तर संपूर्ण नि:शंक व्हावे लागेल! आत्म्यासाठी संपूर्ण नि:शंक व्हावे लागेल. आणि जेव्हा ज्ञानी पुरुष ज्ञान देतात तेव्हाच तसा नि:शंकपणा प्राप्त होतो! मग नवीन कर्मे चार्ज होत नाहीत.

जर संसारात पुढे जायचे असेल तर बुद्धी मार्ग स्वीकारा आणि मोक्ष मिळवायचा असेल तर अबुध मार्ग स्वीकारा! जी बुद्धी विपरीत असते, ती ज्ञानींच्या सत्संगामुळे सम्यक् होते आणि ती मोक्षाला घेऊन जाते. संपूर्ण अबुध झाल्यावर केवळज्ञान होते! मोक्षाला जाण्यासाठी बुद्धी उपयोगी नाही.

आज्ञाशिवाय स्वच्छंद थांबत नाही आणि स्वच्छंदीपणा गेल्याशिवाय मोक्ष मिळत नाही. म्हणून ज्ञानींची आज्ञा हाच धर्म आणि तेच तप! आज्ञेची आराधना हाच मोक्षाचा उपाय आहे. योग साधनेने एकाग्रता होते. थोडा वेळ मन स्थिर होते. आणि योग जर अबॉव्ह नॉर्मल झाला तर मग तो महारोगीष्ट आहे. त्याने अहंकार वाढतो आणि परमात्मा दूर जातात.

साक्षीभाव अहंकाराने राहत असतो! कोणी शिव्या दिल्या, अपमान केला आणि जर वाईट वाटले, तर तो आत अहंकार असल्याचा पुरावा आहे. साक्षीभाव ही क्रमिक मार्गातील एक पायरी आहे. शेवटी तर ज्ञाताभावात आणि द्रष्टाभावात यायचे आहे.

आत्म्याच्या बाबतीत स्वत:च्या मतिनुसार वागणे यालाच स्वच्छंद म्हणतात. स्वच्छंदामुळे मार्गात अंतराय येतात.

आचरणात आणायचे नसते तर समजमध्ये खरे ज्ञान सेट करायचे असते. समजचे फळच आचरण आहे! समजले असेल पण आचरणात येत नाही तोपर्यंत त्याला दर्शन म्हणतात आणि जर आचरणात आले तर त्याला ज्ञान म्हणतात. ज्ञानीची आई कोण? तर समज. ती समज कुठे

मिळेल? ज्ञानींपासून. पूर्ण समज म्हणजे केवळ दर्शन, आणि आचरणात येते ते केवळज्ञान!

जिथे काही करायचे असेल तो मोक्षमार्ग नाही. जिथे फक्त समजायचे आहे तिथे मोक्षमार्ग आहे! मोक्षमार्ग सोपा आहे, सरळ आहे आणि सुगम आहे, आणि बिनकष्टाचा मार्ग आहे. म्हणूनच काम साधून घ्या.

'हे चुकीचे आहे' असे समजले तर मग ते आपोआप सुटते.जशी जशी समज पक्की होत जाते, तसेतसे ज्ञान परिणमित होत जाते. वर्तनात आले तर त्याला चारित्र्य म्हणतात. सम्यक् चारित्र्य लोकांना दिसू शकते, आणि केवळ चारित्र्य इंद्रियगम्य नसते, ते ज्ञानगम्य असते.

श्रद्धेच्या तुलनेत दर्शन उच्च समजले जाते. श्रद्धा बदलू शकते पण दर्शन कधी बदलत नाही. आणि आतमध्ये *सूझ* पडते (सुचते) ती नैसर्गिक देणगी आहे. अनेक जन्मांच्या अनुभवाच्या साररूपात *सूझ* मिळते.

दोन जण वार्तालाप करतात ते आख्यान आणि पूर्ण समूहासमोर बोलणे म्हणजे व्याख्यान.

अनुकूल परिस्थितीत सावध राहा. अनुकूलता घसरवू शकते आणि प्रतिकूलता जागृत ठेवते!

ज्या भावाने कर्मबंध पडतो त्याच भावाने *निर्जरा* (आत्मप्रदेशातून कर्म वेगळे होणे) होते. क्रूर भावाने बंध पडला असेल तर '*निर्जरा*' होताना क्रूर दिसतो.

शास्त्र ज्ञानाने निराकरण होत नाही, अनुभवज्ञानाने निराकरण होते. आणि अनुभव ज्ञान फक्त अनुभवी ज्ञानींकडूनच मिळते. शास्त्रे आपल्याला आपली चूक दाखवीत नाहीत. ते सर्वसाधारणपणे सर्वांना बोलतात. प्रत्यक्ष (ज्ञानी) असल्याशिवाय उपाय नाही. कागदावर काढलेले दिव्याचे चित्र अंधारात प्रकाश देईल का? कागदावर काढलेल्या दिव्याच्या चित्राएवढीच शास्त्रांची मर्यादा आहे. खरा प्रकाश तर प्रज्वलित दिवा, म्हणजे ज्ञानीच देऊ शकतात.

जिथे कषाय आहेत, तिथे परिग्रह आहे आणि अकषाय तर मोक्ष! अक्रमज्ञान मिळाल्यावर कषाय होत नाहीत, कारण इथे कर्मबंधने पडतच नाहीत. आत्मज्ञान झाल्यावर कषाय निघून जातात.

सत्संग कशासाठी करावा? तर एवढेच समजण्यासाठी की काहीही करू नका. जे परिणाम होतात, त्यांना पाहत राहा.

नियतीवाद म्हणजे संसारातील जीवांचा जो प्रवाह चालू आहे तो नियतीच्या नियमांनुसारच आहे, पण फक्त नियतीनेच सर्व पूर्ण होत नाही, तर काळ, स्वभाव, पुरुषार्थ, प्रारब्ध अशी इतर कारणे पण त्यात असतात.

आत्मज्ञान मिळते तेव्हा चित्त शुद्ध होते. शुद्ध चित्तच शुद्ध चिद्रूप आणि त्यालाच शुद्धात्मा म्हणतात. पूज्य दादाश्री जेव्हा ज्ञान देतात तेव्हा चित्त पूर्ण शुद्ध होते. म्हणूनच मग सतत 'मी शुद्धात्मा आहे' हे लक्ष राहते!

जेव्हा अहंकार निघून जातो, तेव्हा निराकूळता असते.

'मी चंदुलाल आहे' ही मान्यता प्रकृतीला आधार देते. 'मी शुद्धात्मा आहे' हे ज्ञान झाले की तो आधार सुटला. अर्थात निराधार होताच ती वस्तू पडली. अहंकार सुटला म्हणजेच अकर्ता झाला.

महाविदेह क्षेत्रात सीमंधर स्वामींच्याजवळ कसे जाता येईल? तर पूज्य दादाश्रींच्या पाच आज्ञा पाळल्यामुळे.

आत्मा आणि पुद्‌गल यात काय फरक आहे? आत्मा ही एकच वस्तू आपल्याजवळ आहे आणि पुद्‌गल परमाणू अनंत आहेत. पुद्‌गल विभाविक आहे आणि आत्मा स्वाभाविक आहे. पुद्‌गल सतत पूरण-गलन होत असते!

काहीही करायचे नाही, फक्त ज्ञानींचे कृपापात्र व्हायचे आहे. कृपापात्र होण्यात अडचण काय? तर आपला आडमुठेपणा.

द्रव्य बदलत नसते. भाव बदलले तर मुक्त होता येते. चोरी बंद केल्याने चोरी बंद होत नाही. पण चोरी करण्याचे भाव बदलले तर चोरी बंद होते! प्रतिक्रमण केल्यामुळे भाव बदलतात, आणि कर्म शुद्ध होऊन समाप्त होते.

सर्व जग अहंकार काढून टाकण्याच्या प्रयत्नात गुंतले आहे. दादाश्री म्हणतात, ''अहंकाररहित होण्याची गरज नाही. फक्त 'आपण कोण आहोत' हे समजण्याची गरज आहे. आपले जे मूळ स्वरूप आहे त्यात अहंकार नसतोच.'' तुम्ही चंदुभाई नाहीत, तरी पण 'मी चंदुभाई आहे' असे तुम्ही मानता, हाच अहंकार आहे.

आतमध्ये कषाय असतात, चीड असते, राग येतो, या सगळ्याचे कारण काय? तर अज्ञान. अज्ञानामुळे, अहंकारामुळे आतमध्ये राग-द्वेष होतच राहतात! म्हणजेच संसाराचे मूळ कारण अज्ञान हे आहे.

श्रीमंत कोण? जो मनाने राजा असतो तो. तो पैसे असतील तरी खर्च करतो आणि नसतील तरीही खर्च करतो. दर अकरा वर्षांनी पैसे बदलतात. अकरा वर्षात जर एक पण नवीन पैसा आला नाही, तर करोडपतींची संपत्तीसुद्धा संपेल! पूर्वीच्या काळी लोक संपत्ती कशी सांभाळत? संपत्तीचे ते चार भाग करत. 25 टक्के प्रॉपर्टी - मालमत्तेत गुंतवीत, 25 टक्के सोन्या-चांदीत, 25 टक्के व्याजावर लावत, आणि 25 टक्के व्यापारात घालत. ही त्यांची पद्धत होती, त्यामुळे त्यांचे कधीच दिवाळे निघत नसे!

जेव्हा खूप नुकसान होत असते तेव्हा समजावे की पापकर्मांचा उदय चालू आहे. म्हणून अशा वेळी जास्त माथेफोड न करता सत्संगाला जा, आत्म्याचे कर. अशा वेळी व्यापारात काही करायला जाल, तर सर्व उलटेच होईल.

जगातील लोक शरीराला चेतन म्हणतात. जे काम करतात, हिंडतात-फिरतात, त्यांना चेतन म्हणतात. परंतु खरे चेतन तर कोणतीच क्रिया करत नाही. पाहणे आणि जाणणे या दोनच क्रिया चेतनाच्या आहेत. बाकी सर्व अनात्म भागाचे आहे. बोलतो तोसुद्धा मिश्रचेतन आहे. मेकॅनिकल चेतन आहे. रियल चेतन नाही. मूळ स्वरूप तर स्थिर आहे, अचल आहे. बाकी सर्व चंचल आहे. मेकॅनिकलचा अर्थच चंचल, सचर असा आहे. आत्मा अचर आहे. जग सचराचर आहे.

चित्त शुद्ध झाले तोच अंतरात्मा आहे.

प्रथम शुद्धात्मा प्रतीतीमध्ये येतो, लक्षात येतो. त्यानंतर अनुभव पदात राहण्यासाठी 'शुद्धात्म्याशीच तन्मयाकार' राहायचे. परंतु जोपर्यंत कर्मे संपत नाहीत तोपर्यंत निरंतर शुद्धात्म्याशी तन्मयाकार राहता येत नाही. म्हणून त्याला अंतरात्मदशा, (इन्टरिम गर्व्हमेंट) म्हटले जाते. सर्व कर्मे संपली की तो परमात्मा होतो. शुद्धात्मा पद प्राप्त झाले की त्यानंतर सर्व वृत्ती निजभावात राहतात.

चित्ताला शुद्धात्म्यात ठेवा किंवा 'दादा भगवान' यांच्यात ठेवा या दोनही गोष्टी चित्त शुद्धच ठेवतील संसारात भटकणारे चित्त ते अशुद्ध चित्त म्हटले जाते. ते मिश्रचेतन आहे. आणि शुद्ध चित्त म्हणजेच शुद्धात्मा. 'मी शुद्धात्मा आहे' असे लक्ष बसले, म्हणजेच निजस्वरूपाचे भान आले, यालाच अंतरात्मदशा प्राप्त झाली असे मानले जाते.

चित्त आणि प्रज्ञा यात काय फरक आहे ? चित्त बाहेर भटकते. चित्त शुद्ध झाल्यावर मग ते भटकत नाही. प्रज्ञाशक्ती बाहेर जात नाही. प्रज्ञा तर मूळ आत्म्याचा एक भाग आहे. डायरेक्ट शक्ती आहे. ती ज्ञान आणि अज्ञान यांना कायम दूर ठेवते!

ज्ञानींकडून समज मिळाल्यावर मोहनीय कर्म पूर्ण समाप्त होऊ शकते. संघर्ष टाळा. पूर्वग्रहरहित झाला, तरच कल्याण होईल.

अक्रमज्ञान प्राप्त झाल्यावर 'मी शुद्धात्मा आहे' असा उपयोग राहायला हवा. 'सर्व जीवमात्रांत शुद्धात्मा आहे', असे दृष्टीत राहिले पाहिजे. मग ती व्यक्ती जरी आपला अपमान करणारी असो की खिसे कापणारी असो! आत्मा प्राप्त झाल्यानंतर प्रत्येकाला आपले पुद्‌गल खपवायचे आहे. प्रत्येकाला आपापल्या धर्माच्या पुद्‌गलाचे आवरण असते. जैनांचे जैन पुद्‌गल, वैष्णवांचे वैष्णव पुद्‌गल, हे पुद्‌गल त्यांना मोक्षाला जाण्यापासून अडविते. ते खपवल्यानंतरच मोक्ष होतो.

ज्ञानींना चारित्र्यमोह खूपच कमी असतो. आणि ज्ञानींच्या आश्रितांना तो कमी करण्याचे काम बाकी राहिलेले असते. जितक्या-जितक्या 'फाइल्स' पूर्ण होत जातात, तितका-तितका चारित्र्यमोह संपला, असे म्हटले जाते. शुद्ध उपयोगानेच चारित्र्यमोहाचा क्षय होतो.

कर्म क्रियेने बांधले जात नाही, तर ध्यानाने बांधले जाते. पाच लाखांच्या दानाने पुण्य मिळत नाही, तर ते दान देताना आत ध्यान कसले होते त्यावर ते अवलंबून असते. मेयरचा दबाव होता म्हणून, नाहीतर मी पाच रुपये पण दिले नसते! तर तो पाच रुपये पण न देण्याचे कर्म बांधतो!!! ध्यानाचा आधार काय आहे? तर आतील 'डेव्हलपमेंट' (प्रगती).

धर्म काय? अर्थ काय? काम आणि मोक्ष काय?

सांसारिक स्वार्थाला स्वार्थ म्हणतात. तिथून सुरू करून थेट परमार्थापर्यंतचा अर्थ, हा स्वार्थ आहे. आत्म्याबाबतचा स्वार्थ असेल तर तो परमार्थ. असे स्वार्थी तर फक्त आत्मज्ञानी पुरुषच असतात! सांसारिक स्वार्थाकडे घेऊन जाते ते सकाम आणि परमार्थाकडे घेऊन जाते ते अकाम. धर्म म्हणजे काय? संसारात भटकवतो, तो शुभधर्म आणि मोक्षात घेऊन जातो तो शुद्धधर्म. अधर्माला धक्का मारणे, तो शुभधर्म आहे. दान, पुण्य, सेवा, मदत, या सगळ्या गोष्टींनी पुण्य मिळते, तो रिलेटिव्ह धर्म आहे. आणि पाप-पुण्यापासून सोडवतो, तो रियल धर्म आहे. संसाराच्या सर्व बंधनातून मुक्त होणे आणि सिद्धगती प्राप्त करणे म्हणजे मोक्ष. मुक्तीची कामना असणाऱ्याला या जगात कोणी बांधू शकत नाही! या जगाचा कोणीच कर्ता नाही, भगवंत पण नाही. फक्त सायंटिफिक सरकस्टेन्शियल एविडेन्सेस्मुळे जग चालू आहे.

बाळकृष्णाच्या भक्तीमुळे वैकुंठ मिळतो. योगेश्वर कृष्णाच्या भक्तीमुळे आणि खऱ्या ज्ञानाच्या प्राप्तीमुळे मोक्ष मिळतो. श्रीकृष्णाने गीतेत 'मी' हा शब्द 'आत्म्या'साठीच वापरलेला आहे, देहधारी श्रीकृष्णासाठी नाही.

ध्यान दोन प्रकारचे असते : एक पौद्गलिक म्हणजे कुंडलिनीचे, गुरुचे, मंत्राचे वगैरे आणि दुसरे आत्म्याचे ध्यान. ते निर्विकल्प समाधीकडे घेऊन जाते.

निर्विकल्प म्हणजे विकल्परहित दशा, आणि निर्विचार म्हणजे विचाररहित दशा. ज्ञानी पुरुष सोडून निर्विकल्प दशा कुठेच पाहायला मिळत नाही!

सांख्य आणि योग, या दोन पंखानीच उडता येते. (फक्त एकाने नाही) सांख्य म्हणजे ज्ञान जाणणे. मन-वचन-काया, अंत:करण यांच्या धर्माला जाणणे, ते सांख्य. योगाशिवाय (गुरुंच्या) मानसिक पूजेशिवाय प्रगती होत नाही.

शिव म्हणजे कल्याण-स्वरूप. आधी-व्याधी आणि उपाधी या सर्वात समाधी राहणे ही खरी समाधी! ध्यानात जो प्रकाश दिसतो तो ज्ञेय आहे आणि त्याला जाणणारा आत्मा आहे, आणि आत्मा ज्ञाता आहे.

मनुष्य जीवनाचा हेतू मुक्ती प्राप्त करणे हा आहे! आणि त्यासाठी 'ज्ञानी पुरुषां'चा शोध घ्यावा, आणि ते भेटले तर काम होईलच! 'शुद्धात्मा' आणि संयोग अशा दोनच गोष्टी जगात आहेत, त्यातही संयोग हे वियोगी स्वभावाचे असतात. सर्व संयोग जर अर्पण केले तर मोक्ष होतो!

ज्याला आर्तध्यान आणि रौद्रध्यान होत नाहीत, त्याला तर दिवसभर सामायिकच असते. अक्रममध्ये निरंतर सामायिक राहू शकते. आर्तध्यान आणि रौद्रध्यान जात नसतील तर त्यासाठी 48 मिनिटे सामायिकमध्ये बसून आर्तध्यान आणि रौद्रध्यानापासून बिलकुल मुक्त राहावे, तर ती खरी सामायिक केली असे म्हणता येईल. त्यासाठी सामायिक करण्यापूर्वी प्रथम हा विधी करावा लागतो. 'हे भगवंत, मी चंदुलाल, माझे नाव, माझे शरीर, मी स्वत:, माझे मिथ्यापण सर्व काही तुम्हाला समर्पित करतो. आता सामायिक करत असताना मला वीतरागभाव द्यावा.'

जे तीर्थंकर होणार आहेत त्यांची लक्षणे कोणती? निरंतर जगत् कल्याणाची भावना! त्याशिवाय दुसरी कोणतीच भावना नसते. खाणे, पिणे, राहणे, झोपणे, जसे मिळेल तसे मिळो, तरी पण कल्याणभावना सतत जशीच्या तशीच राहते. ज्यांचे स्वत:चे संपूर्ण कल्याण झालेले असेल, तेच दुसऱ्यांचे कल्याण करू शकतात. तेच कल्याणाची भावना करू शकतात! आणि जे ज्ञानींच्या आज्ञेत निरंतर राहतात, त्यांच्या कृपेला पात्र होतात, ते त्या पायरीपर्यंत पोहोचू शकतात.

स्वास्तिक काय सूचित करते? त्याचे चार पंख चार गती सूचित करतात आणि मध्यभागी मोक्ष!

हे जे दिसतात, ते दादा भगवान नाहीत! तुम्हाला जे आठवतात ते खरे दादा आहेत. हे जे दिसतात ते तर ए. एम. पटेल आहेत आणि आतमध्ये बसले आहेत ते प्रकट परमात्म स्वरूप 'दादा भगवान' आहेत! देहधारीला भगवान म्हणू शकत नाही. देह हा तर नाशवंत आहे आणि परमात्मा तर पर्मनन्ट (शाश्वत) आहे. आमच्या आत व्यक्त झाले आहेत, दादा भगवान! सूरत स्टेशनच्या बाकावर 1958 साली!

संताचा व्यवहार शुभाशुभ असा असतो. ज्ञानींचा व्यवहार शुद्ध असतो. जो व्यवहार पूर्ण होत जातो, त्याला शुद्ध झाले असे म्हणतात. ज्ञानी पुरुषांना देहधारी परमात्माच म्हणतात! ज्यांच्यात एकही स्थूल चूक किंवा एकही सूक्ष्म चूक नसते, त्यांना ज्ञानी पुरुष म्हणतात.

जबरदस्त पुण्यानुबंधी पुण्य परिपक्व झाले तरच अशा ज्ञानी पुरुषांची भेट होते. या काळात असे ज्ञानी होऊन गेले आहेत, संपूज्य श्री दादाश्री! अनेक लोकांच्या मनात हा प्रश्न असतो की दादांचे ज्ञान प्राप्त तर करायचे आहे, पण पूर्वी जे गुरु केले आहेत त्यांचे काय? तर त्याबाबतीत पूज्य दादाजी इथे म्हणतात की त्यांना असू द्यावे. व्यवहारासाठी गुरु हवेत आणि मोक्षासाठी ज्ञानी हवेत. गुरु सांसारिक धर्म शिकवतात. त्यांना संत पुरुष म्हणतात. अशुभ सोडवतात आणि शुभ ग्रहण करवितात. तिथे आत्म्याची प्राप्ती होत नाही, आणि ज्ञानी पुरुष मोक्ष देतात, एका तासातच, तोही रोख!

भक्त आणि ज्ञानी यात काय फरक आहे? तर सेवक आणि सेव्य एवढा!

ज्ञानी जबरदस्त यशनाम कर्म घेऊन आलेले असतात. त्यामुळे लोकांची भौतिक कामेही होतात. पण त्यात ज्ञानी काहीच करत नाहीत.

ज्ञानींच्या अंगठ्यात अहंकार विरघळवणारे द्रावण असते आणि त्या जागेतून त्वरित तार पोहोचते. एक समय पण परसमयात राहत नाहीत, निरंतर स्वसमयात राहतात ते सर्वज्ञ! दादांकडे सर्व कर्मांचा अभाव असतो. पूज्य दादाश्री म्हणायचे की आम्हाला केवलज्ञानात फक्त चारच डिग्री कमी आहेत, काळाच्या कारणामुळे!

मोक्षमार्गात पात्रतेसाठी 'परम विनय आणि मी काहीही जाणत नाही', हा भाव पाहिजे. ज्ञानींचा अविनय स्वत:साठीच मोक्षमार्गात अडथळा निर्माण करतो.

ज्या गावी जायचे आहे, त्याचेच ज्ञान जाणण्यायोग्य आहे. त्या व्यतिरिक्त दुसरे काहीच आमंत्रित करायची गरज नाही. अक्रम विज्ञानात आरती, भक्ती वगैरेनां क्रिया म्हणत नाहीत. (कारण) त्यात स्वत: कर्ता बनत नाही. स्वत: वेगळा राहून सगळे करवून घेत असतो. म्हणजेच इथे कोणा व्यक्तीची भक्ती नाही, तर स्वत: स्वत:च्याच आत्म्याची भक्ती करत असतो. तो स्वत: तेव्हा प्रज्ञा स्वरूप असतो, अज्ञा तर इथे संपली आहे. संपूज्य दादाश्री स्वत: देखील स्वत:च्या आतील दादांना दोन्ही हात जोडून नमस्कार करून 'आत बसलेले दादा भगवान यांचा असीम जय जयकार होवो', असे म्हणवून घेत असत आणि सगळ्यांना पण आपल्या आपल्या आत असलेल्या 'दादा भगवान यांचा असीम जय जयकार होवो' म्हणायला सांगत! यालाच पराभक्ती असे म्हणतात! ऐकणारा आणि बोलणारा दोघेही सत्संग करतात, असे हे अक्रम विज्ञान आहे.

दादा भगवान कोण? ज्ञान, दर्शन, चारित्र्य आणि तप यांच्या आधारावर जे अनुभवाला येतात ते दादा भगवान आहेत. नाहीतर जे डोळ्यांना दिसतात, ते ए. एम. पटेल आहेत, एक दिवस हा बुडबुडा फुटेल. आत्मा सूक्ष्मतम आहे आणि देह स्थूल आहे. या देहाला एक दिवस लोक जाळतील. पण स्थूल सूक्ष्मला कसे काय जाळू शकेल? तसेच दादा भगवान, तुमच्या आमच्या सर्वांच्या आत विराजमान आहेत. ते 'चौदालोका'चे नाथ आहेत आणि ते तुम्ही स्वत:च आहात!!!

**–डॉ. नीरूबहन अमीन**

# अनुक्रमणिका

❖❖❖❖❖

# आप्तवाणी

## श्रेणी - 5

### आत्मा, आत्मधर्मात...

**दादाश्री :** आत्मा काय कार्य करतो?

**प्रश्नकर्ता :** आत्मा तर ज्ञाता-द्रष्टा आहे.

**दादाश्री :** पण तुम्ही तर म्हणता ना की 'मी ऐकतो आहे.' तुम्ही आत्मा आहात का ऐकणारे आहात?

**प्रश्नकर्ता :** 'मी आत्मा आहे.'

**दादाश्री :** पण आत्मा तर ऐकत नाही, कानच ऐकतात ना?

**प्रश्नकर्ता :** पुद्‌गलाचा आणि आत्म्याचा संयोग झाला आहे ना? (पुद्‌गल = ज्याची निर्मिती आणि नाश होतो, ते)

**दादाश्री :** पण आत्मा ऐकत असेल की कान?

**प्रश्नकर्ता :** आत्माच ऐकतो, कान तर जड आहेत.

**दादाश्री :** तर मग बहिऱ्याला बोलावून विचारा ना? बहिऱ्या माणसात आत्मा नाही का? तर मग कोण ऐकतो?

**प्रश्नकर्ता :** आत्मा नसेल तर पुद्‌गलाचे कोणतेच इंद्रिय काम करणार नाही.

**दादाश्री :** (आत्म्याच्या) उपस्थितीमुळेच तर याला जीवन

म्हणतात, पण कान ऐकतात की आत्मा? जर आत्मा ऐकू शकत असेल तर बहिऱ्या व्यक्तीला पण ऐकू आले असते. तर मग आता सांगा की 'कोण ऐकतो?'

**प्रश्नकर्ता :** कानाद्वारे ऐकू येते, परंतु जर चेतन तत्त्व असेल तर!

**दादाश्री :** पण चेतन तत्त्व तर कधीच काही ऐकत नाही. ते तर ज्ञाता-द्रष्टा आणि परमानंदी आहे! त्याच्यात अनंतज्ञान, अनंतदर्शन, अनंतशक्ती आणि अनंतचारित्र्य आहे. तर काय आत्म्यात ऐकण्याचा गुण आहे असे तुम्ही मानता का?

आत्मा ऐकतच नाही. आत्म्यामध्ये ऐकण्याचा गुण नाही. जसे या सोन्याला कधी गंज लागण्याचा गुण नाही, तसेच आत्म्यात ऐकण्याचा गुण नाही. आणि बोलण्याचाही गुण नाही.

**प्रश्नकर्ता :** पण चैतन्यतत्त्व असेल, तरच कान ऐकतील ना?

**दादाश्री :** चैतन्यतत्त्वाच्या हजेरीमुळेच हे सर्व जग चालू आहे. जर या शरीरात चैतन्यतत्त्व नसेल, आत्मा नसेल तर हे शरीरच संपून जाईल, पण ते चैतन्यतत्त्व हे काही ऐकत नाही.

**प्रश्नकर्ता :** तर मग कोण ऐकते, ते तुम्ही समजावून सांगा.

**दादाश्री :** ते तर समजून घ्यावेच लागेल ना? जर असे म्हटले की, आत्मा ऐकतो, तर मग आत्मा बोलतो, माझ्या आत्म्याचा आवाज बोलत आहे, असे पण बोलले जाईल. लौकिक भाषेत काहीही चालवता येईल, परंतु भगवंतांच्या अलौकिक भाषेत ते स्वीकारले जाणार नाही.

हा जो तुमच्याशी बोलत आहे, तो कोण बोलत आहे?

**प्रश्नकर्ता :** तुम्ही बोलत आहात.

**दादाश्री :** 'दादा भगवान' जर बोलत असतील तर हा 'टेपरेकॉर्डर' पण बोलत आहे आणि तो तर दोन हजार रुपयाला मिळतो, म्हणजे 'दादा भगवान' यांची किंमत दोन हजार झाली!!!

**प्रश्नकर्ता :** या बाबतीत तुम्ही जरा नीट समजावून सांगा.

**दादाश्री :** हे 'दादा भगवान' बोलत नाहीत, हा तर 'ओरिजिनल टेपरेकॉर्डर' बोलत आहे. हे 'अक्रम विज्ञान' आहे. कुठेही ऐकलेली नसेल अशी ही गोष्ट आहे!

हे जे ऐकतो, तो कानाचा धर्म आहे. एखादा बहिरा माणूस असेल तर आम्ही म्हणतो की कान त्यांच्या धर्मात नाहीत.

आता डोळ्यांचा धर्म काय आहे?

**प्रश्नकर्ता :** पाहणे.

**दादाश्री :** हो, आत्म्याचा धर्म पाहण्याचा नाही. नाकाचा धर्म काय?

**प्रश्नकर्ता :** वास घेणे.

**दादाश्री :** जिभेचा धर्म काय?

**प्रश्नकर्ता :** चव घेणे.

**दादाश्री :** म्हणून कसेही कडू जिभेवर ठेवले की ताबडतोब कळून येते. अर्थात ही पाचही इंद्रिये आपआपल्या धर्मात आहेत. आणि त्याच प्रकारे पाच ज्ञानेंद्रियेही आपआपल्या धर्मात आहेत. द्रव्येंद्रिये आणि भावेंद्रिये दोन्ही आहेत. द्रव्येंद्रिये जरी नष्ट झाली तरी आत भावेंद्रिये असतात. म्हणजेच पाच द्रव्येंद्रिये आणि पाच भावेंद्रिये, सर्व आपल्या आपल्या धर्मात असतात.

मन आपल्या धर्मात आहे की नाही?

**प्रश्नकर्ता :** ते समजत नाही.

**दादाश्री :** मन सतत विचार करीत असते. विचारांचे येणे-जाणे चालते तेव्हाच त्याला आपण मन म्हणतो. मन दोन प्रकारचे विचार करते. चांगले विचार पण करते आणि वाईट विचार पण करते. म्हणजेच

दोन्ही प्रकारचे विचार करणे हा मनाचा धर्म आहे आणि जर विचारच येत नसतील तर त्या व्यक्तीला आपण 'ॲबसेंट माइंडेड' असे म्हणतो. वेड्याला सुद्धा 'माइंड' (मन) असते, पण 'ॲबसेंट माइंडेड', म्हणून तर तो जीवयोनीत निकामा झाला, असे म्हणावे लागेल.

आता येथून तुम्हाला तुमचे सुरेन्द्रनगरचे घर दिसते की नाही?

**प्रश्नकर्ता :** हो, दिसते.

**दादाश्री :** आणि घरातील टेबल, खुर्च्या वगैरे सर्व दिसते का?

**प्रश्नकर्ता :** हो, दिसते.

**दादाश्री :** तो मनाचा धर्म नाही. पण लोकांना हे समजत नसल्यामुळे लोक त्याला मन समजतात. आता वास्तवात मन तिथे जात नाही, पण चित्त जाते. मन शरीराच्या बाहेर जाऊच शकत नाही. बाहेर जे भटकते ते चित्त आहे.

**प्रश्नकर्ता :** चित्त आणि मन, हे दोन्ही वेगवेगळे आहेत?

**दादाश्री :** हो, चित्त आणि मन हे दोन्ही वेगवेगळेच आहेत. लौकिक भाषेत काहीही बोलोत, पण भगवंतांची भाषा लोकोत्तर आहे. जोपर्यंत आपल्याला हे समजत नाही तोपर्यंत कधीही मोक्ष होणार नाही.

तर हे चित्त बाहेर भटकत असते. इथे राहूनसुद्धा चित्त तुमचे घर, टेबल, घड्याळ सर्व पाहू शकते, आणि मनाचा स्वभाव तर फक्त विचार करण्याचाच आहे. मन चांगले-वाईट विचार करते आणि चांगले पाहणे, वाईट पाहणे, हा चित्ताचा धर्म आहे.

**प्रश्नकर्ता :** चित्ताला जड म्हणावे की चेतन म्हणावे?

**दादाश्री :** ते मिश्रचेतन आहे, खरे तर ते शुद्ध चेतन नाही आणि मन तर बिलकुल जड आहे.

बुद्धी पण आपल्या धर्मात आहे. बुद्धीचे काम काय आहे? तर नफा आणि तोटा दाखविणे. तुम्ही गाडीत बसलात की बुद्धी लगेच

दाखविते की ती जागा चांगली आहे, आणि दुकानात गेलात तर तिथेही फायदा-तोटा दाखविते.

बुद्धी मला नफा-तोटा दाखवत नाही, कारण माझ्यात बुद्धी नाही, म्हणजे खूप कमी, अगदी नसल्यासारखीच आहे. 360 डिग्रीवर असलेल्याला संपूर्ण भगवान म्हणतात आणि हे 'पटेल' 356 डिग्रीवर आहेत. त्यांच्यात 4 डिग्री कमी आहे. म्हणून हे वेगळे झाले, नाहीतर 'यांना' पण 'महावीरच' म्हटले असते!

तर या बुद्धीचा धर्म नफा-तोटा दाखविणे आहे. गाडीत बसताना, कोणाशी सौदा करताना, किंवा कढीचे पातेले सांडले तर बुद्धी ताबडतोब आपला धर्म बजावते की नाही?

**प्रश्नकर्ता :** हो, बजावते.

**दादाश्री :** आता या व्यतिरिक्त बुद्धीचा आणखी एक धर्म आहे, तो म्हणजे बुद्धी 'डिसीजन' (निर्णय) घेते. पण निर्णय घेणे हा बुद्धीचा स्वतंत्र धर्म नाही. बुद्धी निर्णय घेते त्याच्यावर अहंकार सही करतो, तेव्हाच ती निर्णयप्रक्रिया पूर्ण होते. अहंकाराच्या सहीशिवाय तो निर्णय रूपकात येतच नाही.

म्हणजेच या अंत:करणात 'पार्लमेंटरी' पद्धत आहे. त्याचे चार 'मेम्बरस्' आहेत. मन, बुद्धी, चित्त आणि अहंकार. जर मन आणि बुद्धी एकत्र आले तर अहंकाराला सही करावीच लागते. चित्त आणि बुद्धी एकत्र आली तरी अहंकाराला सही करावी लागते. म्हणजेच यातील तीन ज्या पक्षात असतील त्यांची गोष्ट मान्य होते. ह्या सर्व संपूर्ण तत्त्वज्ञानाच्या गोष्टी आहेत. परंतु त्या तुम्हाला तुमच्या बुद्धीने समजल्या पाहिजेत.

तुम्हाला ज्ञान तर नाही ना?

**प्रश्नकर्ता :** ज्ञान तर आहेच ना!

**दादाश्री :** तुम्ही ज्ञान कशाला म्हणता?

**प्रश्नकर्ता :** ज्ञान म्हणजे समज.

**दादाश्री :** ज्ञान म्हणजे समज नाही. ज्ञान म्हणजे प्रकाश. जर तुमच्याजवळ प्रकाश असेल तर तुम्हाला कधीच ठोकर लागणार नाही. (काळजी, मतभेद, कषाय होणार नाहीत). ग्लास फुटो किंवा इतर काही होवो तरी पण तुमच्यावर त्याचा परिणाम होणार नाही. तुमच्यावर परिणाम होतो का?

**प्रश्नकर्ता :** हो, होतो.

**दादाश्री :** तर मग तो प्रकाश नाही. पूर्ण अंधारच आहे. आता अहंकाराचा धर्म काय आहे?

**प्रश्नकर्ता :** अहम्‌भाव राखणे हा.

**दादाश्री :** नाही. जिकडे पाहाल तिकडे अहम् 'मी केले' असे म्हणतो. बस! अहंकार, फक्त अहंकारच करत राहतो की 'मी केले, मी उपभोग घेतला!' आंबा खाल्ला तर त्या विषयाला जीभ उपभोगते, बुद्धी उपभोगते की अहंकार उपभोगतो?

**प्रश्नकर्ता :** अहंकार उपभोगतो.

**दादाश्री :** म्हणजे जीभ स्वाद घेते आणि अहंकार फक्त म्हणतो की, 'मी असे केले!' आत्म्यात अहंकार नावाची कोणतीच गोष्ट नाही, परंतु ही उत्पन्न झाली आहे. आणि ह्या सर्व गोष्टी आपापल्या धर्मातच आहेत. अहंकार करण्याच्या जागी निरंतर अहंकार करतच राहतो? कोणी अहंकाराला दुखावले, अपमान केला की लगेच अहंकार भग्न होतो ना? मान-अपमान या दोन्ही गोष्टींचा परिणाम होतो की नाही? म्हणजेच अहंकार अहंकाराच्या धर्मात आहे.

कान कानाच्या धर्मात आहेत, डोळे डोळ्यांच्या धर्मात आहेत, नाक नाकाच्या धर्मात आहेत. सगळे आपापल्या धर्मात आहेत. महावीर भगवंतांचे पण डोळे, कान, नाक सर्व आपापल्या धर्मात होते. त्यांचे पण मन मनाच्या धर्मात, चित्त चित्ताच्या धर्मात होते. मात्र त्यांची बुद्धी आणि अहंकार नष्ट झाले होते. तुमच्यात पण या सर्व गोष्टी आपापल्या धर्मात आहेत. फक्त 'आत्मा'च स्वत:च्या धर्मात नाही. 'आत्मा' जर

आपल्या स्वत:च्या धर्मात आला तर बुद्धी आणि अहंकार नष्ट होऊन जातील. त्याचे कारण मी तुम्हाला समजावून सांगतो.

आत्मा आणि बुद्धी यात फरक आहे की नाही? आत्मा हा प्रकाश आहे आणि बुद्धी पण प्रकाश आहे. बुद्धी 'इनडिरेक्ट' (अप्रत्यक्ष) प्रकाश आहे आणि आत्मा 'डिरेक्ट' (प्रत्यक्ष) प्रकाश आहे. 'इनडिरेक्ट' प्रकाश म्हणजे सूर्याचा प्रकाश आरशावर पडला आणि आरशातून स्वयंपाकघरात गेला, तो 'इनडिरेक्ट' प्रकाश. त्याचप्रमाणे आत्म्याचा प्रकाश अहंकारावर पडतो आणि तिथून बाहेर पडतो, त्याला आपण बुद्धी म्हणतो. आरशाच्या जागी अहंकार आहे आणि सूर्याच्या जागी आत्मा आहे. मूळ प्रकाशवान् आत्मा आहे. संपूर्ण स्व-पर प्रकाशक आहे. तो पर-ला पण प्रकाशित करतो आणि स्वत:ला पण प्रकाशित करतो. आत्मा सर्व ज्ञेयांना प्रकाशित करतो.

म्हणजेच अहंकाराच्या 'मीडियम' (माध्यम)ने बुद्धी उत्पन्न झाली आहे. अहंकाराचे 'मीडियम' संपले की बुद्धी पण संपते. मग 'डायरेक्ट' प्रकाश येऊ लागतो. मला 'डायरेक्ट' प्रकाश मिळतो. तुमचे आता काय करणे बाकी राहिले आहे? अहंकार आणि बुद्धी संपवणे बाकी राहिले आहे. आता या गोष्टी कशा संपतील? तर जेव्हा 'आत्मा' स्वत:च्या धर्मात येईल तेव्हा दोन्ही निघून जातील. बाकीचे सर्व तर आपापल्या धर्मातच आहेत, इतर काही बदलण्याची गरज नाही.

तर आता 'आत्म्याला' स्वत:च्या धर्मात आणण्यासाठी तुम्ही काय कराल? त्यासाठी काय साधने लागतील?

**प्रश्नकर्ता :** त्यासाठी राग-द्वेष कमी झाले पाहिजेत.

**दादाश्री :** ही (सोन्याची) अंगठी आहे. यात तांब्याचे मिश्रण आहे. आता जर आपण कोणालाही सांगितले की यातील सोने आणि तांबे वेगळे करून दे, तर त्याला ते करता येईल का?

**प्रश्नकर्ता :** नाही, करता येणार नाही.

**दादाश्री :** असे का?

**प्रश्नकर्ता :** ते तर सोनाराचेच काम आहे.

**दादाश्री :** दुसरे सर्व तर सांगतील की नाही, हे आमचे काम नाही. म्हणजेच जर आत्मा जाणून घ्यायचा असेल तर आत्म्याचे जाणकार हवेत.

**प्रश्नकर्ता :** 'सत् पुरुष' रूपी सोनार पाहिजेत.

**दादाश्री :** नाही, सत् पुरुष तर 'या' सर्व महात्म्यांना म्हटले जाते. सत् पुरुष म्हणजे तर ज्यांनी सत् प्राप्त केले आहे आणि जे पुरुषार्थ धर्मात आले आहेत, ते सत् पुरुष. सत् म्हणजे अविनाशी. सत् पुरुषांनी स्वत:चे अविनाशी पद प्राप्त केलेले असते. 'मी आत्मा आहे' अशी प्रतीती, जागृती झालेली असते. पण त्यांना सत् पुरुषच म्हणतात, 'ज्ञानी पुरुष' म्हणत नाहीत. 'क्रमिक' मार्गात सत् पुरुषासाठी त्यागात्याग संभव आहे, ज्ञानी पुरुषांना त्यागात्याग संभव नाही! 'ज्ञानी पुरुष' तर दुसऱ्यांना मोक्षाचे दान देतात! दुसऱ्यांना ज्ञानमय बनवितात!! श्रीमद् राजचंद्र यांनी 'ज्ञानीं'ना मोक्षदाता पुरुष म्हटले आहे. 'हे' सर्व मोक्षात राहतात हे खरे आहे, पण ते दुसऱ्यांना मोक्ष देऊ शकत नाहीत. त्यांना आत्म्याची प्रतीती आणि लक्षच बसलेले असते, आत्म्याचे अस्पष्ट वेदन असते. आणि यासाठी तर ज्यांना आत्म्याचे स्पष्ट वेदन झालेले आहे असे 'ज्ञानी पुरुष' हवेत. त्यांना जिथे-तिथे आत्म्याशिवाय इतर काही दिसतच नसते. त्यांना या जगात कोणी दोषी दिसतच नाही. खिसे कापणारा पण दोषी दिसत नाही आणि दान देणारा पण दोषी दिसत नाही. परंतु जर तुम्ही मला विचारले की 'या दोघांना सारखेच म्हणायचे का?' तर मी म्हणेन, 'जो दान देणारा आहे, तो जी क्रिया करत आहे, त्याचे फळ तो भोगेल आणि जो खिसे कापत आहे तो पण जी क्रिया करत आहे, त्याचे फळ तो भोगेल. पण यात दोषी कोणीच नाही.

**प्रश्नकर्ता :** दोषी का म्हटले जाणार नाहीत?

**दादाश्री :** ते सर्व संयोगानुसार करत असतात. चांगला करणाराही संयोगानुसार करत असतो आणि वाईट करणाराही संयोगानुसार करत असतो.

आत्म्याला आत्मधर्मात आणण्यासाठी मोक्षदाता पुरुषाची गरज पडेल.

कृपाळूदेवांनी आपल्या पूर्ण पुस्तकाचे सार असे सांगितले की, 'इतर काही शोधू नकोस, केवळ एका सत् पुरुषाला शोधून त्यांच्या चरणकमळांवर सर्व भाव अर्पण करून वागत जा. मग जर मोक्ष मिळाला नाही तर माझ्याकडून घेऊन जा.'

अर्थात आपल्याला जर मोक्ष मिळाला नाही तर ते 'ज्ञानी पुरुष' नाहीत.

**प्रश्नकर्ता :** आत्मा स्वत:च्या धर्मात आला याची खात्री काय?

**दादाश्री :** हे सर्व 'मी करत आहे' आणि 'हा मी आहे' अशा ज्या राँग बिलीफस् (चुकीच्या मान्यता) आहेत त्या संपतात. आता तर तुम्हाला 'मी चंदुभाई (चंदुभाईच्या जागी वाचकाने स्वत:चे नाव समजावे) आहे, या स्त्रीचा पती आहे, या मुलाचा बाप आहे, याचा मामा आहे, शेंगदाण्याचा व्यापारी आहे', अशा किती बरे चुकीच्या मान्यता असतील?

**प्रश्नकर्ता :** असंख्य.

**दादाश्री :** तर आता इतक्या साऱ्या 'राँग बिलीफस्' कधी जातील? आत्मा स्वत:च्या गुणधर्मात आला की या सर्व 'राँग बिलीफस्' निघून जातील. 'राँग बिलीफस्' निघून जातील आणि 'राइट बिलीफ' बसेल. 'राइट बिलीफ'ला सम्यक् दर्शन असे म्हणतात. 'ज्ञानी पुरुष' आत्म्याला त्याच्या धर्मात आणून ठेवतात, आणि इतर सर्व तर आपल्या आपल्या धर्मात आहेतच.

जेव्हा तुम्हाला तुमच्या आत्मधर्मात यायची इच्छा होईल तेव्हा तुम्ही इथे या. 'आम्ही' त्याला त्याच्या धर्मात आणू. आत्मा स्वत:च्या धर्मात आला तर इतर सर्व काही सुटते. चार वेद काय म्हणतात? 'दिस इज नॉट दॅट, दिस इज नॉट दॅट!' (हे ते नाही, हे ते नाही.) तू ज्या आत्म्याला शोधत आहेस तो वेदांमध्ये नाही. 'गो टु ज्ञानी' ('ज्ञानींकडे' जा). आत्मा पुस्तकात लिहिता येईल असा नाही, कारण आत्मा नि:शब्द आहे, अवर्णनीय आहे, अव्यक्तव्य आहे. तो शास्त्रात कसा सामावेल?

श्रीमद् राजचंद्रांनीही म्हटले आहे की ज्ञान ज्ञानींजवळ आहे आणि त्यांच्याशिवाय तुमची सुटका कधीच होऊ शकत नाही. म्हणजे यासाठी 'ज्ञानीं'चीच आवश्यकता आहे. चोवीस तीर्थंकर सांगत आले आहेत की आत्मज्ञानासाठी निमित्ताची गरज आहे. 'ज्ञानी' कर्ता नसतात. मी जर कर्ता झालो, तर कर्मबंधन पडेल आणि तुम्ही जर मला निमित्त मानलेत तर तुम्हाला पूर्ण लाभ मिळणार नाही. मी (स्वत:ला) 'मी निमित्त आहे' असे मानले पाहिजे आणि तुम्ही 'ज्ञानीं'कडून झाले असा विनय बाळगायला हवा! प्रत्येकाची भाषा वेगवेगळी असते ना?

परम विनयाने मोक्ष आहे.

आत्मा प्राप्त झाला, स्वत:च्या स्वभावात आला, जागृत झाला, स्वत:च्या धर्मात आला, मग उरलेच काय? इतर सर्व तर त्यांच्या त्यांच्या धर्मातच आहेत. फक्त आत्माच धर्मात नव्हता.

**प्रश्नकर्ता :** दादाजी, 'ज्ञान' मिळाल्यानंतर ही अट सर्वांनाच लागू होते का?

**दादाश्री :** 'ज्ञान' मिळाल्यानंतर तर आपोआपच मान्य होईल ना? ज्ञान मिळण्यापूर्वी कोणालाच मान्य होणार नाही. मग नंतर सर्वांना का मान्य होते ते मी तुम्हाला समजावून सांगतो. जिलेबी खाऊ घातल्यानंतर चहा पाजला तर त्यात काय फरक पडतो?

**प्रश्नकर्ता :** चहा अगोड लागतो.

**दादाश्री :** मी तुमच्या आत्म्याला त्याच्या स्वभावात, अर्थात त्याच्या स्वत:च्या गुणधर्मात आणतो. म्हणून मग तुम्हाला इतर सर्व विषय अगोड लागतात, त्यामुळे आसक्ती नष्ट होते. आणि जर त्या अगोदरच मी तुम्हाला आसक्ती दूर करा असे म्हटले तर?

**प्रश्नकर्ता :** तर मग इथे कोणी येणारच नाही.

**दादाश्री :** म्हणून प्रथम आत्म्याला आत्मधर्मात आणायला हवा. अक्रम मार्गात प्रथम हेच आहे. याउलट क्रमिक मार्गात प्रथम आसक्ती दूर करावी लागते.

**प्रश्नकर्ता :** म्हणजे अधर्म दूर करावा?

**दादाश्री :** अधर्म शब्दाची आपल्याला गरज नाही. अधर्म म्हणजे काय? तर तो धर्माच्या विरोधी शब्द आहे. वाईट करणे तो अधर्म आणि चांगले करणे हा धर्म. पण दोन्हीही कर्ताभावात आहेत आणि आत्म्याचा तर स्वाभाविक धर्म आहे, सहज धर्म आहे. आता आत्मा जर स्वत:च्या धर्मात आला, तर मग त्याची पत्नी असेल तिचे काय होईल? तिला काय हाकलून द्यायचे?

**प्रश्नकर्ता :** नाही, पण तिच्यावरची आसक्ती कमी करावी लागेल.

**दादाश्री :** त्यासाठी मग कर्ता व्हावे लागेल.

**प्रश्नकर्ता :** तर ते समजावून सांगा.

**दादाश्री :** आत्मधर्मात आल्यावर 'बाय रिलेटिव्ह व्ह्यू पॉइंट', 'तुम्ही चंदुभाई आहात, या स्त्रीचे पती आहात, या मुलाचे वडील आहात.' आणि 'बाय रियल व्ह्यू पॉइंट' तुम्ही शुद्धात्मा आहात.

'द वर्ल्ड इज द पझल इटसेल्फ, गॉड हॅज नॉट पझल्ड दिस वर्ल्ड ॲट ऑल.' (हे जग एक कोडे आहे, देवाने या जगाला कोडे बनवलेले नाही.) जर देवाने 'पझल' (कोडे) केले असते तर त्याला इथे बोलवावे लागले असते आणि शिक्षा द्यावी लागली असती की तू या लोकांना का अडचणीत टाकलेस? म्हणजेच देवाने या जगाला अडचणीत टाकलेले नाही.

'मी आत्मा आहे, मी आत्मा आहे' असे शब्द बोलून काहीही निष्पन्न होत नाही. त्यासाठी तर भगवंतांची कृपा प्राप्त करावी लागते, त्यानंतरच तुम्ही मोक्षगामी होता. आता इथे मोक्षगामी म्हणजे काय? या जन्मातून सरळ मोक्ष नाही. पण इथे अज्ञानातून मुक्ती होऊ शकते.

दोन प्रकारची मुक्ती : पहिली अज्ञान मुक्ती, अर्थात आत्मा आत्मभावात आला, ती! आणि दुसरी संपूर्ण देहमुक्ती, सिद्धगती मिळते, ती! इथून एकावतारी होता येते! अज्ञानमुक्तीचा फायदा काय? संसारी दु:खांचा अभाव जाणवतो.

मनुष्य काय शोधत असतो?

**प्रश्नकर्ता :** दु:खांचा अभाव!

**दादाश्री :** आत्मा स्वभावाने सुखीच आहे आणि त्यातून दु:खांचा अभाव झाला, मग काय बाकी राहिले?

**प्रश्नकर्ता :** आत्मा जाणण्यासाठी काही किल्ल्या तर असतील ना?

**दादाश्री :** किल्ल्या-बिल्ल्या असे काही नसते! ज्ञानींजवळ जाऊन म्हणावे, 'साहेब! मी अगदी मूर्ख, बेअक्कल आहे! अनंत जन्म भटकलो, पण आत्म्याचा एक अंश, एका केसाएवढाही आत्मा मला जाणता आला नाही. म्हणून आपण माझ्यावर कृपा करा आणि माझे एवढे काम करा!' बस, एवढेच करायचे आहे. 'ज्ञानी पुरुष' तर मोक्षाचे ज्ञान देण्यासाठीच आले आहेत.

आणि मग लोक आरडाओरडा करतात की व्यवहाराचे काय? आत्मा जाणल्यानंतर बाकी उरतो तो सर्व व्यवहारच. आणि 'ज्ञानी पुरुष' तर व्यवहाराचे ज्ञानदेखील देतात. पाच आज्ञा देतात, म्हणतात 'या पाच आज्ञा पाळ. जा, मग तुझा व्यवहार पण शुद्ध आणि निश्चय पण शुद्ध! मग सगळी जोखीम आमच्यावर.' मोक्षाचा अनुभव इथेच यायला हवा. इथेच जर अनुभवाला आला नाही तर तो खरा मोक्ष नाही. मला भेटल्यावर इथेच जर मोक्ष अनुभवाला आला नाही तर मग हे ज्ञानी खरे नाहीत आणि मोक्ष पण खरा नाही. मोक्षाचा अनुभव इथेच, या पाचव्या आऱ्यात (कालचक्राचा एक भाग) व्हायला हवा, इथेच या कोट-टोपीसह! तिथे अनुभवाला येईल याची काय खात्री?

**प्रश्नकर्ता :** आत्म्याचे वेगवेगळे प्रकार असतात का?

**दादाश्री :** नाही, आत्मा एकाच प्रकारचा असतो.

**प्रश्नकर्ता :** तर मग आत्म्याला राग-द्वेष होतात का?

**दादाश्री :** नाही. आत्म्याला राग-द्वेष होत नाहीत. तो तर विभाव उत्पन्न होत असतो. जे गुण स्वत:मध्ये नाहीत, अशा गुणांना विभाव

म्हणतात. आत्मा स्वतः स्वभावाने वीतरागच आहे. त्याच्यात राग-द्वेष हा गुणच नाही. पण भ्रांतीमुळे तसे वाटते.

**प्रश्नकर्ता :** हे जे जन्म-मरणाचे चक्र चालते, त्याचा आत्म्यावर परिणाम होण्यामुळे 'कॉजेस्' (कारणे) होतात, हे बरोबर आहे का?

**दादाश्री :** नाही, नाही. आत्म्यावर परिणाम होत नाही. आत्म्याचा स्वभाव बदलतच नाही. फक्त त्याला रॉंग बिलीफ'च बसते.

**प्रश्नकर्ता :** 'रॉंग बिलीफ' कशी काय बसते?

**दादाश्री :** स्वतःच्या स्वरूपाचे भान राहिले नाही, म्हणून या लोकांनी दुसरे भान बसवले आणि ते ज्ञान फिट झाले. मग लोक म्हणतात त्याप्रमाणे त्याची श्रद्धा बसली की खरोखरच 'मी चंदुभाई आहे' आणि सर्व लोक हे 'एक्सेप्ट' (मान्य) पण करत आहेत. असे करता करता ही 'बिलीफ' कोणत्याही प्रकारे तुटतच नाही. आत्म्यात तर काहीच बदल होत नाही. आत्मा तर एकदम शंभर नंबरी सोन्यासारखा शुद्ध राहतो. सोन्यात तांबे मिसळले म्हणून काय सोने बिघडले?

## मिथ्या दृष्टी आणि सम्यक् दृष्टी

**दादाश्री :** ही उलट दृष्टी आहे, मिथ्यादृष्टी आहे, त्यामुळेच ही दुःखे उत्पन्न झाली आहेत. आणि समकित म्हणजे सुलट (सम्यक्) दृष्टी. तुमची दृष्टी कधी सुलट झाली होती का?

**प्रश्नकर्ता :** नाही.

**दादाश्री :** पूर्ण संसारकाळ फिरून आलात, तरीही एक क्षणभर देखील दृष्टी सुलट झाली नाही. तुमचे नाव काय?

**प्रश्नकर्ता :** चंदुभाई.

**दादाश्री :** 'तुम्ही चंदुभाई आहात' ही खरी गोष्ट आहे का?

**प्रश्नकर्ता :** मिथ्यात्व वाटते, अहम्पद वाटते.

**दादाश्री :** तर मग तुम्ही कोण आहात?

**प्रश्नकर्ता :** ते समजत नाही.

**दादाश्री :** तर मग अजूनपर्यंत ते समजून का घेतले नाही?

**प्रश्नकर्ता :** 'मी कोण आहे?' असा प्रश्न नेहमी पडत असे पण त्याबद्दल कधी माहिती मिळत नसे.

**दादाश्री :** 'मी चंदुलाल आहे, या स्त्रीचा पती आहे, याचा बाप आहे, याचा मामा, काका', या सर्व 'रॉंग बिलीफस्' आहेत. ज्ञानी पुरुष तुमच्या या सर्व 'रॉंग बिलीफस्' 'फ्रेक्चर' करतात आणि 'राइट बिलीफ' बसवतात. तेव्हा आपल्याला समकित दृष्टी मिळाली असे म्हटले जाते.

## विपरीत ज्ञान - सम्यक् ज्ञान

यापूर्वी विपरीत ज्ञान जाणून घेण्यासाठी प्रयत्न होत होता विपरीत ज्ञानामुळे बंधनात अडकायला होते. आणि आता सम्यक् ज्ञान जाणून घेण्याचा प्रयत्न होत आहे. ते (ज्ञान) 'स्वत:'चे आहे त्यामुळे स्वतंत्र होता येते. विपरीत ज्ञान पण ज्ञान आहे, म्हणून जाणण्यात 'गोडी' वाटते, पण ते परावलंबी आहे, कोणाचे तरी अवलंबन घ्यावे लागते. आणि सम्यक् ज्ञान स्वत:ला स्वसुख देणारे आहे, स्वावलंबी आहे आणि स्वतंत्र करणारे आहे.

**प्रश्नकर्ता :** ज्ञान तर एकाच प्रकारचे असते ना? आत्माच ज्ञान आहे. तर मग विपरीत ज्ञान आणि सम्यक् ज्ञान हे वेगळे कसे असू शकतात?

**दादाश्री :** विपरीत म्हणजे ज्याची गरज नाही असे ज्ञान, लोक त्याच्या मागे लागले आहेत.

**प्रश्नकर्ता :** पण त्याला ज्ञान म्हणू शकतो का?

**दादाश्री :** ज्ञानच म्हणायचे ना? अज्ञान कशाला म्हटले आहे? कारण 'ते हितकारी नाही', म्हणून त्याला अज्ञान म्हटले आहे.

**प्रश्नकर्ता :** मग त्याला अज्ञानच म्हणायला हवे ना? ज्ञान म्हणता येणार नाही ना?

**दादाश्री :** जगाच्या दृष्टीने तर ते ज्ञानच आहे ना?

सांसारिक असे सर्व जाणण्याचा जो प्रयत्न आहे ते सर्व मिथ्याज्ञान आहे. उलटी श्रद्धा ठाम बसली आहे म्हणून उलटे ज्ञान उत्पन्न होते आणि उलटे चारित्र्य उत्पन्न होते. त्याचा स्वाद पण येतो आणि त्यामुळे दु:ख पण मिळते. ते राग-द्वेषवाले ज्ञान आहे आणि हे वीतरागी ज्ञान आहे. यात जाणण्या-पाहण्याबरोबर वीतरागता राहते. आणि त्यात जाणल्या व पाहिल्याबरोबरच राग-द्वेष होतात.

## द्रव्यचोर - भावचोर

मन हा मागच्या जन्माचा संकुचित फोटो आहे.

समजा एक माणूस 'ऑफिसर' आहे. त्याची बायको त्याला म्हणते तुम्ही लाच का घेत नाही? बाकी सर्व लोक तर घेतात आणि त्यांनी बंगले पण बांधलेत. असे वारंवार ऐकल्यावर तो मनात ठरवतो की ठीक आहे, आता मी पण लाच घेत जाईन!

पण मग लाच घेण्याआधीच तो थरथरतो आणि त्याच्याकडून लाच घेतली जाऊ शकत नाही. मन फक्त ठरवते की आता घेऊया. म्हणजेच त्याने भाव बदलले, पण आयुष्यभर त्याच्याकडून लाच घेतली जाऊ शकत नाही. कारण मन पूर्वीच्या ज्ञानाने बनले आहे. मन पूर्वीच्या ज्ञानाचे फळ आहे. आणि आता त्याने हे नवीन ज्ञान उत्पन्न केले आहे, की लाच घेतली पाहिजे, त्यामुळे तो पुढील जन्मी लाच घेऊ शकेल.

दुसरा एक ऑफिसर आहे तो या जन्मी लाच घेत आहे, पण त्याच्या मनात सतत असे भाव असतात की, 'मी लाच घेत आहे हे चुकीचे आहे. मी असे का करतो?' मग त्याच्याकडून पुढील जन्मी लाच घेतली जाणार नाही. आणि जो आज एक पैसा पण लाच घेत नाही, पण त्याच्या मनात मात्र लाच घेण्याचे भाव आहेत त्याला भगवंत पकडतात. तो पुढल्या जन्मी चोर बनेल आणि संसार वाढवेल.

**प्रश्नकर्ता :** आणि जो आज पश्चात्ताप करत आहे, तो सुटत आहे का?

**दादाश्री :** हो, तो सुटत आहे. म्हणजे तिथे निसर्गाकडे न्याय वेगळ्या प्रकारचा आहे. हे इथे जसे दिसते तसे तिथे नसते, ही गोष्ट तुमच्या लक्षात आली का?

**प्रश्नकर्ता :** म्हणजेच भाव पण घालवायला हवेत, असेच ना?

**दादाश्री :** भावच घालवायचे आहेत. भावाचीच सगळी भानगड आहे. वस्तूंची भानगड नाही. वास्तवात काय घडले याच्याशी भगवंतांना काहीही देणेघेणे नाही. भाव म्हणजे 'चार्ज' आहे आणि जे प्रत्यक्षात घडते ते फक्त 'डिस्चार्ज' आहे.

**प्रश्नकर्ता :** 'अक्रम ज्ञाना'त भावाचे स्थान काय आहे?

**दादाश्री :** 'अक्रम ज्ञाना'त तर भावही नाही आणि अभावही नाही. या दोनही गोष्टींपासून दूर झालो. भाव आणि अभावामुळे संसार उभा होतो, रिलेटिव्ह डिपार्टमेंट उत्पन्न होते. 'अक्रम विज्ञाना'मुळे भाव-अभाव नाहीसे होतात, त्यामुळे नवीन 'चार्ज' होणे बंद होते. आणि (पूर्वी) जे 'चार्ज' केले होते त्याचे आता 'डिस्चार्ज' होणे शिल्लक राहते. म्हणजे 'कॉजेस्' बंद झालेत आणि 'इफेक्टस्' बाकी आहेत. 'इफेक्ट' हा परिणाम आहे.

संपूर्ण जग परिणामातच भांडत आहे. नापास झाले त्याबद्दल कटकट करता कामा नये. अभ्यास करताना कटकट करायला हवी, की अरे बाबा, अभ्यास कर, अभ्यास कर! तेव्हा त्याला टोका, रागवा पण नापास झाल्यानंतर तर त्याला म्हणावे, 'ये बाळा, जेवायला बस!' सूरसागरात (बडोद्याचा एक तलाव) जीव द्यायला जाऊ नकोस.

**प्रश्नकर्ता :** कोणत्या चुकीमुळे असे भाव होतात? उदाहरणार्थ : लाच घेण्याचा भाव.

**दादाश्री :** ती तर त्याच्या ज्ञानाची चूक आहे. खरे ज्ञान काय आहे, त्याबद्दल त्याचा 'डिसीजन' (निर्णय) आलेला नाही. अज्ञान असल्यामुळे भाव होतात. कारण त्याला असे वाटते की या जगात जर मी असे केले नाही तर माझी काय दशा होईल? म्हणजेच त्याच्या

स्वत:च्या ज्ञानाबद्दलचा निश्चय पण ठाम नाही. स्वत:चे ज्ञान चुकीचे आहे हे तो जाणतो. आता, हे काही मोक्षाचे ज्ञान नाही. हे व्यवहारिक ज्ञान आहे. आणि ते 'टेम्परी'च (तात्पुरते) असते आणि ते संयोगवश सतत बदलत राहते.

## संसारप्रवाह

सर्व जीव प्रवाह स्वरूपी आहेत. नर्मदेचे पाणी जसे वाहत असते, त्यात आपण काहीच करत नाही. प्रवाहच आपल्याला पुढे नेत राहतो. मागच्या जन्मात नवव्या मैलावर होता. तिथे त्याने चांगली चांगली आंब्याची झाडे, आंबे, बदाम, द्राक्षे वगैरे पाहिली होती. चांगल्या बागा पाहिल्या होत्या. आता आज या जन्मात दहाव्या मैलावर आला. तेव्हा इथे सगळे वाळवंटासारखे दिसत आहे. म्हणून मग त्याला नवव्या मैलावरील ज्ञान त्रास देत राहते. तो या (10 व्या मैलावर) आंबे मागतो, द्राक्षे मागतो परंतु यातील काहीच कुठे मिळत नाही. या प्रकारे तो पुढे पुढे वाहतच जातो! हे सगळे नियतीचे काम आहे, पण नियती 'वन ऑफ द फेक्टर्स' आहे, स्वत: कर्त्याच्या रूपात नाही. कर्त्याच्या रूपात या जगात कोणीच नाही. तसे तर कर्त्याशिवाय हे जग बनलेलेही नाही. पण ते नैमित्तिक कर्ता आहेत. स्वतंत्र कर्ता कोणीच नाही. स्वतंत्र कर्ता असेल तर तो बंधनात येईल, नैमित्तिक कर्ता बंधनात येत नाही.

**प्रश्नकर्ता :** म्हणजे नैमित्तिक कर्त्यात जो कर्ता असतो तो 'मी निमित्त आहे' असे मानतो का?

**दादाश्री :** हो, 'मी निमित्त आहे' हे तर त्याच्या लक्षात असतेच. मला लोक म्हणतात की, 'दादा, तुम्ही असे केले, तुम्ही तसे केले', पण यामध्ये मी फक्त निमित्त आहे, हे मला माहीतच असते. जो कर्ता बनतो त्याला कर्मबंधन होते. तुम्ही कुठल्याही गोष्टीचे कर्ता बनता का?

**प्रश्नकर्ता :** सकाळपासून संध्याकाळपर्यंत कर्ताच बनत असतो.

**दादाश्री :** तुम्ही कर्ता आहात की नाहीत याची खात्री करायची आहे का?

**प्रश्नकर्ता :** हो.

**दादाश्री :** तुम्ही असे म्हणता की, 'रात्री दहा वाजता झोपून सहा वाजता उठायचे आहे.' मग पलंगावर पडून पांघरूण घेऊन तुम्ही काय काय योजना करत असता? नंतर एकाएकी तुम्हाला विचार येतो की आज अमक्या-अमक्याला पाच हजार रुपये दिले, पण वहीखात्यात त्याची नोंद करायची राहिली आहे. मग तुम्हाला झोप येईल का? जर झोप आपल्या हातात नाही तर दुसरी कोणती गोष्ट आपल्या हातात आहे? लवकर उठायचे असेल तर गजर लावावा लागतो ना?

**प्रश्नकर्ता :** हो.

**दादाश्री :** ते सुद्धा आपल्या हातात नाही! शौचाला जाण्याचेही आपल्या हातात नाही. आपल्या हातात काहीच नाही. हे सर्व तर आपोआपच नैसर्गिक रित्या चालत राहते. त्याच्याशी आपण 'ॲडजस्ट' होतो आणि म्हणतो की, 'मी हे करत आहे' ही प्रत्येक गोष्ट दुसऱ्या शक्तीच्या आधीन चालत असते. ईश्वर पण याचा कर्ता नाही आणि तुम्ही पण कर्ता नाही. तुम्ही याचे कर्ता आहात, असे तुम्ही मानता, हेच पुढल्या जन्माचे बीज आहे. एक ना एक दिवस हे सर्व समजायला हवे ना?

म्हणून अखा भगतने म्हटले आहे की,

*''कर्ता मिटे तो छूटे कर्म, ए छे महाभजननो मर्म'',*
*''जो तू जीव तो कर्ता हरि, जो तू शिव तो वस्तू खरी.''*

(कर्तेपण मिटले तर कर्म संपतील, हेच महाभजनाचे मर्म आहे. जर तू जीव आहेस तर कर्ता देव आहे आणि जर तू शिव आहेस तर मात्र ती गोष्ट खरी आहे.)

कुठल्याही जीवाला काहीही करण्याची शक्ती नाहीच, मग कशाला कर्ता बनून बसले आहेत? वास्तवात तर स्वपरिणामाचे कर्ता आहोत. परपरिणामाचा कोणी कर्ता असू शकतो का? जन्म झाला तेव्हापासून मृत्यूपर्यंत सर्व अनिवार्य आहे आणि ते सर्व परपरिणाम स्वरूप आहे. पण आपण त्याचे कर्ता आहोत असे मानतो, म्हणून पुढील जन्माचे बीज पडते.

## व्यवहार आत्मा : निश्चय आत्मा

अज्ञानदशेत आत्मा (व्यवहार-आत्मा) अनौपचारिक व्यवहाराने द्रव्यकर्माचा कर्ता आहे. अनौपचारिक व्यवहार म्हणजे ज्यात उपचार पण करावा लागत नाही, अशा व्यवहाराने द्रव्यकर्मांचा कर्ता आहे. आणि स्वरूपाचे भान झाल्यावर कायमस्वरूपी स्वपरिणामी आहे. यात तो काही विकृत झाला नाही. विकृती झाली तर तो बदलूनच जाईल, संपेल. एवढे जरी समजले तरी तुमचे काम होईल.

हा तर 'मी करतो' असे मानतो. अरे, तू इथे आहेसच कुठे? हा तर सचर आहे, 'मेकॅनिकल' (भौतिक) आत्मा आहे. त्याच्या आत अचर आहे तो शुद्धात्मा आहे. बाहेर प्रकृती आहे तो सचर विभाग आहे आणि आत्मविभाग अचर आहे. लोक सचरला स्थिर करण्याचा प्रयत्न करतात. प्रकृती तर मूळ स्वभावानेच चंचल आहे. क्षणभर देखील जग विस्मृत होईल असे नाही.

## कर्तेपणाचे मिथ्यात्व

शास्त्र तर सगळेच जाणतात, पण जाणत काय नाही? तर आत्मा! सारे काही जाणले पण आत्मा मात्र जाणला नाही. त्याला तर असेच वाटते की 'मी हे केले तरच होईल.' असे तो म्हणतो? अरे, मग निखाऱ्यांवर बस, आपोआप सर्व काही होईल. निखाऱ्यांवर बसल्यावर आपोआप फोड येतील, नाही का? अरे, हे दुसरे सगळे जाणलेस, त्यामुळे तर उलट 'इगोइजम' (अहंकार) वाढेल!

जो करतो, त्याला बंधन होते. जे जे काही केले ते सर्व बंधन आहे. त्याग करणे किंवा ग्रहण करणे, सर्व बंधनच आहे. घेतले तर द्यावे लागेल आणि दिले तर घ्यावे लागेल. एखाद्याला रुपये उधार दिले असतील तर आपण ते सोडू शकतो पण त्यागाचे फळ येते तेव्हा ते घ्यावेच लागते.

**प्रश्नकर्ता :** सर्व शास्त्रांचा हेतू तर आत्म्याचे दर्शन करणे हाच असतो ना? तर मग आत्म्याचे दर्शन का होत नाही? 'इगोइजम' का वाढत जातो?

**दादाश्री :** 'इगोइजम' वाढतो ते पण ठीक आहे. कारण तो 'डेव्हलपमेंट' (विकास) आहे. या कॉलेजात सगळ्यात शेवटी पी.एच. डी. होण्यासाठी जातात, पण काही लोकच पी.एच.डी होऊ शकतात. सगळे होत नाहीत. हळूहळू 'डेव्हलप्ड' होतात. 'इगोइजम' वाढतो ते पण बरोबरच आहे, त्यात जे अंतिम 'ग्रेड'चे दोन-चार असतात त्यांना 'ज्ञानी पुरुष' भेटतात तेव्हा ते पास होतात. तोपर्यंत असे करत करत ते पुढे जातात. प्रथम 'इगोइजम' उत्पन्न करतात. हिंदुस्तानाच्या बाहेर जो 'इगोइजम' आहे तो साहजिक 'इगोइजम' आहे. त्यांचा 'इगोइजम' कसा असतो? जिथे जायचे आहे तिथे जाण्यचा 'इगोइजम' करतात आणि जिथे जायचे नाही तिथे न जाण्याचा 'इगोइजम' करतात. आणि आपल्याकडे तर जिथे जायचे नाही तिथे जातात आणि जिथे जायला हवे तिथे मनाई करतात! आपल्याकडे असा विकल्पी 'इगोइजम' आहे. आणि त्यांचा साहजिक 'इगोइजम' आहे. गायी-म्हशींना असतो तसा. तिकडे चोरी करणारा चोरी करतो, बदमाशी करणारा बदमाशी करतो. आणि 'नोबल' असेल तो नोबलच राहतो. आणि आपल्याकडे तर नोबल पण चोरी करतो आणि चोरी करणारा पण नोबिलिटी दाखवतो. त्यामुळे हा देश म्हणजे मोठे आश्चर्यच आहे ना? हे तर 'इंडियन पझल' (भारतीय कोडे) आहे! ते 'पझल' कोणी सोडवू शकत नाही. परदेशी लोक डोके चालवून चालवून थकतात पण त्यांना याचे उत्तर मिळत नाही. चुलतभाऊ म्हणेल तुम्हाला गाडी देता येणार नाही, आज माझे साहेब येणार आहेत! अहंकार पूर्णपणे कपटवाला!

आणि ज्या काही क्रिया करतात, त्या सर्व बरोबर आहेत. त्या अहंकार वाढवितात आणि असे करत-करत सर्व अनुभव घेत घेत मग आत्मानुभव होतो.

**प्रश्नकर्ता :** मग अंतिम 'स्टेज'मध्ये अहंकार निघून जातो?

**दादाश्री :** मग त्याची ज्ञानींशी भेट होते. प्रत्येक वर्गाचे शिष्य तयार होतात, आणि त्याप्रमाणे त्याला शिक्षक मिळतात, असा नियम आहे.

कर्ता झाला की बंधन होतेच. मग जरी तू कशाचाही कर्ता हो!

सकाम कर्माचा कर्ता हो किंवा निष्काम कर्माचा कर्ता हो, कर्ता झालास की बंधन आलेच. निष्काम कर्माने सुख मिळते, संसारात शांती मिळते आणि सकाम कर्माने दु:ख मिळते.

## वळगण कोणाला?

**प्रश्नकर्ता :** आत्म्याला शरीराचे, पुद्‌गलाचे *वळगण* (बंधन, भूतावेश, बला) असते, म्हणून आत्मा भटकतो?

**दादाश्री :** *वळगण* आत्म्याला होतच नाही. ते तर अहंकारालाच होते. अहंकार असेल तिथे आत्मा नसतो आणि आत्मा आहे तिथे अहंकार नसतो.

**प्रश्नकर्ता :** हो, पण मग आत्म्याला मोक्ष द्यायचा आहे ना?

**दादाश्री :** आत्मा मोक्षातच आहे. त्याला दु:ख नाहीच! ज्याला दु:ख आहे, त्याचा मोक्ष करायचा आहे. स्वत: बांधलेलाच नाही, मुक्तच आहे. केवळ अज्ञानामुळेच 'मी बांधलेला आहे' असे तो मानतो आणि 'मी मुक्तच आहे' असे ज्ञान मिळाले की तो मुक्त होतो. खरे तर तो बांधला गेलेलाच नाही. पण तो असे मानून चालला आहे. लोक पण मानून चालले आहेत आणि तसाच हा सुद्धा मानून चालला आहे. लोकांमध्ये ही सारी स्पर्धा आहे. 'तुझे-माझे' असे जे भेद घातले गेले ते भेद बंधनाला मजबूत करतात.

**प्रश्नकर्ता :** दादा, हे एकदम गळी उतरणे जरा कठीण जाते ना?

**दादाश्री :** म्हणून तर हे सर्व अंतराय येतात ना! समकित होत नाही याचे कारण पण हेच आहे. म्हणूनच सांगितले आहे की, आत्मज्ञान जाणा! आत्मा काय आहे, ते जाणून घ्या. त्याशिवाय सुटता येणार नाही! शास्त्रकारांनी अनेक उदाहरणे दिली आहेत, पण ती समजतील तर ना? आत्मज्ञानी असतील तिथेच मुक्ती मिळते. ज्ञानी समजावून सांगतात की 'केवढ्या भागात तू कर्ता आहेस.' तो तर असेच मानतो की ''सामायिक, जप, तप, योग हे सगळे 'मीच' करतो. 'मीच' आत्मा आहे आणि 'मीच'

हे सगळे करतो.'' आता, 'करतो' असा शब्द आला की तिथे मिथ्यात्व आलेच. 'करोमि, करोसि आणि करोति' हे सर्व मिथ्यात्वमध्ये मोडते.

## प्रकृती वाकडे करते : पुरुष सरळ करतो

प्रकृतीने जरी वाकडे केले तरी पण तू आतून सरळ कर. प्रकृती क्रोध करू लागली की 'आपण' 'चंदुभाई'ला काय सांगायला हवे? 'चंदुभाई हे चुकीचे होत आहे, असे होता कामा नये, असे होता कामा नये.' की मग 'तुमचे' काम पूर्ण झाले! प्रकृती तर उद्या उलटही वागेल किंवा सरळही वागेल, त्याच्याशी आपले काहीच देणेघेणे नाही. भगवंत काय म्हणतात की, 'तू तुझे बिघडवू नकोस.'

माणसांचा स्वभाव कसा असतो, तर जशी प्रकृती तसे ते बनतात. जेव्हा प्रकृती सुधारत नाही तेव्हा म्हणतात, 'जाऊ दे आता!' अरे, प्रकृती सुधारली नाही तर हरकत नाही, तू तुझे आतून सुधार ना! मग आपली 'रिस्पोन्सिबिलिटी' (जबाबदारी) नाही. हे सारे तर 'सायन्स' आहे!! बाहेर कसे ही असो, त्याची 'रिस्पोन्सिबिलिटी' नाहीच. एवढे समजलात तरी उलगडा होईल. मी काय म्हणत आहे ते तुम्हाला समजले का?

**प्रश्नकर्ता :** हो, समजले.

**दादाश्री :** काय समजले?

**प्रश्नकर्ता :** फक्त पाहायचे, त्याबरोबर तन्मय व्हायचे नाही.

**दादाश्री :** असे नाही. तन्मय झालात तरी लगेच म्हणायचे 'असे होता कामा नये.' हे सर्व तर चुकीचे आहे. प्रकृती तर सर्व काहीही करील, कारण ती बेजबाबदार आहे. परंतु तुम्ही एवढे बोललात की तुम्ही जबाबदारीतून मोकळे झालात. आता यात काही अडचण आहे का?

**प्रश्नकर्ता :** अडचण नाही, पण जेव्हा क्रोध येतो तेव्हा भान राहत नाही.

**दादाश्री :** आपले 'ज्ञान' असे आहे की ते भानात ठेवते. प्रतिक्रमण करतो, सर्व काही करतो. तुम्हाला भान राहते की नाही?

**प्रश्नकर्ता :** राहते, दादा.

**दादाश्री :** प्रत्येक वेळी राहते?

**प्रश्नकर्ता :** हो, प्रत्येक वेळी राहते.

**दादाश्री :** आपले ज्ञान असे आहे की ते निरंतर जागृतीत आणि जागृतीतच ठेवते. आणि जागृती म्हणजेच आत्मा.

प्रकृती तर अभिप्राय पण ठेवील, सर्व काही ठेवील, पण आपण मात्र अभिप्राय रहित असले पाहिजे. आपण वेगळे आणि प्रकृती वेगळी, या 'दादांनी' हे वेगळे करून दिले आहे. मग तुम्ही 'तुमची' भूमिका वेगळ्या प्रकारे पार पाडा. या 'परक्या कटकटीत' पडायचे नाही.

## वीतरागींची पद्धत

वीतरागींचे मत असे आहे की ''हे असेच आहेत, असा त्याने अभिप्राय बनवला, हा त्याचा गुन्हा आहे.''

'आम्ही' फक्त तुम्हाला सावध करू शकतो. तरी पण जर तुम्हाला वाकडेच करायचे असेल तर त्यात आम्ही काहीच करू शकत नाही. महावीरांच्या काळातही त्यांचा शिष्य गोशाला पालटलेला. तो भगवंतांच्या समोर व्याख्यान देत म्हणू लागला, 'मी पण महावीरच आहे.' यात मग महावीर काय करणार? त्या काळी (सुद्धा) असे लोक असत, तर मग आज दोन-चार लोक असे निघाले तर आपण त्यांना काहीच म्हणू शकत नाही ना? आणि तसे लोक असणेच चांगले ना?

वीतरागींचे विज्ञान कसे आहे? आपण अभिप्राय ठेवला की, 'ही चूक आहे आणि ही माणसे चुकीची आहेत', की मग तुम्ही पकडले गेला! अभिप्राय तर द्यायचाच नाही पण त्यावेळी आपली दृष्टी पण बिघडता कामा नये. 'मी सुपरफ्लुअस' (वरपांगी) राहतो. इथे इतके सारे महात्मा आहेत, त्या सगळ्यांबद्दल मला सर्व माहिती आहे, पण मी कशाला त्यात पडू? हे ज्ञान दुरुपयोग करण्यासाठी नाही.

**प्रश्नकर्ता :** भगवंतांना 'काय बरोबर आणि काय चूक' असे काही नसतेच. मग प्रश्नच उत्पन्न होत नाही.

**दादाश्री :** असे भगवंतांच्या दृष्टीत आहे. पण इथे प्रश्न उत्पन्न होतात. आपण अजून भगवंत झालेलो नाही, तोपर्यंत आपण गुन्हेगार आहोत.

**प्रश्नकर्ता :** पण मग तर खरे काय आणि खोटे काय? हा प्रश्नच गौण होतो ना?

**दादाश्री :** नाही. पण खेद तर व्हायलाच हवा ना. दुरुपयोग करण्यासाठी मी हे बोलत नाही. मी जे बोलत आहे ते तुम्हाला 'बॉदरेशन' होऊ नये यासाठी बोलत आहे. कोणाला मनात असे वाटू नये की 'मला कर्मबंधन होईल' म्हणून मी स्पष्टपणे बोलत आहे. नाहीतर मी सुद्धा सांभाळून सांभाळून बोललो असतो की, 'तुम्ही जर असे केले नाही तर तुम्हाला कर्मबंधन होईल.'

'आम्ही' तुम्हाला सर्व प्रकारची सूट दिली आहे. 'फक्त विषयाच्या बाबतीत जागृत राहा' असे म्हणतो. आणि ते सुद्धा स्वत:चा पती किंवा स्वत:ची पत्नी एवढ्यापुरतीच विषयाची सूट देत आहोत. बिन हक्काच्या विषयाच्या बाबतीत आम्ही तुम्हाला सावध करतो, कारण त्यात खूप मोठा धोका आहे. आपल्या या 'अक्रम विज्ञानात' फक्त एवढेच भयस्थान 'आम्ही' तुम्हाला दाखवितो. बाकी सर्व बाजूंनी आम्ही तुम्हाला निर्भय बनवतो.

## अभिप्राय संपवा

**प्रश्नकर्ता :** द्वेष वाटत नाही, पण अभाव जाणवतो त्याचे काय कारण आहे?

**दादाश्री :** अभाव ही गोष्टच वेगळी आहे. या सर्व मानसिक गोष्टी आहेत. द्वेष मात्र अहंकारपूर्ण गोष्ट आहे. अभावामध्ये 'लाइक' किंवा 'डिसलाइक' (आवड-नावड) असते. आणि ते सर्वांनाच असते. आम्हीही बाहेरून आलो आणि इथे गादी दिसली की त्यावर येऊन बसतो. परंतु जर

कोणी सांगितले की तुम्ही इथे बसू नका, तिथे बसा. तर आम्ही तिथे बसतो, पण आमची पहिली 'लाइक' त्या गादीला असते. आमच्यात द्वेष नसतो. पण आवड–नावड असते. पण ती मानसिक आहे, त्यात अहंकार नसतो.

**प्रश्नकर्ता :** ती अभिप्रायाच्या आधारावर असते ना?

**दादाश्री :** असे सर्व अभिप्राय बनले होते त्याचा परिणाम म्हणून अभाव वाटतो. आपण 'प्रतिक्रमण' करून ते (अभिप्राय) बदलायला हवेत, की समोर बसलेली व्यक्ती तर खूप चांगली आहे, असे म्हटले की मग ती व्यक्ती आपल्याला चांगली वाटेल.

**प्रश्नकर्ता :** अभिप्रायाचे प्रतिक्रमण केले पाहिजे की प्रत्याख्यान केले पाहिजे?

**दादाश्री :** प्रतिक्रमण केले पाहिजे. कोणाबद्दल वाईट अभिप्राय बनला असेल तर तिथे आपल्याला तो चांगला आहे असा चांगला अभिप्राय ठेवला पाहिजे. जो वाईट वाटतो, त्याला चांगले म्हटले की बदल होतो. मागील अभिप्रायांमुळे तो आज चांगला वाटत नाही. कोणी वाईट नसतोच. स्वतःच्या मनालाच असे सांगायला हवे. अभिप्राय मनाने बनवलेले आहेत. मनाजवळ (मागील) शिल्लक आहे. कोणत्याही प्रकारे मनाला बांधायला हवे. नाहीतर मन निरंकुश होते, त्रास देते.

**प्रश्नकर्ता :** तुम्ही एकदा म्हणाला होता की मनाला कुरवाळता पण कामा नये आणि मनाला दाबून पण ठेवू नये. मग काय करावे?

**दादाश्री :** आपण मनाला दाबता कामा नये. परंतु आपण त्याला 'रिव्हर्स' (उलट्या) दिशेने वळवले पाहिजे. अर्थात ज्यांच्याबद्दल आपण वाईट अभिप्राय बनवले असेल त्यांच्याबद्दल 'हे तर खूप चांगले आहेत', उपकारी आहेत, असे म्हटले पाहिजे, असे म्हटले की मन ऐकते. ज्ञानाच्या आधारानेच मनाला ताब्यात आणता येते. दुसऱ्या कोणत्याही गोष्टीने मन बांधता येईल असे नाही. कारण मन ही मेकॅनिकल गोष्ट आहे. मन रोज 'एक्झॉस्ट' होत (कमी कमी होत) चालले आहे. आणि शेवटी ते संपून जाईल. नवी शक्ती मिळत नाही आणि जुन्या शक्ती

वापरल्या जात आहेत. मन म्हणाले कंबरेत दुखत आहे, तर त्याला आपण सांगावे पाय मोडले नाहीत हे किती चांगले झाले. असे म्हटले तर मन शांत होईल. त्याला प्लस-माइनस करावे लागते!

## यमराज वश असतात असे...

**दादाश्री :** संयम कशाला म्हणतात?

**प्रश्नकर्ता :** व्याख्या माहीत नाही.

**दादाश्री :** हा तर भगवंतांचा शब्द आहे.

**प्रश्नकर्ता :** समजून ज्ञानात राहणे म्हणजे संयम.

**दादाश्री :** हे सर्व 'कंट्रोल'मध्ये राहतात, 'आउट ऑफ कंट्रोल' (मर्यादेबाहेर) होत नाहीत याला संयम म्हणत नाहीत. संयम ही तर वेगळीच गोष्ट आहे. त्यांना संयमधारी म्हणतात.

ज्यांना यमराज पकडत नाहीत, त्यांचे नाव संयमी! भगवंतांनी संयमधारींचे कौतुक केले आहे. संयमधारींचे तर दर्शन घ्यावे! त्यांनी यमराजांना वश केले आहे!!!

**प्रश्नकर्ता :** यमराजाला वश केले आहे म्हणजे? ते कशा प्रकारे?

**दादाश्री :** ज्याला मृत्यूची भीती वाटत नाही, त्याला यमराज वश झाले आहेत असे म्हणता येईल, 'मी मरेन, मी यमराजाच्या ताब्यात आहे.' असे ज्याला वाटत नाही, त्याला संयमधारी म्हणतात.

संयम याचा अर्थ लोक आता कुठच्या कुठे घेऊन गेले आहेत. भगवंतांच्या भाषेतील या शब्दाला एकदम खालच्या पातळीवर घेऊन गेले आहेत. भगवंतांची निश्चयाची भाषा व्यवहारात आणली आहे. सध्या ज्याला लोक संयम म्हणतात, वास्तवात तो खरा संयम नाही! त्याला तर 'कंट्रोल' केले असे म्हटले जाते. माणसांमध्ये 'कंट्रोल' कमी असतो म्हणून त्यांना 'कंट्रोल' करावे लागते. सर्व जनावरे कंट्रोलवाली असतात. फक्त माणसेच 'डिकंट्रोल'वाली असतात. स्वतःचे भानच नाही.

**प्रश्नकर्ता :** सत्ता आहे पण जबाबदारीचे भान नाही.

**दादाश्री :** जेव्हा कंट्रोलची पूर्ण सत्ता हातात आली तेव्हा त्याचा दुरुपयोग केला, म्हणून तो निराश्रित झाला! या गायी म्हशींना चिंता असते का?

**प्रश्नकर्ता :** नाही.

**दादाश्री :** फक्त या माणसांनाच चिंता असते. कारण सत्तेचा दुरुपयोग केला. चिंता उत्पन्न झाली की 'स्वत:' निराश्रित झालाच. 'माझे काय होईल?' असे ज्यांना ज्यांना वाटते ते सर्व निराश्रित आहेत.

## ज्याची आठवण येते, तो परिग्रह

नाश्ता करायला हरकत नाही. पण त्याची सवय लागता कामा नये. आत्म्याला ओढून घेऊन जाणार नाही, एवढी जागृती ठेवली पाहिजे. जर ओढले जात असाल तर प्रतिक्रमण केले पाहिजे. जेवणात तुम्हाला कोण ओढत असते?

**प्रश्नकर्ता :** तिखट.

**दादाश्री :** नंतर आठवत राहते का?

**प्रश्नकर्ता :** नाही.

**दादाश्री :** मग त्याला खाल्ले असे म्हणतच नाहीत, आठवण आली तर परिग्रह आहे. आठवत नसेल तर त्याला परिग्रह म्हणत नाहीत. हिशोब लिहायचा राहिला तर एवढी रक्कम येणे बाकी आहे अशी आठवण येत राहते. माशी तिथेच फिरत राहते.

या 'दादां'ची आठवणच अशी आहे की सर्व काही विसरायला लावते. आपोआपच परिग्रह विसरायला लावते!

**प्रश्नकर्ता :** सर्व साधारण संयोगात आपल्याला ते आठवत नसते, पण समोर आले तर काही तास आठवत राहते, तर त्याला परिग्रह म्हणतात का?

**दादाश्री :** हो, नक्कीच! जो आपल्याला स्वरूपापासून दूर करतो तो परिग्रह! तो ग्रह लागला आहे, परिग्रहाचे भूत लागले आहे. म्हणूनच 'आपण' 'स्वरूपा'ला विसरतो. तेवढा वेळ, एक तास, दोन तास स्वरूपाचे लक्ष आपण विसरतो. अरे, काही काही लोक तर बारा-बारा तास विसरतात. आणि या जगात ज्याला ज्ञान दिलेले नाही त्याला तर सतत असेच चालू असते. संपूर्ण दिवस पाणी दुसऱ्यांच्याच शेतात जात असते. स्वत:चा पंप, इंजिन, पाणी सगळे स्वत:चे, पेट्रोल-ऑइल सगळेच स्वत:चे आणि तरी पण पाणी मात्र जाते लोकांच्या शेतात! 'स्वरूप ज्ञाना'नंतर सर्व पाणी स्वत:च्याच शेतात जाते. 'स्वक्षेत्रात'च जाते. 'परक्षेत्रात' जात नाही.

**प्रश्नकर्ता :** पंधरा दिवस आठवले नाही आणि नंतर आठवले तरी त्याला 'परिग्रह' म्हणतात?

**दादाश्री :** हो, भूत तुमच्या मागे लागले आहे. पण साऱ्या जगाची भुते तुम्हाला लागली आहेत का? तुम्हाला तुमचीच भुते लागली आहेत. काही बाबतीतच भुते लागली आहेत. सर्व बाबतीत भुते लागलेली नाहीत.

## स्वरूपज्ञानाची प्राप्ती

**प्रश्नकर्ता :** क्रोध-मान-माया-लोभ सोडण्याचा मार्ग ज्ञानच आहे का? आणि ते 'ज्ञान' या काळासाठीसुद्धा समन्वित आहे का?

**दादाश्री :** जे क्रोध-मान-माया-लोभ यांना संपविते त्यालाच खरे ज्ञान म्हणतात.

**प्रश्नकर्ता :** ते कसे प्राप्त करावे?

**दादाश्री :** तेच ज्ञान मी तुम्हाला येथे देतो. या सर्वांचे क्रोध-मान-माया-लोभ हे सर्व संपूनच गेले आहेत.

**प्रश्नकर्ता :** हृदय सरळ होणे इतके सोपे आहे का?

**दादाश्री :** सरळपणा येईल की नाही ते तर पूर्वजन्मीच्या हिशोबावर आहे. त्याची 'डेव्हलपमेंट' (प्रगती) आहे. जितके सरळ तितके उत्तम,

असे मानले जाते. पण ते 'क्रमिक मार्गा'चे आहे. त्यात सरळ व्यक्ती धर्म तर प्राप्त करते पण तिथे कोटी जन्मानंतरही मोक्षाचा पत्ता लागत नाही. आणि हे 'अक्रम विज्ञान' आहे. हे एकच अवतारी ज्ञान आहे. आणि जर या ज्ञानाची आराधना आमच्या आज्ञेनुसार केली तर सतत समाधी दशा वाटेल! तुम्ही डॉक्टरचा व्यवसाय करत असलात तरी समाधी वाटेल. कशाचीही बाधा होणार नाही आणि काहीही स्पर्शणार नाही आणि बाधकही होणार नाही. हे तर खूप उच्च प्रतीचे विज्ञान आहे. म्हणूनच कविराज म्हणतात की जे दहा लाख वर्षात घडले नाही, ते आता घडले आहे.

**प्रश्नकर्ता :** म्हणजे शरणागतीची आवश्यकता आहे, असे?

**दादाश्री :** नाही. इथे शरणागती अशी कोणतीच गोष्ट नसते. इथे तर अभेदभाव आहे. मला तुमच्यातील कोणापासूनच वेगळेपण जाणवत नाही. आणि या जगापासूनही किंचितही वेगळेपण वाटत नाही.

**प्रश्नकर्ता :** तुम्ही तर फार उच्च कोटीचे आहात, आम्ही तर फार निम्न कोटीचे आहोत.

**दादाश्री :** नाही, असे नाही. तुम्ही पण माझ्याच कोटीचे आहात. तुम्ही मला पाहतच राहा. त्यामुळे तुम्ही पण माझ्यासारखे होऊ लागाल. दुसरा कोणता मार्गच नाही. तुम्ही ज्याला पाहता, त्याच्यासारखे होऊन जाता.

**प्रश्नकर्ता :** सांसारिक व्यवहारात तर शुद्धपणा, शुची (पावित्र्य) हवे ना?

**दादाश्री :** शुद्धता इतकी अधिक यायला हवी की त्याला आदर्श व्यवहार म्हणता आला पाहिजे. जगात कधी पाहिलेलाच नसेल असा, सर्वांपेक्षा उच्च प्रतीचा व्यवहार असायला हवा. आमचा व्यवहार तर फार उच्च आहे.

हे विज्ञान असे आहे. मी जे तुम्हाला दाखवितो तो केवळज्ञानाचा (ॲब्सोल्यूट, कैवल्यज्ञानाचा) आत्मा आहे, आणि या जगातील लोक ज्याला आत्मज्ञान म्हणतात, ते शास्त्रीय आत्मज्ञान आहे.

**प्रश्नकर्ता :** पात्रता किंवा अधिकाराशिवाय हे ज्ञान कसे पचेल?

**दादाश्री :** पात्रता किंवा अधिकाराची इथे गरजच नाही. हे आचरणावर आधारित नाही. बाह्याचार काय आहे? सर्व जग बाह्याचारावर बसले आहे. बाह्याचार हा 'इफेक्ट' (परिणाम) आहे, 'कॉज' (कारण) नाही. आम्ही 'कॉजेस्' संपवून टाकतो. मग 'इफेक्ट' तर आपोआपच धुतला जाईल.

## परम विनय

**प्रश्नकर्ता :** परम विनय म्हणजे आचरण, असेच ना?

**दादाश्री :** परम विनय आपोआप उत्पन्न होतो. हे 'ज्ञान'च परम विनय उत्पन्न करते. उदाहरणार्थ मुलाला सांगितले की ही बाटली विषाची आहे आणि विष म्हणजे काय हे समजावले की मग तो त्या बाटलीला स्पर्श करत नाही. त्याचप्रमाणे हे ज्ञान अविनयापासून सुटका करविते आणि परम विनय उत्पन्न करविते. तुम्हाला परम विनयात राहायचे नसते पण...

**प्रश्नकर्ता :** पण आपोआपच राहिले जाते.

**दादाश्री :** हो, आपोआपच परम विनयात राहिले जाते.

## दादांच्या दरबारातला विनय

**दादाश्री :** आम्ही जेव्हा इथे येतो तेव्हा तुम्ही सर्व उभे राहता. तर असे उठ-बस केल्याने काही होईल असे नाही. असे केल्याने तर तुम्ही थकून जाल.

**प्रश्नकर्ता :** जिनालयात तर भगवंतांच्या मूर्तीजवळ नमस्कार करते वेळी उठ-बसच करतात ना?

**दादाश्री :** तिथे उठ-बस केल्याने तर विनयाचे खूप मार्क्स मिळतात पण इथे तर तुम्हाला इतर बरीच कमाई करायची आहे ना? विनयाचे फळ मोक्ष आहे; क्रियांचे फळ मोक्ष नाही. जिनालयात विनय

केला तर तो दिसतो. तशी तर ती क्रियाच आहे परंतु त्यावेळी आतमध्ये सूक्ष्म विनय आहे, तो मोक्षदायी आहे. नमस्कार करत असताना तो शिव्या तर निश्चितच देत नसतो आणि 'इथला' विनय तर 'अभ्युदय' आणि 'आनुषंगिक' दोन्ही फळे देतो! गुरु महाराजांप्रती विनय करून नंतर बाहेर आल्यावर त्यांची निंदा केली तर सगळे मातीमोल होईल. ज्यांच्याप्रती विनय राखता, त्यांची निंदा करू नका आणि जर निंदा करायची असेल तर तिथे विनय दाखवू नका. याला काही अर्थच नाही ना?

तुम्हाला इथे काहीच करायचे शिल्लक नाही ना? इथे आम्ही तुम्हाला उभे राहू नका असे सांगतो याचे कारण आजकाल लोकांचे पाय मजबूत राहिले नाहीत. दिवसभर धावपळ, धावपळ चालू असते. या रेल्वेने देखील पूल चढवून-चढवून दमवून टाकले आहे! आणि त्यातच आम्ही म्हटले उठा, बसा तर कसे जमेल? त्याऐवजी तुम्ही सहीसलामतच राहा ना. ज्याला जसे सोयीचे वाटते तसे बसा. 'दादां'ना तुमचे सर्व काही पोहोचले आहे. हे 'दादा' तर फक्त तुमचे भावच बघतात, क्रिया बघत नाहीत.

## समजेच्या पायऱ्या

**प्रश्नकर्ता :** समोरचा दोषी दिसू नये यासाठी 'हे सगळे प्रकृती करत आहे' ही समज लक्षात ठेवून मी वागतो.

**दादाश्री :** ही 'फर्स्ट स्टेज' (पहिल्या पायरी)ची गोष्ट आहे, पण शेवटच्या पायरीत असे काही होत नाही. आत्मा फक्त ह्याचा जाणकारच आहे. बाकी काहीच नाही. पण त्याला वाटते की हे समोरच्यानेच केले. ही फक्त 'रॉंग बिलीफ'च आहे.

**प्रश्नकर्ता :** एकुलत्या एक मुलाला मारून टाकले...

**दादाश्री :** तो मरतच नाही. जी 'मूळ वस्तू आहे', जो मूळ स्वभाव आहे, तो मरतच नाही. आणि ज्या नाशवंत गोष्टी आहेत, त्यांचा तर नाश होतच राहतो.

जग निर्दोषच दिसते. ज्याची समज कमी आहे तो हिशोब लावून म्हणतो की 'हिशोब असेल.' नाही तर 'माझा मुलगा आहे' असे वाटणारच नाही ना! ज्याला भगवंतांची भाषा समजते, त्याला सर्व जग निर्दोषच दिसणार ना? कोणी फुले वाहिली तरी निर्दोष दिसेल आणि दगड मारले तरी निर्दोष दिसेल. एकाने मारले आणि एकाने वाचविले. पण दोघेही निर्दोषच दिसतात, यात काही वैशिष्टय जाणवणार नाही.

तुम्हाला आमच्या ज्ञानाच्या समजेनुसार समजून घ्यायचे असेल तर 'व्यवस्थित' आहे, 'हिशोब आहे', असे समजून घ्यावे लागेल. त्याहून पुढे गेलात तर 'मूळ वस्तू' समजेल. 'वाचविणारा वाचवू शकत नाही, मारणारा मारू शकत नाही. हे सगळे निसर्गाचे काम आहे.' 'व्यवस्थित' तर आहे परंतु 'व्यवस्थित'च्या आधारे हे सर्व कोण करत आहे? त्या पूर्ण भागाला तो जाणतो की या साऱ्या निसर्गाच्या कृती आहेत. निसर्ग सर्व जीवमात्रांचे हितच करत असतो, परंतु हा काळ त्याला डिस्टर्ब करतो (बाधा आणतो).

**प्रश्नकर्ता :** काळ 'डिस्टर्ब' करतो म्हणजे काय ते समजले नाही.

**दादाश्री :** काळाने 'डिस्टर्ब' केले नसते तर हे जग खूप सुंदर वाटले असते. असा काळ आला की तो अधोगतीत घेऊन जातो. नाही तर अधोगतीला घेऊन जाणे हे निसर्गाचे काम नाही. निसर्गाचा स्वभाव तर सतत उर्ध्वगतीतच घेऊन जाण्याचा आहे.

एक काळ असा होता की शेठजी नोकरांना खूप त्रास देत. आता असा काळ आला आहे की नोकर लोक शेठजींना त्रास देतात! काळाची विचित्रता आहे! नॉर्मल असेल तर सर्व सुंदर आहे असेच म्हटले जाईल. शेठजी नोकरांना त्रास देणार नाहीत आणि नोकर अशी तोडफोड करणार नाहीत.

इथे तर स्वतः फक्त असे मानून बसला आहे. बाप झाला ते पण मानून बसला आहे की मी बाप आहे, पण मुलाला दोन तास शिव्या दिल्या की कळेल किती दिवसांचा बाप आहे! अगदी गारच पडेल ना! खरेच बाप असता तर मग ते वेगळे झालेच नसते.

## पापांचे प्रायश्चित्त

**प्रश्नकर्ता :** आपण केलेली पापे मंदिरात जाऊन दर रविवारी देवापाशी कबूल केली तर ती पापे माफ होतील ना?

**दादाश्री :** या प्रकारे जर पापे धुतली गेली असती तर कोणी आजारीच पडले नसते! मग कोणी दु:खी झालेच नसते. पण इथे तर अपार दु:ख आहे. माफी मागण्याचा अर्थ काय आहे की तुम्ही जर माफी मागितली तर तुमच्या पापाचे मूळ जळून जाते. म्हणून मग ते मूळ परत फुटत नाही, पण केलेल्या पापाचे फळ तर भोगावेच लागते ना?

**प्रश्नकर्ता :** काही काही मुळे तर परत उगवतात.

**दादाश्री :** नीट जळलेली नसतील तर परत उगवतात. तरीही मूळ कितीही का जळलेले असेना, त्याची फळे तर भोगावीच लागतात. भगवंतांनाही भोगावी लागतात. श्रीकृष्णालाही इथे बाण लागलाच! त्यात कोणाचेच काही चालत नाही. मला पण भोगावे लागते!

प्रत्येक धर्मात माफी (मागण्याचे) आहे. ख्रिश्चन, मुस्लीम, हिंदू सर्व धर्मात माफी आहे, पण ती वेगवेगळ्या प्रकारे आहे.

**प्रश्नकर्ता :** भगवंतानी जी चार प्रकारची सुखे सांगितली आहेत, त्या चारही प्रकारची सुखे कोणा एका व्यक्तीच्या वाट्याला येतच नाहीत ना?

**दादाश्री :** ती सुखे नाहीतच. सर्व कल्पनाच आहेत. ती खरी सुखे नाहीतच.

**प्रश्नकर्ता :** कुठले सुख खरे आणि कुठले खोटे, त्याचा अनुभव झाल्याशिवाय कसे कळेल?

**दादाश्री :** स्वत:ला अनुभव होतोच. बाहेरच्या कोणत्याही वस्तूच्या मदतीशिवाय असे सुख उत्पन्न होते की जे पूर्वी कधी पाहिलेच नसेल.

**प्रश्नकर्ता :** ते कायम राहायला हवे.

**दादाश्री :** ते सुख नंतर कधी जातच नाही. या सर्वांना (ज्ञान घेतल्यानंतर) असे सुख उत्पन्न झाले आहे, ते नंतर परत गेलेच नाही. त्या सुखावर तुम्ही दगड टाकत राहिलात, तर मात्र ते तुम्हाला नक्कीच लागतील, परंतु जर तुम्ही आमच्या आज्ञा पाळल्यात तर काहीच होणार नाही. आमच्या आज्ञा एकदम सोप्या आहेत.

## सुखाचा शोध

**दादाश्री :** ताई, तू का नोकरी करतेस?

**प्रश्नकर्ता :** तसे नशीबात लिहून आणले असेल.

**दादाश्री :** मग पैशांचे काय करतेस?

**प्रश्नकर्ता :** मी आत्म्याला शोधत आहे.

**दादाश्री :** आत्म्याला क्वचितच कोणी शोधत असतो. सगळे जीव काही आत्म्याला शोधत नाहीत. हे सर्व जीव काय शोधत असतात? सुख शोधत असतात. दु:ख कोणत्याच जीवाला आवडत नाही. अगदी लहानात लहान जीव असो किंवा पुरुष असो, स्त्री असो, दु:ख कोणालाच आवडत नाही. आता या सर्वांना सुख तर मिळते, पण संतोष मात्र कुणालाच नसतो. त्याचे काय कारण असेल?

हे सुख, खरे सुख नाही. एकदा सुखाचा स्पर्श झाला आणि नंतर परत कधीही दु:ख झाले नाही, तर त्या सुखाला खरे सुख म्हणतात. तसे सुख शोधत असतात! मनुष्य जन्मात त्याला मोक्ष म्हणतात. मग सर्व कर्मे पूर्ण झाली की मोक्ष होतो! पण पहिला मोक्ष इथे व्हायलाच हवा.

कषाय होता कामा नयेत. तुला कषाय होतात का?

**प्रश्नकर्ता :** होतात.

**दादाश्री :** तुला कषाय खूप आवडतात?

**प्रश्नकर्ता :** आवडत तर नाहीत, पण होतात.

**दादाश्री :** कषाय म्हणजेच दु:ख. सर्व जग कषायातच गुंतलेले आहे. लोकांना कषाय आवडत नाहीत पण तरीही त्यांना कषायांनी घेरलेले आहे. कषायांच्या ताब्यातच सर्व आले आहेत. म्हणून ते बिचारे काय करतील? अजिबात रागवायचे नाही असे कितीही ठरविले तरी राग येतोच.

तुला कसे सुख हवे आहे? 'टेम्परररी' की 'पर्मनन्ट'?

**प्रश्नकर्ता :** सगळ्यांना शाश्वत सुखच हवे असते.

**दादाश्री :** तरी पण शाश्वत सुख मिळत नाही त्याचे कारण काय?

**प्रश्नकर्ता :** आमची कर्मेच तशी आहेत, दुसरे काय?

**दादाश्री :** कर्मे कशीही असोत, पण आपल्याला शाश्वत सुख देणारे, दाखविणारे कोणी भेटले नाहीत. जे कोणी शाश्वत सुख अनुभवत असतील त्यांना जर आपण विनंती केली की मला मार्ग दाखवा तर आपले काम होईल. परंतु असे कोणी भेटलेले नाहीत. दु:खी लोकांना दु:खी लोकच भेटलेत. म्हणून त्यांचेही दु:ख गेले नाही आणि आपलेही दु:ख गेले नाही.

फक्त 'ज्ञानी पुरुष'च सदैव सुखी असतात. ते मोक्षातच असतात. तुम्ही त्यांच्याजवळ गेलात तर तुमचीही सुटका होईल. नाही तर भटकतच राहावे लागेल. या काळात शांती कशी मिळेल? स्वरूप ज्ञानाशिवाय शांती कशी मिळेल? अज्ञान हेच दु:ख आहे.

## जप कशाचा करावा?

**प्रश्नकर्ता :** मन:शांती प्राप्त करण्यासाठी कुठला जप अधिक करावा की ज्यामुळे मनाला विशेष शांती मिळेल आणि ते ईश्वराकडे वळेल?

**दादाश्री :** स्वरूपाचा जप केलात तर तसे होईल.

**प्रश्नकर्ता :** सहजात्मस्वरूप परमगुरु?

**दादाश्री :** नाही. तो स्वरूपाचा जप नाही. ती भगवंतांची भक्ती

आहे. स्वरूपाचा म्हणजेच 'तुम्ही कोण आहात?' याचा जप केलात तर पूर्ण शांती मिळेल. तुम्ही स्वरूपाचा जप का करत नाही?

**प्रश्नकर्ता :** मनात अनेकदा हा प्रश्न उद्‌भवत होता की कोणता जप केल्याने शांती मिळेल?

**दादाश्री :** स्वरूपाचा जप करा तर निरंतर शांती मिळेल, काळजी वाटणार नाही. *उपाधी* (बाहेरून येणारी दु:खे) होणार नाहीत. त्यासाठी 'ज्ञानी पुरुषां'चे कृपापात्र व्हावे लागेल.

## ज्ञानी भेटल्यानंतर साधने निरर्थक होतात

**प्रश्नकर्ता :** अंत:करण शुद्ध करण्यासाठी जी साधने सांगितली आहेत ती किती अंशापर्यंत आवश्यक आहेत?

**दादाश्री :** कोणती साधने?

**प्रश्नकर्ता :** जप, तप वगैरे सर्व.

**दादाश्री :** जोपर्यंत साध्य वस्तू मिळत नाही, तोपर्यंत साधने वापरली पाहिजेत. परंतु जर 'ज्ञानी पुरुष' मिळाले तर काहीच करण्याची गरज नाही. 'ज्ञानी पुरुष' स्वत:च सगळे काही करून देतात. आणि ते जर मिळाले नसतील तर मात्र तुम्हाला काही ना काही केलेच पाहिजे. नाही तर चुकीच्या गोष्टी (आत) घुसतील. शुद्धीकरण केले नाही तर अशुद्धी होतच राहील ना? म्हणून आपल्याला रोज कचरा तर साफ करावा लागेलच ना? 'ज्ञानी पुरुष' भेटले तर त्यांना सांगा, साहेब, माझी सुटका करा (मला मोक्ष द्या). मग 'ज्ञानी पुरुष' एका तासात सर्व काही करतील. त्यानंतर फक्त त्यांच्या आज्ञेत राहावे लागते की चालू लिफ्टमधून हात बाहेर काढू नका. नाही तर हात कापला जाईल. आणि पूर्ण लिफ्ट थांबवावी लागेल. ही तर मोक्षाला नेणारी लिफ्ट आहे.

मोक्षाला जाण्याचे दोन मार्ग आहेत : एक 'क्रमिक' मार्ग आणि दुसरा 'अक्रम' मार्ग. क्रमिक म्हणजे 'स्टेप बाय स्टेप' पायऱ्या चढणे आणि 'अक्रम' म्हणजे लिफ्टने वर जाणे!

## मोक्ष - 'अक्रम' मार्ग

**प्रश्नकर्ता :** मोक्ष मिळवण्यासाठी सरळ मार्ग नाही का?

**दादाश्री :** तुम्हाला वाकडा मार्ग हवा आहे का?

**प्रश्नकर्ता :** वाकडा तर नको आहे पण सरळ मार्ग सापडत नाही. 'मोक्ष प्राप्त करण्याचा रस्ता सोपा नाही' असे मला वाटते.

**दादाश्री :** हो, ते बरोबर आहे. मोक्षाचे दोन रस्ते आहेत. कायमचा तर एकच रस्ता आहे. तुम्ही जो कठीण रस्ता म्हणत आहात ना, तोच रस्ता आहे. आणि हा तर क्वचितच कधी इनामी रस्ता निघतो. हा दहा लाख वर्षांनी निघतो! त्याचे तिकीट ज्याला मिळाले त्याचे कल्याण झाले! हा रस्ता कायम उपलब्ध नसतो. हे 'अक्रम विज्ञान' आहे आणि ते 'क्रमिक विज्ञान' आहे. क्रम म्हणजे स्टेप बाय स्टेप. एकेक पायरी चढत-चढत वर जाणे आणि हा लिफ्टचा मार्ग आहे. तुला लिफ्ट आवडत नसेल तर काही हरकत नाही. आम्ही तुला तो क्रमिक मार्ग दाखवू. तुझ्यात तर जिना चढण्याची शक्ती आहे, मग काय वाईट आहे? आणि ज्याला लिफ्ट पसंत आहे, ज्याच्याकडे शक्ती नाही, त्यांनी लिफ्टमध्ये बसावे.

'ज्ञानी' मिळाले तर मोक्ष अगदी तळहातावर आहे. आणि जर मिळाले नाहीत तर कोटी जन्मात पण तो सापडणार नाही.

**प्रश्नकर्ता :** ज्ञानी पण सम्यक्ज्ञानी असायला हवेत ना? त्यांना खरी समज हवी ना?

**दादाश्री :** हो, पण सम्यक्ज्ञान तुम्हाला पण झाले पाहिजे. तरच मोक्ष होईल. सम्यक्दर्शन, सम्यक्ज्ञान आणि सम्यक्चारित्र्य, सर्व काही होईल तेव्हा मोक्ष होईल. त्याशिवाय मोक्ष होत नाही.

**प्रश्नकर्ता :** आम्हाला पण मोक्षाचा स्वाद चाखवाल ना?

**दादाश्री :** हो, चाखवू. सगळ्यांना चाखवू. ज्यांना ज्यांना चाखायचा असेल त्या सर्वांना चाखवू.

## अंतरभेदन झाल्याशिवाय अंतरदृष्टी निर्माण होत नाही

**प्रश्नकर्ता :** ज्ञानी पुरुष म्हणतात की तुम्हाला आतच पाहत राहायचे आहे. तर आम्ही आत काय पाहावे?

**दादाश्री :** ते जे सांगितले आहे ते सापेक्ष वचन आहे. ज्याला आंतरिक ज्ञान झाले आहे त्याने आत पाहावे, आणि ज्याला बाह्य ज्ञान मिळाले आहे, त्याने बाहेर पाहावे. आता बाह्यज्ञान झाले असेल, त्याने जर आत पाहिले तर त्याला काय दिसेल?

**प्रश्नकर्ता :** बाहेरचेच दिसेल.

**दादाश्री :** म्हणून माझे म्हणणे असे आहे की हे जे सांगितलेले आहे ते सापेक्ष वचन आहे. ज्याला आंतरिक काही ज्ञान प्राप्त झाले आहे. ज्यांने आंतरिक काही ऐकले आहे, अंतरभेदन झाले आहे, त्याने आत पाहावे. आणि जर अंतरभेदन झालेले नसेल तर आत काय पाहाल?

**प्रश्नकर्ता :** आम्हाला जे विचार येत असतील त्यांना पाहायचे.

**दादाश्री :** हो, पण ज्याचे अंतरभेदन झाले असेल, त्याच्यासाठी ते कामाचे आहे. अंतरभेदन झाले नसेल, विचार येत असतील, त्यात तन्मयाकार होत असेल तर मग काय दिसेल? ज्याचे अंतरभेदन झाले आहे तो विचारात तन्मयाकार होत नाही, तो तर विचारांना पाहत राहतो की मला कुठले विचार आले. पण अंतरभेदन होणे इतके सोपे नाही. 'ज्ञानी पुरुषां'खेरीज तसे अंतरभेदन होत नाही. भेद तर निर्माण व्हायला हवा ना? अहंकार भेद निर्माण होऊ देत नाही.

ज्याची दृष्टी बाहेरच आहे, जो लौकिकातच रमलेला आहे. तो आत काय पाहणार? त्याची रममाणता कुठे आहे, त्यावर दृष्टी आधारलेली आहे. जोपर्यंत आत्मा प्राप्त झालेला नाही तोपर्यंत आतमध्ये पाहण्यासारखे काहीच नाही. फक्त शुभ उपयोग असतो पण शुभ उपयोग हा मोक्षाचा मार्ग नाही, तो धर्माचा मार्ग आहे, त्यामुळे त्याचा आणि मोक्षाचा काहीच संबंध नाही. तुम्ही आत कितीही उपयोग ठेवा, पण त्याला शुद्ध उपयोग तर मानले जाणार नाही.

'ज्ञानी पुरुषां'नी 'ज्ञान' दिल्यानंतरच शुद्ध उपयोग राहू शकतो. 'ज्ञान' कोणते? आत्मज्ञान. 'मी कोण आहे' ते निश्चित होते. शिवाय ते संपूर्ण भानासहित असले पाहिजे. शुद्ध उपयोग हा मोक्षमार्ग आहे. आणि तुम्ही म्हणता ते सर्व शुभ उपयोग आहेत. अशुभातून शुभात येण्याचा तो मार्ग आहे.

## अध्यात्म आणि बौद्धिकता

**प्रश्नकर्ता :** अध्यात्म्याच्या अनुभवाबद्दल दादांकडून किंवा एखाद्या वीतरागी पुरुषाकडून जर आम्ही उत्तरे मिळवली तर त्याला बौद्धिक अर्थघटन मानले जाईल का?

**दादाश्री :** तुमच्याजवळ आले म्हणून ते बौद्धिक झाले. तुम्हाला बुद्धीने समजण्यासाठी बौद्धिक झाले. पण खरे तर तो ज्ञान प्रकाश आहे! बुद्धी तर आम्हाला नसतेच. आम्ही ज्ञानाच्या 'डायरेक्ट' प्रकाशाद्वारेच बोलतो. आम्ही पुस्तकातील ज्ञान बोलतच नाही.

**प्रश्नकर्ता :** जे वाणीत उतरते, ते तेवढ्या प्रमाणात बौद्धिक झाले असे नाही का म्हणायचे?

**दादाश्री :** नाही, असा काही नियम नाही. वाणीत तर सर्व 'डायरेक्ट' प्रकाशच उतरतो. आणि 'इनडायरेक्ट' प्रकाश पण उतरतो. वाणीला त्याच्याशी काहीच देणेघेणे नाही.

**प्रश्नकर्ता :** 'डायरेक्ट' प्रकाश पोहोचविण्यासाठी माध्यमाची मर्यादा वाणीला बाधक ठरत नाही का?

**दादाश्री :** 'डायरेक्ट' प्रकाश असलेली वाणी स्याद्वाद असते. कोणाला किंचितही दु:ख होणार नाही अशी ती वाणी असते. बुद्धीवाल्या वाणीने कोणाला दु:ख होऊ शकते. कारण अशा वाणीत अहंकार रूपी 'पॉइजन' (विष) मिसळलेले असते.

**प्रश्नकर्ता :** वाणी जरी वीतरागी असली, परंतु समोर ग्रहण करणारी बुद्धी असेल तर त्या बुद्धीला वीतरागता समजेल का?

**दादाश्री :** बुद्धी समजू तर शकते, पण ती स्वतःहून समजू शकत नाही. जर ती 'ज्ञानी पुरुषां'द्वारे सम्यक् झाली तर समजू शकेल.

**प्रश्नकर्ता :** ग्रहण करणारा तर आपल्या बौद्धिक शक्तीनेच ग्रहण करतो ना? की मग त्याची मर्यादा पण असते...

**दादाश्री :** हो, तो बौद्धिक शक्तीनेच ग्रहण करतो पण 'ज्ञानी पुरुषां'च्या उपस्थितीतच बुद्धी पकडू शकते (समजू शकते), इतर कुठल्याच ठिकाणी बुद्धी पकडू शकत नाही. कारण 'ज्ञानी पुरुषां'च्या उपस्थितीत बाहेर पडलेली वाणी आवरणांना तोडून 'डायरेक्ट' आत्म्यापर्यंत पोहोचते, आणि आत्म्यापर्यंत पोहोचते म्हणून ताबडतोब तुमचे मन-बुद्धी-चित्त आणि अहंकार तिला पकडून घेतात (ग्रहण करतात). आमची वाणी आत्म्यातून बाहेर पडलेली असते. याउलट जगाची वाणी मनातून बाहेर पडलेली असते. म्हणून तिला मन स्वीकारते. आणि इथे आमच्या वाणीचा आत्मा 'स्वीकार' करतो. पण नंतर मग मन-बुद्धी तिला पकडून घेतात (स्वीकारतात).

## अवस्थेत अस्वस्थ, 'स्व'मध्ये स्वस्थ

**प्रश्नकर्ता :** वीतरागींच्या अनुपस्थितीत अवस्थांमध्ये अस्वस्थ होतो आणि त्यांच्या उपस्थितीत स्वस्थ राहू शकतो, असे का होते?

**दादाश्री :** उपस्थितीत तर स्वस्थ राहतोच. अस्वस्थ होतो, कारण तुमची बुद्धी तुम्हाला अस्वस्थ करते. आणि बुद्धी आहे तोपर्यंत अहंकार आहे. अहंकारवाली बुद्धीच अस्वस्थ करविते. तिचा जर अंत झाला तर अस्वस्थ व्हायचे काही कारण उरणारच नाही.

**प्रश्नकर्ता :** भौतिक रूपाने तर हे शक्य नाही ना?

**दादाश्री :** नाही, ते शक्य नसते! तरी पण जेवढा लाभ मिळाला तेवढा खरा! नाहीतर तुमच्या बुद्धी आणि अहंकाराचा निकाल करत करत जेव्हा ते संपतील, तेव्हा मग आपोआपच निरंतर स्वस्थता राहील. स्वमध्ये राहण्यासाठी स्वस्थता आणि तो तर अवस्थांमध्ये राहतो म्हणून अस्वस्थता. सर्व अवस्था विनाशी आहेत आणि स्व अविनाशी आहे.

म्हणून अविनाशीमध्ये राहिला तरच स्वस्थ राहू शकेल नाहीतर तो अस्वस्थच राहील.

**प्रश्नकर्ता :** अवस्थेत अस्वस्थ राहतो, त्याला 'स्वत:' पाहू शकतो आणि जाणूही शकतो तरी पण स्वस्थ राहणे जमत नाही, तर याला बुद्धीचे आवरण जास्त आहे असे म्हणायचे का?

**दादाश्री :** नाही, तिथला न्याय काय आहे की, दादांनी जो आत्मा दिला आहे, 'शुद्धात्मा', तोच हे सर्व पाहतो, 'त्या' रूपात 'आपण' राहिलो तर काहीच अडचण नाही. नाही तर स्वस्थ आणि अस्वस्थ बघत बसलो तर त्याचा शेवट येणारच नाही.

**प्रश्नकर्ता :** त्याची किल्ली कोणती?

**दादाश्री :** स्वस्थ असो किंवा अस्वस्थ, या दोन्ही गोष्टींना जाणणारा शुद्धात्मा आहे. अस्वस्थ होतो म्हणून 'स्वत:' त्यावेळी 'फॉरेन'मध्ये हात घालतो. स्वस्थ व्हा किंवा अस्वस्थ व्हा, तुमचे काम तर फक्त 'जाणणे' एवढेच आहे. या सर्व पौद्‌गलिक अवस्था आहेत आणि पौद्‌गलिक अवस्थांना जो जाणतो त्याला 'शुद्धात्मा' म्हटले जाते. पौद्‌गलिक म्हणजे पूरण-गलन झालेली! जी अस्वस्थता तुम्हाला येते ती पूरण झालेली (चार्ज झालेली, भरलेली) आहे, म्हणून आज येत आहे, ती येऊन आता गलन (डिस्चार्ज, रिकामी) होईल.

'फॉरेन'मध्ये हात घातला तर भाजल्याशिवाय राहणारच नाही. आम्ही 'फॉरेन'मध्ये हात घालतच नाही. कारण नाहीतरी जे फळ मिळणार आहे ते तर मिळणारच. आणि त्यातून जर फॉरेन'मध्ये हात घातला तर त्याला दुप्पट फळ मिळेल. तो दुप्पट नुकसान सोसतो. आणि आपण एक पटच नुकसान सोसतो. 'चंदुभाई' अस्वस्थ झाले आहे हे 'तुम्ही' जाणत राहा, दहा-पंधरा मिनीटांनंतर ते संपेल. 'पाहत' राहिलात तर दुप्पट नुकसान होणार नाही.

**प्रश्नकर्ता :** अस्वस्थतेचा काळ जेवढा जास्त तितके अधिक आवरण, असे म्हणायचे का?

**दादाश्री :** हो, जितके आवरण तितका जास्त अस्वस्थ राहील. परंतु 'तुम्ही' जर शुद्धात्मा होऊन पाहत राहाल तर मग कितीही आवरण असो, तरी पण ते भराभर संपेल. त्याचे निराकरण होईल. आणि त्यात हात घातलात तर फटका बसून नवीनच त्रास उत्पन्न होईल.

## ज्ञानींचा अशाता उदय

**प्रश्नकर्ता :** वीतराग पुरुषांना जेव्हा शारीरिक दु:ख येतात, उदाहरणार्थ तुमच्या पायाला 'फ्रॅक्चर' झाले होते, तर तेव्हा ते मुक्त कसे राहू शकतात? वेदना तर इतरांना होते तशीच त्यांनाही होत असते ना?

**दादाश्री :** त्यांनी मालकीपणाचे दस्तऐवज फाडून टाकले आहेत. 'हे मन माझे आहे' असे दस्तऐवज फाडून टाकले आहेत. 'बुद्धी माझी आहे, वाणी माझी आहे' हे दस्तऐवज फाडून टाकले आहेत. वाणीला ते काय म्हणतात? 'ओरिजिनल टेपरेकॉर्डर'.

हे शरीर माझे आहे, हा दस्तऐवज पण त्यांनी फाडून टाकला आहे. म्हणून मग काय म्हणतात – 'हा पब्लिक ट्रस्ट' आहे. म्हणून जर आता आमची दाढ दुखत असेल तर त्याचा परिणाम होतो, पण त्याला 'आम्ही' 'जाणतो', त्याचे 'वेदन' करत नाही. कोणी आम्हाला शिव्या दिल्या, अपमान केला किंवा पैशांचे नुकसान झाले, अशा सर्व गोष्टींचा आमच्यावर किंचितही परिणाम होत नाही. आमच्यावर मानसिक परिणाम अजिबात होत नाही. शरीराच्या बाबतीत असेल तर ते आपल्या धर्मानुसार परिणाम दाखविते. परंतु 'आम्ही' स्वत: त्याचे फक्त 'ज्ञाता-द्रष्टा'च असतो. म्हणून आम्हाला दु:खाचा स्पर्श होत नाही.

**प्रश्नकर्ता :** याला वीतराग पुरुषांची तादात्म्यपूर्वक तटस्थता म्हटली जाईल की फक्त तटस्थता म्हटली जाईल?

**दादाश्री :** आम्हाला तादात्म्य अजिबातच होत नाही. आमचा या शरीराशी पण शेजाऱ्यासारखा संबंध असतो त्यामुळे शरीरावर परिणाम झाला तरी तो आम्हाला स्पर्श करीत नाही. आमचे मन असे नसतेच. ते कसे असते? क्षणोक्षणी फिरतच असते. एका जागी स्थिर नसते.

**प्रश्नकर्ता :** म्हणजेच 'शेजाऱ्याच्या' दु:खाने 'स्वत:' दु:खी होत नाही.

**दादाश्री :** कोणाच्याच दु:खाने दु:खी होत नाही. स्वत:चा स्वभाव दु:खवाला नाहीच, उलट त्याच्या स्पर्शाने समोरच्याला सुख होते.

## जगातील अध्यात्म जागृती

**प्रश्नकर्ता :** मागील पाच वर्षात लोकांची अध्यात्माच्या दिशेने प्रगती होताना दिसत आहे, ते काय दर्शविते?

**दादाश्री :** ते दर्शविते की पूर्वी आध्यात्मिक वृत्ती पूर्णपणे संपली होती, म्हणून ती आता वाढत असताना दिसत आहे. हे सगळे काळानुसार बरोबरच आहे. दुसरे असे की ही दु:खे इतकी वाढतील की यातून लोकांना बाहेर पडणे कठीण होईल! तेव्हा मग लोकांना वैराग्य येईल. नाहीतर लोक उगीचच आपल्या मान्यता सोडून देतील असे नाहीच ना!

**प्रश्नकर्ता :** त्याला सत्युग म्हटले जाईल का?

**दादाश्री :** लोकांना त्याला जे युग म्हणायचे ते म्हणो, पण परिवर्तन होईल. सत्युग तर निघून गेले, ते काही पुन्हा येणार नाही. म्हणून आता कलियुगात कधीही पाहिले नसतील असे सुंदर सुंदर विचार दिसतील!

आज माणसांची बुद्धी जशी 'डेवलप्ड' (विकसित) होत राहिली आहे, तशी या पूर्वी दहा लाख वर्षात कधीच झाली नव्हती. ही बुद्धी विपरीत होत चालली आहे, पण विपरीत बुद्धीसुद्धा 'डेवलप्ड' आहे. तिला सम्यक् व्हायला फारसा वेळ लागणार नाही. पूर्वी तर बुद्धी अशी खास विकसित झालेली नव्हती.

**प्रश्नकर्ता :** म्हणूनच तर पूर्वीच्या काळी आत्मसाक्षात्कार करण्यासाठी खूप दीर्घ काळापर्यंत तपश्चर्या करावी लागत असे. त्याचे हेच कारण आहे का?

**दादाश्री :** हेच आहे. सध्या खूप तपश्चर्या करावी लागत नाही,

आधीच हे सर्व तापलेले आहेत! एक काडी पेटवण्यापूर्वीच स्फोट होऊन जातो. तापलेल्याला काय तापवायचे? बिचारे सतत तपच करत असतात.

## अध्यात्मात इन्व्हेन्शन

शुद्ध हृदयवाल्याजवळ विचारण्यासारखे जास्त काही नसते आणि त्याला धर्माची प्राप्ती पण फारशी होत नाही.

**प्रश्नकर्ता :** म्हणजे वाकड्या लोकांनाच लाभ आहे का?

**दादाश्री :** वाकड्यालाच लाभ आहे. यांच्यासारखे शुद्ध हृदय असलेले मी खूप जण पाहिले आहेत. त्यांना मी म्हणतो 'तुम्ही तर सुखीच आहात, मग काय?' तुमच्यासारखे सरळ लोक जगाचे नुकसान करत नाहीत. पण आत्मदशेपर्यंत पोहोचण्यासाठी त्यांना खूप वेळ लागेल, कारण त्यांचे 'इन्व्हेन्शन' (शोध) बंद झालेले असते. त्यांचे इंजिन हळूहळू चालत आहे.

हे जे मी सांगतो तसे यापूर्वी कोणी सांगितलेलेच नाही. सर्व लोक असे म्हणतात की या शुद्ध हृदयवाल्यांनाच धर्म प्राप्ती होते इतरांना ते जमत नाही. परंतु माझे म्हणणे असे आहे की शुद्ध हृदयवाल्यांना आवश्यक गोष्टी मिळाल्या की झाले, संपले. मग त्यांचे 'इन्व्हेन्शन' बंद होते.

**प्रश्नकर्ता :** पण दादा, त्यांच्या हृदयाची किंवा बुद्धीची जिज्ञासा असेल तर होईल ना?

**दादाश्री :** नाही, जिज्ञासा असेल तरी होत नाही. असे फक्त दोन-चार जण येतात. त्यांना सुधारतात, सगळ्यांची सेवा करतात आणि त्यांचे स्वत:चेही चालत राहते.

**प्रश्नकर्ता :** त्यांना जर आत्मज्ञान हवे असेल तर त्यांनी काय करावे?

**दादाश्री :** त्यासाठी मग हळूहळू दुसरे संयोग जुळून यावे

लागतील. आणि तेव्हा जर हृदयात दुसरे काही घुसू लागले तर फटका बसेल. तेव्हा मग परत 'इन्व्हेन्शन' सुरू होईल. हे माझे 'इन्व्हेन्शन' का सुरू झाले आहे? तर खूप त्रास सोसला म्हणून. मी अशा मोठ्या मोठ्या खाईतून बाहेर निघालो आहे, आणि अशी अशी 'हिल स्टेशने' (शिखरे) चढलो आहे... दुसरे म्हणजे, मला या जगातील कोणतीच गोष्ट नको आहे. जगात तुम्ही पण चढले आहात, हे सर्वच जण चढले आहेत. पण त्यांच्यात ज्ञाता-द्रष्टापण नसते, स्वत:चे निरीक्षण नसते. खाण्या-पिण्यात, मौज-मजेत तन्मयाकार असतात. म्हणून ते 'इन्व्हेन्शन' विसरून जातात. आमचे निरीक्षण तर कितीतरी जन्मांपासून आहे!

अर्थात या मन-वचन-कायेची सर्व शक्ती कशात जाते? तर सगळी शक्ती स्थूल कामात खर्च होते. जी कामे मजूर करू शकतात अशा कामात खर्च होते. आता माझी शक्ती जर 'बागकाम' करण्यात खर्च झाली तर मग माझी 'वेल्यू' (किंमत) काय राहील? एका तासात तर कितीतरी काम होऊन जाते. स्थूलात शक्ती खर्च झाली तर सूक्ष्मात 'इन्व्हेन्शन' बंद होते. सेवाभावी झाले की मग त्यांना त्यातच इन्टरेस्ट वाटू लागतो. सगळीकडून 'या, या, तुमचे स्वागत आहे', असा मान-पान मिळू लागतो. म्हणून मग प्रगती बंद होते. 'इन्व्हेन्शन' कधी होते? तर जेव्हा कोणी तीन थोबाडीत मारतो, तेव्हा सर्व रात्रभर जागून 'इन्व्हेन्शन' सुरू होते.

**प्रश्नकर्ता :** दादा, सरळ आणि सेवाभावी लोकांचा विकास वाईट लोकांपेक्षा कमी का होतो?

**दादाश्री :** वाईट लोकांचा विकास होतच नाही. परंतु वाईट लोकांचा वाईटपणा वाढत गेला की मग त्यांना जोरदार फटका बसतो. आणि मग त्यांचे 'इन्व्हेन्शन' सुरू होते. त्यानंतर वाईट व्यक्ती त्या सरळ व्यक्तीपेक्षा पुढे निघून जाते. याउलट सरळ व्यक्ती हळूहळू पुढे जात असते. दोन तास प्रवास करूनही तो बोरसदला (बडोद्याजवळील एक गाव) पोहोचत नाही. त्याला काही अडचण पण येत नाही. वाट चुकला, काही मिळाले नाही, की मग 'इन्व्हेन्शन' सुरू होते.

निसर्गाचा नियम असा आहे की मोक्षाला गेले आहेत त्यातील ८० टक्के नरकात जाऊन आल्यानंतरच मोक्षात गेलेले! जो नरकात गेला नसेल त्याला मोक्षाला जाऊ देत नाहीत! फटका बसलाच पाहिजे. जर खाणे-पिणे सगळे मिळत असेल, सगळे लोक 'या, या, बसा' असे म्हणत असतील तर 'इन्व्हेन्शन' थांबते.

**प्रश्नकर्ता :** कित्येकांना असे वाटते की 'मी धर्माच्या मार्गानेच जात आहे.' मला आणखी काही जाणण्याची गरज नाही. ते बरोबर आहे का?

**दादाश्री :** प्रत्येक जण आपआपल्या मान्यतेनुसार पुढेच चालला आहे. पण धर्म कशाला म्हणतात ते समजणे फार कठीण आहे. या जगात जे चालू आहे तो रियल धर्म नाही, तो रिलेटिव्ह धर्म आहे. ते 'रिलेटिव्ह' धर्मात जात आहेत. दिवसभर ते धर्मच करत असतात ना?

सरळ माणसाला सेवाभावच धर्म वाटतो. सेवाभाव म्हणजे कोणाला सुख देणे, कोणाची अडचण दूर करणे म्हणजे धर्म.(असे ते मानतात). पण त्याला खरा धर्म म्हटले जात नाही.

जोपर्यंत 'मी करत आहे', 'मी कर्ता आहे', 'मी भोक्ता आहे'- असा 'मीपणा आहे' तोपर्यंत सत्‌धर्म उत्पन्न होत नाही. हे लौकिक धर्म उत्पन्न होतात. अलौकिक धर्म तर फटका बसल्यानंतरच सुरू होतो. आत 'इन्व्हेन्शन' सुरू होते. त्याशिवाय 'इन्व्हेन्शन' कसे सुरू होणार?

कोणाला मिळू शकेल असा आत्मा नाहीच, तो फक्त तीर्थंकर भगवंतांनाच मिळाला! जग ज्याला आत्मा मानते तसा आत्मा नाहीच. आत्म्यासंबंधी ज्या ज्या कल्पना केल्या गेल्या आहेत त्या सर्व कल्पित आहेत. तरी पण जी त्यांची मान्यता आहे, ती त्यांच्यासाठी ठीक आहे. निसर्गाने त्यांच्यासाठी जो हिशोब मांडून ठेवला आहे, त्याप्रमाणे ते भोगतात. शास्त्रांत आत्म्याचे शब्दज्ञान दिलेले आहे. ते संज्ञा ज्ञान आहे. संज्ञा जर ज्ञानींकडून समजून घेतली तर आत्म्याची प्रतीती येते आणि शेवटी केवळज्ञान होते.

## मोक्षाचे अधिकारी

**प्रश्नकर्ता :** मोक्ष प्राप्ती हा प्रत्येक माणसाचा हक्क आहे का?

**दादाश्री :** मोक्ष प्राप्ती हा प्रत्येक माणसाचाच नाही, तर प्रत्येक जीवाचा हक्क आहे. कारण प्रत्येक जीव सुखाच्या शोधात आहे. ते सुख 'यात मिळेल, त्यात मिळेल' अशा आशेत तो अनंत जन्म भटकत आहे. तो शाश्वत सुख शोधत आहे. शाश्वत सुख, म्हणजेच मोक्ष. ही टेम्पररी (तात्पुरती) सुखे, सुखेच नाहीत. ही तर फक्त भ्रांती आहे. हे आरोपित भाव आहेत. जर श्रीखंडात सुख असेल आणि तुम्ही श्रीखंड खाऊन आलेले असाल तर काय ते तुम्ही परत खाल? तुम्हाला तर ते दुःखदायीच वाटेल ना? म्हणजेच त्यात सुख नाही. तुम्ही जसे आरोपण करता तसे सुख मिळते. तात्पर्य मोक्षप्राप्तीचा अधिकार प्रत्येक जीवाला आहे.

**प्रश्नकर्ता :** या मार्गावर जाण्यासाठी ज्ञानींच्या चरणी बसणे, हा उपाय आहे का?

**दादाश्री :** ज्ञानी स्वतः मुक्त आहेत, म्हणून ते तुम्हालाही मुक्त करू शकतात. ते संसारातील कुठल्याच वस्तूत राहत नाहीत, त्यामुळे ते तुम्हाला सर्व प्रकारे मुक्त करू शकतात. ज्यांची ज्यांची भक्ती करतो, तद्रूप आपण होतो.

जिथे अहंकार नसतो, तिथे तुम्ही बसून राहिलात तर तुमचा अहंकार निघून जातो. आता तुम्हाला वाटते की चला, दादांच्याजवळ बसून राहू. पण मागचे जे संस्कार आहेत, 'डिस्जार्च' संस्कार आहेत, त्यांचा निकाल तर करावा लागेल ना? जसजसा त्यांचा निकाल होत जाईल तशीतशी ती प्राप्ती होत जाईल. निरंतर ज्ञानी पुरुषांच्या चरणीच बसावे ही भावना मात्र बाळगली पाहिजे. मग संपूर्ण मुक्ती होते. अहंकाराची मुक्तीच होऊन जाते!

## सोडू नका, ही अंतिम संधी!

**प्रश्नकर्ता :** 'ज्ञानीं'ची भेट झाली नाही तर काय करावे? डोके आपटून मरावे?

**दादाश्री :** नाही, कोणीही असे मरायला सांगत नाही. आणि मरावे असे वाटले तरी मरता येणार नाही.

**प्रश्नकर्ता :** तर मग जगाने काय करावे?

**दादाश्री :** काहीही करायचे नाही. जे करत आले आहात तेच चालू ठेवावे.

**प्रश्नकर्ता :** ज्ञानी भेटले नाहीत तर अमके-अमके करा, असे असे करा, असे सांगणारे कोणी उपदेशकही नाहीत ना?

**दादाश्री :** आता उपदेशक कशाला शोधत बसता? हे कलियुग आहे. आता तर लुटले जाण्याची पाळी आली आहे, तेव्हा उपदेशक कशाला शोधता? आता मिट्ट काळोख व्हायची वेळ आली आहे. आता सोनाराची दुकाने कशी उघडी असतील? जेव्हा सोनाराचे दुकान उघडे होते, तेव्हा माल खरेदी केला नाही. आणि आता जगाला माल मिळवून देण्यासाठी निघाला आहात? आता तर जग खूप दुःख आणि प्रचंड यातना सोसेल. हा तर या 'अक्रम विज्ञानाचा' अंतिम प्रकाश आहे. यात ज्याचे काम होईल त्याचे होईल. बाकी, तर रामाची माया!

## आयुष्यात वाढ ?

**प्रश्नकर्ता :** एखादा महात्मा 'सच्चिदानंद स्वरूप' असेल, ब्रह्मनिष्ठ असेल, तर तो स्वतःचे आयुष्य वाढवू शकतो का?

**दादाश्री :** 'आयुष्य वाढवू शकतो' असे जर कोणी म्हणत असेल तर तो एक प्रकारचा अहंकार आहे. निसर्गाने त्याला जे दीर्घ आयुष्य दिले आहे त्या आधारावर त्याला असे वाटते की मी आयुष्य वाढवले तर वाढू शकेल. आयुष्य वाढणार आहे म्हणून त्याला असा अहंकार उत्पन्न होतो. प्रत्यक्षात कोणीही आयुष्य वाढवू शकत नाही. या जगात संडासला जाण्याची पण शक्ती कोणाच्या हातात नाही.

**प्रश्नकर्ता :** 'सत्पुरुष' विधाता (विधिलिखिता)ला बदलू शकतात का?

**दादाश्री :** कोणीही बदलू शकत नाही. विधाताच यांना बदलतो. कोणी काही बदलू शकत नाही. हा सर्व फक्त 'इगोइजम' (अहंकार) आहे. पण हे असे चालायचेच. तुम्ही मात्र कोणाला चुकीचे ठरवू नका, कारण तो जर तुमच्यावर चिडला तर तुमच्याशी वाकडा वागेल आणि वैर धरील. म्हणून तुम्ही त्यांना म्हणा, 'साहेब, आपण बरोबर आहात. तुमचे म्हणणे आम्हाला आवडले!' असे म्हणून आपण पुढे वाटचाल करावी. नाही तर हे कधी संपणारच नाही. तुम्ही त्यांना 'चांगले आहात, वाईट आहात' असे म्हटले तर ते तुम्हाला सोडणार नाहीत. सतत तुमच्या सोबतच फिरत राहतील.

**प्रश्नकर्ता :** ईश्वराची प्राप्ती सत्पुरुषांच्या कृपेशिवाय होऊ शकत नाही. ते जर सत्पुरुष आहेत, तर विधिलिखित का टाळू शकत नाहीत?

**दादाश्री :** जर ते विधिलिखित टाळू शकतील असे असेल तर मग त्यांचे सत्पुरुषपण जाईल. त्यांच्या सर्व सिद्धी खर्च होऊन जातील. सत्पुरुषांजवळ खूपच, अपार सिद्धी असतात.

**प्रश्नकर्ता :** तर मग त्यांना त्यांची जी स्थिती असेल ती भोगावी लागते का?

**दादाश्री :** भोगल्याशिवाय गत्यंतर नाही. महावीर भगवंतांचा शिष्य गोशाला याने त्यांच्या दोन शिष्यांवर तेजोलेश्या फेकून त्यांना जाळून टाकले होते. तेव्हा त्यांच्या दुसऱ्या शिष्यांनी भगवंतांना म्हटले, 'साहेब! यांच्यावर जरा लक्ष तर द्या.' तेव्हा महावीर भगवंत म्हणाले, 'मी मोक्षदाता आहे. जीवनदाता नाही. मी कोणाचा रक्षक नाही.'

**प्रश्नकर्ता :** काही महापुरुषांनी काही मृत शरीरात जीव सोडून त्यांना चितेवरून उठविले आहे, तर ती कोणती शक्ती आहे?

**दादाश्री :** जर जीव सोडून चितेवरून उठवणे शक्य असेल तर कोणी कधी मरणारच नाही ना! या जगात असे जीव सोडणारा कोणी जन्माला आलाच नाही. जो असे करतो, तो फक्त निमित्त असतो. माझ्या निमित्ताने पण अशा खूप गोष्टी घडतात. आणि मी कबूल करतो की मी निमित्त आहे. तेव्हा तुम्ही असे काही चुकीचे मानून घेऊ नका.

**प्रश्नकर्ता :** म्हणजे याचा अर्थ हा की प्रत्यक्षात तो मेलेलाच नव्हता ना?

**दादाश्री :** हो, बरोबर आहे. तो मेलेलाच नव्हता. भयामुळे किंवा अशाच काही कारणामुळे इथे या वरच्या भागात (ब्रह्मरंध्रात) काहीतरी होते, (त्यामुळे तो मेला आहे असे वाटते) त्याला ते सत्पुरुष उतरवू शकतात.

**प्रश्नकर्ता :** ज्या महात्म्यांना निर्विकल्प समाधी असते, अशा महात्म्यांचा आत्मा या शरीरातून कशा प्रकारे बाहेर पडतो?

**दादाश्री :** निर्विकल्प समाधी असेल, त्यांचा आत्मा जेव्हा या शरीरातून बाहेर पडतो, तेव्हा संपूर्ण ब्रह्मांडात प्रकाश देऊन जातो. पूर्ण ब्रह्मांडाला प्रकाशित करतो.

**प्रश्नकर्ता :** निर्विकल्प समाधीत, पूर्ण ब्रह्मांडाला प्रकाशित करून हा आत्मा गेला, त्याची खूण काय? ते कसे समजते?

**दादाश्री :** ते 'ज्ञानी पुरुष' ओळखतात किंवा त्यांना महावीर ओळखतात.

**प्रश्नकर्ता :** 'ज्ञानी पुरुष' त्यांना कशा प्रकारे ओळखतात?

**दादाश्री :** 'ज्ञानी' तर ताबडतोब, त्यांना पाहताक्षणीच ओळखतात. त्यांच्यासाठी तर ते स्वाभाविक आहे. प्रत्येक जण आपापल्या स्वभावाला ताबडतोब ओळखतो.

## मृत्यूच्या वेळेची अवस्था

**प्रश्नकर्ता :** मृत्यूच्या वेळी काय स्थिती असते ते सांगा. एखाद्याचे डोळे उघडे राहतात, एखाद्याला संडास-लघवी होते.

**दादाश्री :** अंतिम समयी 'ज्ञानी'ला असे काही होत नाही. ज्ञानींचा आत्मा इंद्रियांमधून बाहेर पडत नाही. तो वेगळ्याच प्रकारे बाहेर पडतो. नाहीतर जे संसारी लोक आहेत, ज्यांना पुन्हा भटकायचे आहे, त्यांचा

आत्मा इंद्रियातून बाहेर पडतो. कोणाचा डोळ्यांतून, कोणाचा तोंडातून किंवा कोणत्याही छिद्रांतून बाहेर पडतो. पवित्र छिद्रातून बाहेर पडला तर खूप चांगले आणि जग ज्याला अपवित्र मानते अशा छिद्रातून बाहेर पडला तर ते वाईट मानले जाते. ते अधोगतीत नेणारे असते. पूर्वी काही संत डोक्यावर नारळ फोडून घेत असत. शिष्यांना सांगत असत की मी आता आजारी आहे, म्हणून माझ्या डोक्यावर नारळ फोडा. ते तर खूपच अधोगतीला नेणारे आहे. इथेच असून आत्मा काढण्याचा प्रयत्न केला. या टाळूला दशम स्थान म्हणतात. तिथून जर आत्मा स्वाभाविकपणे बाहेर पडला तर त्याचा प्रकाश फार वेगळ्याप्रकारचा असतो. तो प्रकाश संपूर्ण ब्रह्मांडात पसरतो.

**प्रश्नकर्ता :** अज्ञानी लोकांना पण तो प्रकाश दिसतो का?

**दादाश्री :** नाही, नाही. त्यांना तो दिसत नाही. ज्ञानींना ते सर्व दिसते. अज्ञानी लोकांना तर माझी बायको, माझी सासू, माझा मामा, ही जिलेबी, हा लाडू असेच सर्व दिसते.

**प्रश्नकर्ता :** समाधीमरणात शरीरात वेदना होत नसतात ना?

**दादाश्री :** या शरीरात वेदना असल्या तरीही समाधीमरण होते. पक्षाघात झाला असेल तरी पण त्याचे समाधीमरण होते. समाधीमरण म्हणजे काय की शेवटच्या तासात दादा दिसतात किंवा 'मी शुद्धात्मा आहे' असे भान राहते. असे भान राहिले, हा त्याचा हिशोब समोर आला.

**प्रश्नकर्ता :** मग त्या अवस्थेत त्याला दु:ख नसते ना?

**दादाश्री :** समाधी मरणात स्वत:ला कोणत्याच प्रकारचे दु:ख नसते. शेवटचा एक तास समाधीच असते. आपल्या येथे ज्ञान घेतल्यानंतर जितके जण मृत्यू पावले आहेत, त्यांचे समाधीमरण झाले आहे, पुराव्यासहित.

**प्रश्नकर्ता :** शेवटच्या तासात जर रौद्रध्यान झाले तर माणूस सगळे काही गमावतो का?

**दादाश्री :** मग तर सर्व संपले असेच म्हणावे लागेल. रौद्रध्यानच काय, आर्तध्यानसुद्धा होता कामा नये. माझ्या पाचव्या मुलीचे लग्न करायचे अजून राहून गेले असे मनात आले तरी ते आर्तध्यान झाले असे म्हणावे लागेल. त्यामुळे जनावर योनीत जावे लागते.

## प्रेतयोनी

**प्रश्नकर्ता :** काही अवगतीवाले जीव दुसऱ्या कोणाच्या शरीरात प्रवेश करतात आणि स्वत:ची इच्छा पूर्ण करतात. तर ते काय असते?

**दादाश्री :** असे आहे की ही भुते त्रास देत नाहीत. भुते तर देवयोनीवाली असतात. त्यांच्याबरोबर जर तुमचे चांगले ऋणानुबंध असतील तर ते फायदा करून देतात आणि वाईट ऋणानुबंध असतील तर त्रास देतात. आणि ज्या जीवांना मृत्यूनंतर ताबडतोब दुसरे स्थूल शरीर मिळत नाही, त्यांना मग भटकत राहावे लागते. जोपर्यंत दुसरे शरीर मिळत नाही. तोपर्यंत त्याला प्रेतयोनी म्हणतात. पण मग जेवणाशिवाय तर चालत नाही, म्हणून त्यांना दुसऱ्या शरीरात जाऊन खाणे खावे लागते.

**प्रश्नकर्ता :** कोणी जप, तप, माळ वगैरे करत असतील तरी पण त्यांना भूत लागू शकते?

**दादाश्री :** असा नियम नाही, परंतु जर तुमचा हिशोब असेल, तुम्ही कोणाला त्रास दिला असेल असा जीव जर अवगतीवाला झाला तर तो तुमचा सूड घेतल्याशिवाय राहतच नाही.

**प्रश्नकर्ता :** कोणी हनुमानचालीसा, गायत्री किंवा असा एखादा मंत्रजाप करीत असेल तर त्या मंत्रांचा त्याच्यावर परिणाम होतो का?

**दादाश्री :** हो, त्याने फायदा होतो. त्याच्यापासून ते दूर राहतात. हा नवकारमंत्र जरी पद्धतशीरपणे म्हटला तरीही ते दूर जातील.

**प्रश्नकर्ता :** आम्हाला देवलोक दाखवा ना!

**दादाश्री :** त्याचा काय फायदा! तुम्ही तुमच्या आत्म्याचे करा ना? देवलोक पाहण्यात मजा नाही. अनंत जन्मांपासून भटकत आहोत.

आपण तिथेही गेलो आहोत आणि इथेही आलो आहोत. त्यात काय पाहायचे? देवी-देवतांना अपार इंद्रियसुख असते. त्यामुळे ते पण विटले आहेत. हा देह कधी सुटेल याची ते वाट पाहत असतात. लाखो वर्षांचे त्यांचे आयुष्य असते, तर मग त्यांचा देह कसा सुटेल? तुम्हाला इथे एक महिनाभर लग्न समारंभात ठेवले आणि रोज पक्वाने खायला दिली तर तुम्हाला ते आवडेल का? तुम्ही तिथून पळूनच जाल ना? तसेच देवी-देवतांना तिथे चांगले वाटत नाही.

## सिद्धात्मा आणि सिद्धपुरुष

**प्रश्नकर्ता :** सिद्धपुरुष असतात त्यांचे एक खास सर्कल (वर्तुळ) असते ते पृथ्वीवर असोत किंवा जवळच्या एखाद्या ग्रहावर असोत, तर ते पृथ्वीवरील लोकांना मार्गदर्शन देत असतात ही गोष्ट खरी आहे का?

**दादाश्री :** सिद्ध मार्गदर्शन देत नाहीत. मार्गदर्शन देणारे संसारी आहेत. त्यांना लौकिक भाषेत संसारी सिद्ध म्हणतात.

**प्रश्नकर्ता :** त्यांना काहीच करायचे नसते?

**दादाश्री :** सिद्ध तर संपूर्ण भगवंत झालेले असतात. ते इथे नसतात. इथे देहधारी रूपात कोणीही सिद्ध नसतात. सिद्धांबद्दल ही जी बोलली जाते ती केवळ लौकिक गोष्ट आहे.

**प्रश्नकर्ता :** सिद्ध भगवंतांचे पण जग असते ना?

**दादाश्री :** ते सिद्धक्षेत्रात असतात, इथे कधीच नसतात.

**प्रश्नकर्ता :** ते सिद्ध देहधारी नसतात का?

**दादाश्री :** ते देहधारी नसतात. त्यांना तर परमात्मा म्हणतात, आणि या (देहधारी) सिद्धांना तर माणूस म्हणतात. तुम्ही त्यांना शिव्या दिल्यात तर ते तुमच्याशी भांडतील, नाहीतर तुम्हाला शाप देतील.

**प्रश्नकर्ता :** ज्या सिद्धांबद्दल तुम्ही बोलत आहात ते तर तेजस्वरूप किंवा प्रकाशस्वरूप असतात ना?

**दादाश्री :** हो, तेजस्वरूप असतात. त्यांच्यासाठी 'केवळ' (ॲबसोल्यूट, कैवल्य) हा एकच शब्द असतो. त्यांचे स्वरूप तर केवळ दर्शन, केवळ ज्ञान, अनंत सुख आणि परम ज्योती स्वरूप असते, स्व-पर प्रकाशक असते. ते स्वत:ला प्रकाशित करतात आणि पूर्ण ब्रह्मांडालाही प्रकाशित करतात.

## शुद्धात्म्याचे दर्शन

**प्रश्नकर्ता :** शुद्धात्म्याला कोणत्या प्रकारे पाहता येते?

**दादाश्री :** शुद्धात्मा पाहणे, याचा अर्थ काय आहे? तर हे पाहा, ही सोन्याची डबी आहे, ती डबी उघडून मी तुम्हाला त्यात ठेवलेला हिरा दाखवला आणि मग ती डबी बंद केली, म्हणून काय त्यातील हिरा नाहीसा झाला? ह्या डबीत हिरा आहे हे तुमच्या लक्षात राहते. कारण तुम्ही तो पाहिला होता. अरे, तेव्हा तुमच्या बुद्धीनेही ते 'स्वीकारले' होते, आम्ही 'ज्ञान' दिले तेव्हा तुमचे मन, बुद्धी, चित्त आणि अहंकार, या सर्वांनी ते 'स्वीकारले' होते. त्यानंतर मग शंका येतच नाही.

**प्रश्नकर्ता :** तुम्ही मार्ग दाखवला, परंतु जर त्या मार्गाने आम्ही गेलो नाही तर काय होईल?

**दादाश्री :** त्या मार्गाने जाणार नाही, हे शक्य आहे. परंतु स्वत:ची जाण्याची इच्छा मात्र हवी. स्वत:ला जायचेच नसेल तो उलट मार्गाने जाईल, पण स्वत:ला जायचे आहे आणि काही कर्मे अंतराय आणत असतील त्याला हरकत नाही. 'स्वत:'ला जायचे आहे हे नक्की असेल तर 'ज्ञानी पुरुषां'चे आशीर्वाद काम करतात. लाखो कर्मे आडवी आली तरी पण 'ज्ञानी पुरुषां'च्या कृपेने ती दूर होतील. परंतु ज्यांना स्वत:लाच वाकडे करून घ्यायचे असेल तर त्यावर काहीच उपाय नाही.

**प्रश्नकर्ता :** 'शुद्धात्म्या'चे लक्ष हरवले नाही तर त्याला 'समभावाने निकाल' केला असे म्हटले जाईल का?

**दादाश्री :** दुसऱ्या गोष्टीत 'इंटरेस्ट' (रुची) असेल तर शुद्धात्म्याचे

लक्ष हरवते. आपल्याला ज्या वस्तूंची रुची असेल त्या वस्तू तर आपल्याला मिळणारच. कढी सांडली तरी आपण आरडाओरडा करतो. कारण आपल्याला कढीत 'इंटरेस्ट' आहे. शेवटी या सर्व रुचीच काढून टाकायच्या आहेत. वस्तू काढून टाकायच्या नाहीत. काढून त्या वस्तू जाणारही नाहीत. सर्व जग वस्तू काढण्यासाठी धडपडत आहे. त्यासाठी डोकेफोड करत आहे. अरे, वस्तू जाणार नाहीत. त्या तर नशीबात लिहिलेल्याच आहेत. त्या वस्तूंमधील रुची काढून टाकायची आहे.

**प्रश्नकर्ता :** क्रमिक आणि अक्रममध्ये फरक तर फक्त गुरुकृपेचाच आहे ना?

**दादाश्री :** हो, फक्त गुरुकृपेचाच फरक आहे. इथे तर गुरु असे काही कोणी नसतेच. गुरु म्हणजे कोण? गुरु कोणाला म्हणावे? तर ज्याच्याकडे गुरुकिल्ली आहे तो. असे गुरु आपल्याला तारू शकतात आणि ज्यांच्याकडे गुरुकिल्ली नाही अशा गुरुंना तर 'जड' म्हणावे लागेल. जड म्हणजे स्वतः ही डुबतात आणि आपल्याला पण डुबवतात. नाहीतर इथे तर गुरुंची गरजच नाही. मला काही लोक विचारतात की 'आम्ही पूर्वी गुरु केले आहेत, त्यांना आता आम्ही सोडून द्यायला हवे का?' तर मी त्यांना म्हणतो 'नाही, त्यांना असू द्या.' व्यवहारिक गुरु तर हवेतच ना? आणि इथे तर अक्रम मार्गात भगवंतांची सरळ सरळ कृपा होते! 'चौदालोका'च्या नाथांची सरळच कृपा होते.

**प्रश्नकर्ता :** ज्ञान प्रकट होते, तेव्हा काय होते?

**दादाश्री :** ज्ञान प्रकट झाल्यावर मग कुठे ठोकर बसत नाही. (चिंता, कषाय, मतभेद होत नाहीत)

**प्रश्नकर्ता :** आणि आतमध्ये काय फरक पडतो?

**दादाश्री :** आतमध्ये अपार सुख बरसत असते, दुःख वाटतच नाही! दुःख, चिंता यांचा स्पर्शही होत नाही.

**प्रश्नकर्ता :** ज्या व्यक्तीला आत्मसाक्षात्कार झाला असेल, ती

व्यक्ती दुसऱ्या एखाद्याला आत्मसाक्षात्कार झाला आहे की नाही याची पारख करू शकते का?

**दादाश्री :** हो, पारख करू शकते. त्याचे काय आहे, आपण बाजारात भाजी घ्यायला जातो तेव्हा कोणती भाजी चांगली आहे असे पारखतो की नाही? तसेच हे ही कळू शकते.

**प्रश्नकर्ता :** तुम्ही जेव्हा भगवंत म्हणता, तेव्हा तुम्ही कोणाला उद्देशून संबोधन करता? महावीरांना का?

**दादाश्री :** नाही, महावीरांना नाही. भगवंत म्हणजे, आतमध्ये जो आत्मा आहे, परमात्मास्वरूप आहे, तो. ज्या आत्म्याला आपण परमात्मा म्हणतो, महावीर पण तेच आहेत. महावीर नामधारी आहेत. नामधारींबद्दल मी काही बोलू इच्छित नाही. नामधारी म्हटले की एकाला आवडेल आणि दुसऱ्याला आवडणार नाही, त्याचे डोके दुखेल. मूळ भगवंतामुळे कोणाचेही डोके दुखत नाही!

**प्रश्नकर्ता :** 'पंचम दीवो' शुद्धात्मा 'साधार', तर ते कुठला साधार सांगू इच्छितात?

**दादाश्री :** अजूनपर्यंत चेतनाचा आधार 'पुद्‌गल' होते, आता चेतनाचा आधार 'शुद्धात्मा' झाला. म्हणजेच 'स्वत:'च स्वत:चा आधार झाला. आता तो पुद्‌गलाच्या आधारावर नाही. सर्व जग 'पुद्‌गला'च्या आधारावर आहे.

भांड्यात तूप भरलेले असेल आणि पंडिताच्या मनात विचार येतो की भांड्याच्या आधाराने तूप आहे की तुपाच्या आधारावर भांडे आहे. असा विचार पंडितांनाच येतो, अबुध लोकांना येत नाही. पंडितांची बुद्धी तल्लख असते ना! मग नक्की काय आहे ते पाहण्यासाठी त्याने भांडे उलटे केले, मग त्याला समजले, अरे, हे तर भांड्यांच्या आधाराने तूप होते. याच प्रकारे या लोकांमध्ये पुद्‌गलाच्या आधाराने आत्मा आहे. स्वत: जेव्हा स्वत:च्या आधारावर येतो, 'मी' पुद्‌गलाच्या आधारावर नाही, हे जेव्हा त्याला समजते, तेव्हा शुद्धात्मा 'साधार' होतो. पुद्‌गलाच्या

आधारे असलेल्यांना भगवंतानी निराधार म्हटले आहे, अनाथ म्हटले आहे. आणि आत्म्याच्या आधारे असलेल्यांना सनाथ म्हटले आहे. 'साधार' झाल्यावर मग काहीच शिल्लक उरले नाही ना!

आता चंदुलालला कोणी शिव्या दिल्यातर तुम्ही 'चंदुलाल'ला सांगितले पाहिजे की 'चंदुलाल, तो तुम्हाला शिव्या घालत आहे पण आम्ही तुम्हाला मदत करू.' अशी 'प्रॅक्टिस' (सवय ) लावून घेतली पाहिजे. जर फटाके फोडायचे असतील, रॉकेटस् उडवायची असतील तर 'प्रॅक्टिस' करायला नको का? नाही तर आपणच आगीत भाजू. प्रत्येक गोष्टीची 'प्रॅक्टिस' करायला हवी.

आता जर कोणी तुम्हाला रागवत असेल तर तो 'चंदुलाल'ला रागवत आहे. 'तुम्हाला' तर कोणी ओळखतच नाही ना?

**प्रश्नकर्ता :** 'माय' (माझा) आत्मा असे म्हणतो म्हणजे तो 'प्रतिष्ठित आत्मा'च म्हणायचा ना?

**दादाश्री :** नाही, ज्ञान घेतल्यानंतर त्याला 'प्रतिष्ठित आत्मा' म्हणतात. आम्ही 'ज्ञान' देतो त्यानंतर 'शुद्धात्मा' आणि 'प्रतिष्ठित आत्मा' असे दोन विभाग होतात. तुम्ही 'शुद्धात्मा' झालात आणि दुसऱ्या भागात काय राहिले? 'प्रतिष्ठित आत्मा.' तुम्ही प्रतिष्ठा करून करून त्याला निर्माण केले आहे की 'हा मी आहे, हा मी आहे.' यातूनच प्रतिष्ठित आत्मा उत्पन्न झाला होता. तो आता 'डिस्चार्ज' स्वरूपात आहे. ज्याला ज्ञान नाही तो पण माझा आत्मा-माझा आत्मा पापी आहे, असे सर्व बोलत असतो. तो पण प्रतिष्ठित आत्मा आहे. परंतु त्यांच्यात 'शुद्धात्मा' आणि 'प्रतिष्ठित आत्मा' असा भेद निर्माण झालेला नसतो.

**प्रश्नकर्ता :** ज्ञान प्राप्ती झाल्यावर अपूर्व संधी मिळाली आहे अशी जाणीव होते. तर या अपूर्व संधीबद्दल सविस्तर सांगावे.

**दादाश्री :** अपूर्व संधी म्हणजे पूर्वी कधीही मिळाली नाही अशी संधी. ज्या संधीत स्वत:ला स्वत:चे भान प्रकट होते. त्या संधीला अपूर्व संधी म्हटले जाते.

**प्रश्नकर्ता :** हे सर्व जीव कुठून उत्पन्न झाले आहेत?

**दादाश्री :** ते उत्पन्न झालेलेच नाहीत. आत्मा अविनाशी आहे, शाश्वत आहे. अविनाशी उत्पन्न होत नाहीत. ज्यांचा नाशच होत नाही ते उत्पन्नही होत नाहीत. डोळ्यांनी दिसते ती सर्व भ्रांती आहे. या अवस्था आहेत, अवस्थांचा नाश होतो. वृद्धावस्था, तारुण्यावस्था या सगळ्यांचा नाश होतो, पण त्यात जो आत्मा असतो तो नेहमी तसाच्या तसाच राहतो.

**प्रश्नकर्ता :** जीवात्मा मेल्यानंतर परत येतो ना?

**दादाश्री :** असे आहे की, या 'फॉरेन'च्या लोकांचा, मुस्लिमांचा परत येत नाही, परंतु तुमचा परत येतो! म्हणजे तुमच्यावर भगवंतांची कृपा आहे! इथे मृत्यू झाला की लगेचच दुसऱ्या योनीत प्रवेश करतो. 'फॉरेन'च्या लोकांचा आत्मा परत येत नाही, पण प्रत्यक्षात तसे नाही. त्यांची तशी मान्यता आहे की इथे मृत्यू पावला की मृत्यू पावला. प्रत्यक्षात त्यांचा आत्मा सुद्धा परत येतो पण त्यांना ते समजत नाही. त्या लोकांना पुनर्जन्माची गोष्ट समजतच नाही ना?

**प्रश्नकर्ता :** आपल्या बहिणीला किंवा पत्नीला कोणी पळवून नेत असेल अशी घटना घडली तर आपण काय करायला हवे? वीतराग राहायला हवे? ज्ञाता-द्रष्टा राहायला हवे?

**दादाश्री :** पण ते तुमच्या हातात आहेच कुठे? हा तर 'डिस्चार्ज' आहे. त्या वेळी कशाचे काय होऊन जाईल? तुम्ही त्याला कितीतरी शिव्या द्याल! तो जर आमचे काही पळवून नेत असेल तर आम्ही वीतराग राहू. तुम्हाला तसे सामर्थ्यच नाही ना? तुम्ही तर भडकून उठाल.

**प्रश्नकर्ता :** आमच्याजवळ 'टाईम' असतो, इच्छा असते तरी पण आळस येतो असे का?

**दादाश्री :** दोन प्रकारचे लोक असतात. कामात आळस करणारे लोक असतात आणि कामात घाई करणारे लोक पण असतात. घाई करणाऱ्यांचे काहीच सुरळीत होत नाही. 'नॉर्मलिटीत' राहणेच चांगले.

तुम्हाला 'चंदुलाल'ला टोकावे लागते. 'एवढा आळस का करत आहात? विनाकारण वेळ का वाया घालवीत आहात.' असे तुम्ही 'चंदुलाल'ला रागवावे. त्याला तुरुंगात टाकायचे नाही किंवा उपाशीही ठेवायचे नाही. खा–प्या पण त्याला थोडे रागे भरा.

**प्रश्नकर्ता :** आमच्या समोर जे काम येईल ते तर करावेच लागेल ना?

**दादाश्री :** त्या गोष्टी तर आपोआप होतच राहतात. त्यांना कुरवाळत बसण्याची गरज नाही. आपण संकटाला महत्त्व देतो आणि म्हणतो, 'नाही, मला यात लक्ष घातलेच पाहिजे', असे म्हटले की ती डोक्यावर चढतात. तुमचे काम तर होईलच. तुम्ही जर त्याला 'पाहत' राहिलात तर ते नियमानुसारच होईल. एवढे सारे 'सायंटिफिक सरकमस्टेन्शियल एविडेन्सेस्' (वैज्ञानिक सांयोगिक पुरावे) आहेत की तुम्हाला काहीही मेहनत करावी लागणार नाही. तुम्ही फक्त मला व्यवहारात आदर्श राहायचे आहे अशी भावना बाळगा. व्यवहार बिघडता कामा नये. आणि जर बिघडलाच तर त्याचा 'समभावाने निकाल' करायला हवा.

**प्रश्नकर्ता :** ज्ञानाचे अपचन म्हणजे नक्की काय? त्याची लक्षणे काय?

**दादाश्री :** अपचन म्हणजे अजीर्ण.

**प्रश्नकर्ता :** त्याला थांबवायचा उपाय काय? त्याची लक्षणे काय? आपले 'ज्ञान' घेतल्यावरही अपचन होते का?

**दादाश्री :** एखाद्यालाच होते. सगळ्यांना होत नाही. त्याने जर एक बाजू घेतली तर ज्ञानाचे अजीर्ण झाले असे म्हणतात. असा माणूस व्यवहारात कच्चा पडतो. कॉलेजात जात नाही, गेला तर अभ्यासात लक्ष देत नाही. 'मी तर आत्मा आहे, आत्मा आहे' असे करत बसतो. तेव्हा आम्ही समजून जातो की याला अजीर्ण झाले आहे. अजीर्ण झाले नाही असे केव्हा म्हणावे तर जेव्हा तो व्यवहारात 'कम्प्लीट' (पूर्ण) असेल,

तेव्हा. स्वतःची सर्व कर्तव्ये पूर्ण करायला हवीत, आणि ती सर्व कर्तव्ये अनिवार्य आहेत. त्यात असे चुकीचे भाव केले तर ते चालणार नाही.

**प्रश्नकर्ता :** सर्वच शुद्धात्मा झाले तर या जगाच्या संचालनात विक्षेप होणार नाही का?

**दादाश्री :** सर्वच जीव जर शुद्धात्मा झालेत तर संचालन होणारच नाही. यातून सिद्ध व्हायचे आहे. मनुष्यातूनच हळूहळू सिद्ध व्हायचे आहे. साऱ्या जगातून एखादा-दुसराच सिद्ध होतो. त्यानंतर काही कालावधीनंतर परत एक-दोन सिद्ध होतात. म्हणजेच सिद्ध होणे इतके सोपे नसते. सिद्ध होऊ शकतो. माणूस परमात्मा होऊ शकतो! परंतु 'स्वतःचे' ज्ञान झाल्याने, आत्म्याला व्यक्त केल्याने, सिद्ध होऊ शकतो! आत्माच परमात्मा बनू शकतो!

**प्रश्नकर्ता :** आमच्याकडे एक संत आले होते, ते 'ओहम् आणि सोहम्' म्हणत होते, ते काय आहे?

**दादाश्री :** ॐ आणि सोहम्, दोन शब्द आहेत, ओहम् असा शब्द नाही. आपला जो ॐ आहे तो एक उच्चतम मंत्र आहे. तो म्हटल्याने खूप लाभ होतो आणि सोहम्चा अर्थ आहे 'तो मी आहे, जो आतमध्ये आहे, तो मी आहे.' हे दोन्ही मंत्र लाभदायक आहेत.

## जीवन काय आहे?

**प्रश्नकर्ता :** तुमच्या हिशोबाने जीवन काय आहे?

**दादाश्री :** माझ्या हिशोबाने जीवन म्हणजे तुरुंग आहे. तसे चार प्रकारचे तुरुंग आहेत. देवलोक (देवी-देवता) नजरकैदेत आहेत. माणसे साध्या कैदेत आहेत. आणि मनुष्याव्यतिरिक्त या पृथ्वीवर जे जीव आहेत, ज्यांना तिर्यंच म्हटले जाते ते सक्त मजुरीच्या कैदेत आहेत आणि चौथा प्रकार आहे आजीवन कैद. ते नरकगतीच्या लोकांसाठी आहे. तुला हा तुरुंग आवडतो का?

**प्रश्नकर्ता :** आवडत तर नाही पण आवडून घ्यावा लागतो.

**दादाश्री :** हो, काय करणार? कुठे जाणार? अडकून तर पडलो मग जाणार कुठे? आणि तू एकटाच नाही, हे सर्व साधू, संत, आचार्य, महाराज सर्वच अडकलेले आहेत. तर आता जाणार तरी कुठे? समुद्रात बुडावे म्हटले तर तिथेही पोलिस पकडतील. 'कशाला आत्महत्या करतोस?' असे विचारतील. म्हणजे आत्महत्या पण करू देत नाहीत. इतके चांगले सरकार आले आहे की आत्महत्या करायची म्हटली तरी दुसरा गुन्हा लागू करतात. 'इथेच सर्व कर्मे भोगून पूर्ण करा' असे म्हणतात.

**प्रश्नकर्ता :** जीवनात सुखी होण्यासाठी काय करावे?

**दादाश्री :** तुला कसे सुख हवे आहे? विनाशी सुख हवे की 'इटरनल' (शाश्वत)?

**प्रश्नकर्ता :** 'इटरनल.'

**दादाश्री :** 'इटरनल' सुख हवे असेल तर इथे ये आणि विनाशी सुख हवे असेल तर त्यासाठी मी तुला मार्ग सांगतो. अधूनमधून इथे येत जा आणि दर्शन घेत जा. मी आशीर्वाद देत जाईन. तुझे विनाशी सुख वाढत जाईल. आणि जर 'इटरनल' सुख हवे असेल तर त्यासाठी माझ्याजवळ ये. एकदा मिळाल्यावर ते सुख तुझ्यापासून कधीच जाणार नाही. तुला 'इटरनल' सुख नको आहे ना?

**प्रश्नकर्ता :** शाश्वत सुख हवे. मी येईन तुमच्याकडे.

## मोक्षमार्ग

आता या काळात मोक्षमार्ग राहिलाच नाही एक गुंजभर पण नाही. जणू काही त्याचा लोपच झाला आहे. आता तर संसारमार्ग सुद्धा खरा राहिला नाही.

**प्रश्नकर्ता :** मोक्षमार्गात क्रियांची गरज आहे का?

**दादाश्री :** मोक्षमार्गात अशा कोणत्याच क्रिया नसतात, तिथे तर

फक्त ज्ञानक्रिया केली तरच मोक्षाला जाता येते. अज्ञानक्रियेने मोक्ष होत नाही. संपूर्ण दिवस सामायिक केले तरी मोक्ष होणार नाही, कारण त्या क्रिया 'मी करतो' असे तो म्हणतो. 'मी करतो' हेच बंधन आहे. या काळात तर परत मनुष्य जन्म मिळाला तरी खूप चांगले म्हणायचे. रौद्रध्यान आणि आर्तध्यान या खेरीज दुसरे काहीही केलेले नाही. नरकगतीवाले जीव पण कमी आहेत. फक्त रौद्रध्यान असेल तर ते नरकगतीत जातील. आणि थोडेसे आर्तध्यान आणि थोडेसे धर्मध्यान असेल तरी परत मनुष्यजन्मात येऊ शकेल. त्याला तर धर्मध्यान पण माहीत नाही. धर्मध्यान समजले तरी काम होईल.

**प्रश्नकर्ता :** सकाळी उठल्यापासूनच दुकान आणि गिऱ्हाईक यांची आठवण येत असेल तर धर्मध्यानात कसे राहावे?

**दादाश्री :** यात कोणाचा दोष नाही. नाइलाजाने करावे लागत आहे.

**प्रश्नकर्ता :** यातून कसे सुटायचे?

**दादाश्री :** तुम्ही पुस्तकात वाचले नाही का?

**प्रश्नकर्ता :** पूर्ण वाचले नाही.

**दादाश्री :** आपणहून सुटता येईल असे नाही. जो बंधनातून मुक्त झालेला आहे तो सोडवू शकतो. जो स्वत:च बुडत असेल तो दुसऱ्यांना तारू शकत नाही. ज्याला मोक्ष प्राप्त झाला असेल तोच दुसऱ्याला मोक्ष देऊ शकतो.

आता सुमारे दहा टक्के लोक परत मनुष्यगतीत येतील. बाकीचे सर्व तिर्यंचगतीचे पाहुणे आहेत.

**प्रश्नकर्ता :** जैन धर्म मिळावा आणि मनुष्यजन्म मिळावा असा निश्चय केला असेल तर?

**दादाश्री :** तसा निश्चय कोण करणार नाही? पण आर्तध्यान आणि रौद्रध्यान केले तर तिर्यंचमध्येच जाणार ना? रौद्रध्यान म्हणजे समोरच्याला

कोणत्याही प्रकारचे दु:ख पोहोचविणे आणि आर्तध्यान म्हणजे (त्यात) स्वत:लाच त्रास होतो. तो दुसऱ्याला किंचितमात्र दु:ख देत नाही.

जरी कितीही निश्चय केला, काहीही केले, सतत भटकत राहिला तरी काहीही निष्पन्न होणार नाही. अनंत जन्मांपासून भटकतच राहिला आहे ना? जेव्हा 'मुक्त पुरुष' भेटले तेव्हा त्यांना ऐकत राहिलात, पण त्यांच्या आज्ञेत राहिला नाहीत. आज्ञेत राहणे हाच धर्म आहे. 'मुक्त पुरुष' स्वत:च मोक्षाला नेऊ शकतात. त्यांच्याकडे त्यासाठी लायसेन्स आहे. 'ज्ञानी पुरुषां'कडून हे सर्व समजून घ्यायला हवे.

आपल्याकडे दोन मार्ग आहेत : 'रिलेटिव्ह' मार्ग आणि 'रियल' मार्ग. कित्येक जण धर्मध्यान शिकवतात पण खरे तर कोणाला ते येत नाही. आणि आम्ही येथे जे धर्मध्यान शिकवतो ते खूप उच्च प्रकारचे आहे. कोणी जर ते आमच्याकडून समजून घेतले तर त्याचे काम होऊन जाईल.

**प्रश्नकर्ता :** धर्मध्यानात गेल्यानंतर त्यात पुढे प्रगती करत जातो तसतसा तो शुक्लध्यानाकडे वळतो ना?

**दादाश्री :** नाही. धर्मध्यानाकडे गेला तरी शुक्लध्यानाकडे स्वत: जाऊ शकत नाही. आपणहून प्रकट होऊ शकेल असे शुक्लध्यान नसते. 'ज्ञानी पुरुष' किंवा 'केवळ ज्ञानी' यांच्या दर्शनाशिवाय शुक्लध्यान प्रकट होऊ शकत नाही. ते निर्विकल्प पद आहे. अतीन्द्रियपद आहे. म्हणजेच दुसऱ्या कुठल्याच प्रकाराने ते प्रकट होत नाही. आम्ही तुम्हाला धर्मध्यान पण देतो आणि शुक्लध्यान पण देतो.

## ज्ञानींची विराधना

**प्रश्नकर्ता :** बोलताना, तुम्हाला प्रश्न विचारताना कुठेतरी अविनय होत असतो. मनात असा अविनय करण्याचा भाव नसतो, पण तरीही बोलताना अविनय होत असेल तर याला आम्ही विराधना करतो असे म्हणायचे का?

**दादाश्री :** बोलताना जर तुम्ही विराधक बनलात तर आम्ही

बोलणेच बंद करतो. कारण आमच्या लक्षात येते की हे तर आता उलट रस्त्यावर चालले आहे.

**प्रश्नकर्ता :** पण आमच्याकडून तुमची विराधना झाली तर?

**दादाश्री :** आमची विराधना करणारे परमाणू तुमच्यात नसतातच. अशी शंका देखील आमच्या मनात येत नाही. दिवसभर ज्यांची आराधना करत आहात, त्यांची विराधना होईलच कशी? 'दादां'ची आराधना केली, म्हणजे 'शुद्धात्म्या'ची आराधना केल्यासारखीच आहे, आणि तीच परमात्म्याची आराधना आहे, आणि तेच मोक्षाचे कारण आहे.

## आत्मसुखाचे लक्षण

**दादाश्री :** सुख आत्म्यातून येते की पुद्गलातून?

**प्रश्नकर्ता :** आत्म्यातून.

**दादाश्री :** हे आत्म्याचे सुख आहे की पुद्गलाचे हे कसे समजेल?

**प्रश्नकर्ता :** तो तर अतीन्द्रिय अनुभव असतो ना?

**दादाश्री :** हे सगळ्यांनाच माहीत नसते. आत्म्याच्या सुखाचे लक्षण म्हणजे निराकूळता असते. थोडी पण आकूळता-व्याकूळता असेल तर समजावे की उपयोग दुसऱ्या ठिकाणी आहे. मार्ग चुकला. बाहेरून अस्वस्थ होऊन आला आणि मग पंखा लावला तर खूप चांगले वाटते. (पण) याला शुद्ध उपयोग म्हणत नाहीत. त्यालाही जाणायला हवे. अशाता वेदनीय (दु:ख परिणाम) असेल तर तेही जाणले पाहिजे आणि तरी निराकूळता पण राहिली पाहिजे. दोन्हींना 'जाणले' पाहिजे. शाता वेदनीय (सुख परिणाम) बरोबर तन्मयाकार झालात तर तीही चूक म्हणावी लागेल.

## वेदनीय उदय - ज्ञानजागृती

**प्रश्नकर्ता :** शाता वेदनीयमध्ये गोडी तर वाटते ना?

**दादाश्री :** गोडी वाटते, पण ती गोडी जाणायला हवी. त्याक्षणी

ज्ञान हजर असायला हवे की ही शाता वेदनीय आहे आणि ही निराकूळता आहे. अशाता वेदनीय आली, तर ही अशाता वेदनीय आहे असे तो जाणतो. म्हणजे बाहेर अशाता असते आणि आतमध्ये निराकूळता असते!

सुखी होणे किंवा दुःखी होणे म्हणजे भोक्ता होणे. कर्ता आणि भोक्ता या सगळ्यात कर्मबंधन होते आणि ज्ञाता असल्यावर कर्म बांधले जात नाही. आपण जाणावे की आत्ता 'चंदुभाई'ला अशाता वेदनीय होत आहे. सुखी किंवा दुःखी होणे याला काय अर्थ आहे?

मरण आज येवो नाहीतर पंचवीस वर्षांनंतर येवो त्याला काहीच हरकत नाही.

**प्रश्नकर्ता :** मृत्यूची भीती वाटत नाही पण त्यावेळी जे दुःख होते त्याची भीती वाटते.

**दादाश्री :** कसले दुःख?

**प्रश्नकर्ता :** शारीरिक व्याधी.

**दादाश्री :** त्यात कसली भीती? 'व्यवस्थित' आहे ना? 'व्यवस्थित'मध्ये आंधळा होणार असेल तर आंधळा होईल ना? मग त्यात भीती कसली? आपण 'व्यवस्थित'ला 'एक्सेप्ट' केले आहे, मग कधीच काही स्पर्श करणार नाही, भीती बाळगण्यासारखे काहीच नाही. निर्भय होऊन फिरत राहा.

**प्रश्नकर्ता :** वेदनेचे भय वाटत राहते.

**दादाश्री :** वेदना होणारच नाहीत तर मग वेदनेचे भय कसे असणार? वेदना तर ज्याला भीती वाटते त्यालाच होते. ज्याला भीतीच नाही त्याला कसली वेदना? हा जो तुमचा 'वणिक माल' भरलेला आहे ना? तो माल अगदी नरम असतो.

आपण सफरचंद खाल्ले आणि मग पेरू खाल्ला, तर त्या दोघांत फरक नाही का? पेरू जरा कडक असतो, आणि सफरचंद खाताना

थोडे मऊ वाटते. म्हणून तुम्ही 'चंदुभाई'ला सांगावे की 'दादां'नी म्हटले आहे : 'व्यवस्थित'. व्यवस्थित म्हटल्यावर मग भीती कसली?

**प्रश्नकर्ता :** दोन दिवस डोके दुखत होते ते अजिबात सहन होत नव्हते.

**दादाश्री :** 'मला सहन होत नाही' असे म्हटले की ते चिकटते! पण 'आपण' तर म्हणावे 'चंदुभाई, डोके खूप दुखत आहे का? मी जरा चोळून देतो. मग कमी होईल.' पण 'मला दुखत आहे' असे म्हटले की ते चिकटेल! ते तर खूप मोठे भूत आहे.

**प्रश्नकर्ता :** शाता गोड वाटते आणि अशाता नकोशी वाटते.

**दादाश्री :** असे 'चंदुभाई'ला वाटते ना? 'चंदुभाई'ला आपण म्हणावे की आता डिक्शनरी (शब्दकोश) बदलून टाका. अशाता सुखदायक आणि शाता दु:खदायक. सुख-दु:ख हे सारे काल्पनिक आहे. माझा हा एक एक शब्द सेट करून बघा, उपयोगात आणून बघा. मग जर तुमच्यावर थोडा पण परिणाम झाला तर सांगा.

**प्रश्नकर्ता :** काही तरी मार्ग काढण्यासाठीच तर मी हा प्रश्न विचारत आहे.

**दादाश्री :** तुम्ही मला विचारावे. मग मी सांगेन त्या प्रमाणे करावे. मार्ग तर हाच आहे. आणि मला दुखत आहे असे तर डोक्यावर घ्यायचेच नाही. कोणी विचारले, 'तुम्हाला काय होत आहे?' तर सांगावे 'शेजाऱ्याचे डोके दुखत आहे, आणि 'मी ते जाणतो.' आणि 'हा' शेजारी आहे अशी 'तुमची' खात्री झाली आहे ना?

**प्रश्नकर्ता :** हो.

**दादाश्री :** मग दु:ख कशासाठी? शेजारी (चंदुभाई) रडत असले तर काय आपणही रडायचे? शेजाऱ्याकडे तर भांडणे होतच राहतील. आणि बायकोबरोबर कोणाची भांडणे होत नाहीत? 'आपण' तर अविवाहित आहोत, मग 'आपण' का रडायचे? जो विवाहित आहे तो

रडेल. ‘आपण’ लग्न केलेले नाही! आणि विधुरही झालेलो नाही! मग ‘आपण’ कशाला रडायचे? उलट आपण तर शेजाऱ्याला शांत केले पाहिजे की, ‘भाऊ, रडू नकोस, ‘आम्ही’ आहोत तुझ्याबरोबर. डोन्ट वरी, घाबरू नकोस’ असे म्हणावे.

## प्रकृतीचे त्रास देणे

हा ‘वणिक’ माल, म्हणून त्रास होण्यापूर्वीच घाबरू लागतो. आपण तर चंदुभाईला सांगावे की, ‘तुम्हाला काहीही होणार नाही.’ मनात असाही विचार येईल की त्या माणसाला तर चालताही येत नाही, मलाही असे झाले तर? असा विचार आला तर ‘आपण’ सांगावे, ‘चंदुभाई, आम्ही आहोत ना! काहीही होणार नाही.’ ‘तुम्ही’ असे वेगळेपणाच्या व्यवहाराने बोला ना. हे तर सायन्स आहे. ‘मला झाले असे म्हटले की भूत लागेल. म्हणूनच जगाला सारी भुते लागली आहेत.

आपण स्वत: परमात्मा आहोत मग हे सर्व कशाला? थोडीफार परमात्मपणाची शक्ती तुम्हाला दिसली आहे की नाही? ‘तुम्ही परमात्मा आहात’ असे भान, अशी शक्ती तुमच्यात उत्पन्न झाली आहे की नाही?

**प्रश्नकर्ता :** हो.

**दादाश्री :** मग काय अडचण आहे? ज्याला थोडी शक्ती उत्पन्न झाली, त्याला सर्व शक्ती आहेत हे निश्चित झाले. तुमचा कोणी अपमान केला तरी तुमच्यावर त्याचा परिणाम होत नाही, तेव्हा समजते की, ‘अहाहा! एवढी प्रचंड शक्ती!’ आता तर थोडीशीच बाहेर पडली आहे. आता तर अजून बाहेर पडेल. अनंत शक्तींचा हळूहळू अनुभव येईल!

हे ‘ए. एम. पटेल’ हे देखील माणूसच आहेत ना? तुमच्यासारखेच आहेत ना ते? माणसाला सर्व काही होत असते. काय होत नाही? पण ‘आम्ही’ तर दु:ख येण्यापूर्वीच आधार देतो, की ‘आम्ही आहोत ना, मग तुम्ही कशाला काळजी करता?’ आम्ही तर शेजाऱ्याच्या शेजाऱ्यालाही सांगतो ‘आम्ही आहोत ना तुमच्याबरोबर!’ जिथे भगवंत आहेत, तिथे कसली कमतरता असणार?

तुम्ही वेगळेपणाने बोलून तर पाहा. क्षत्रियांसारखी हिम्मत असायला हवी. आतापर्यंत तुम्ही निराधार होता. शास्त्रकारांनी याला अनाथ म्हटले आहे. पण आता तुम्ही सनाथ झाला आहात. तेव्हा आता तुम्ही 'मला झाले आहे' असे म्हणून आधार देऊ नका. असा आधार दिलात तर ते दु:ख संपणार नाही. माझे डोके दुखत आहे असे म्हणून जर आधार दिला तर ते दु:ख संपेल की राहील?

**प्रश्नकर्ता :** राहील.

**दादाश्री :** आधार दिलात तर राहील. हे पूर्ण सायन्सच आहे. याचा उपयोग करता आला तर काम होईल. थोडे जरी चुकलात तर मात्र त्याचा परिणाम होईल, दुसरे काही नुकसान होणार नाही पण तुम्हाला परिणाम भोगावा लागेल.

**प्रश्नकर्ता :** अशा भावाने, अशाता भावाने *निर्जरा* होईल ना? (*निर्जरा* – आत्मप्रदेशातून कर्मे वेगळी होणे.)

**दादाश्री :** ते *निर्जरा* होण्यासाठीच आलेले असते, परंतु असे आहे की तोपर्यंत आपले सुख येणे बंद होते ना? आपले सुखाचे वेदन बंद होते. अशाता वेदनीयला हरकत नाही. तिची तर *निर्जराच* होत असते.

## वेदण्याची पद्धत बदला

म्हणूनच आता तुम्ही पद्धत बदला की मग वेदना कमी होईल, आणि तसतसे आतून जास्त सुख मिळत जाईल, कारण बाहेर गोंधळला तर आतून सुख मिळणे कमी होते. तुम्ही 'चंदुभाई'ला आरशासमोर बसवून असे हळुवार हात फिरवून म्हणा, 'आम्ही आहोत आणि तुम्ही आहात. दोन आहोत ह्याची तर खात्री आहे ना? त्यात काही खोटेपणा नाही ना?'

**प्रश्नकर्ता :** नाही, दोन आहेतच.

**दादाश्री :** हा शेजारी काही जाणत नाही हे पण नक्की आहे

ना? आणि तुम्ही जाणकार आहात. शेजाऱ्याला तर डोके दुखत आहे हे माहीतच नाही. पण तुम्हाला माहीत आहे. म्हणून तुम्ही म्हणा, 'डोके दुखत आहे ते आम्हाला माहीत आहे. आता थोड्यावेळाने ते ठीक होईल. शांत राहा!' असे म्हणून हळुवार खांद्यावर थोपटा. शेजाऱ्याला तर आपण सांभाळायलाच हवे ना? आणि चांगली पुरणपोळी असेल, शुद्ध तूप असेल, तर दोन पुरणपोळ्या खाऊही घालाव्यात! 'खाऊन झोपा' असे म्हणावे. *पाडाने वांके पखाली ने डाम शा माटे?* (रेड्याच्या चुकीची शिक्षा गुराख्याला कशासाठी?)

**प्रश्नकर्ता :** यात रेडा कोण?

**दादाश्री :** यात सर्व दोष मनाचा आहे. मनाच्या चंचलतेमुळे बिचाऱ्या पोटाला उपाशी राहावे लागते. यात मन रेडा आहे. पोट गुराखी आहे. दोष मनाचा आहे पण लोक शिक्षा पोटाला देतात. भजी-जिलेबी दिसली की मनावरचा ताबा सुटतो, आणि मग पोटात तडस लागते. दुसऱ्या दिवशी तब्येत बिघडली की उपासही करावा लागतो. मग धर्माच्या नावावर करा किंवा कोणत्याही नावाने, पण उपास तर करावाच लागतो ना?

## सम्यक् तप

भगवंतांनी किती चांगले उणोदरी तप सांगितले आहे! दोन भाग जेवणाचे, एक भाग पाण्याचा आणि एक भाग हवेचा. या प्रकारे चार भाग करून जेवायचे.

भगवंतांनी ज्ञान-दर्शन-चारित्र्य असे तीनच प्रकार सांगितलेले नाहीत, तर तप हा चौथा प्रकारही सांगितला आहे. मोक्षाचे चार आधारस्तंभ आहेत. क्रमिक मार्गातही चार आधारस्तंभ आहेत आणि येथे ह्या 'अक्रम' मार्गात पण चारच आधारस्तंभ आहेत. तप कोणते? तर जेव्हा वेदना होत असतील ते. तुमचे डोके दुखते ती वेदना. खरे तर तिला वेदना मानली जात नाही. 'स्वत:' तर तिला जाणतच राहतो. परंतु अशा दुसऱ्या काही वेदना, कोणी हात कापत असेल, घासून घासून

कापत असेल, अशा संयोगात तुम्ही अडकला असाल, तर त्याला वेदना म्हणतात. अशा वेळी तप करायचे असते. भगवंतांनी कोणते तप सांगितले आहे? तुम्ही 'होम डिपार्टमेंट'मध्ये आहात. स्वपरिणतीत आहात. तेव्हा परपरिणती उत्पन्न होऊ देऊ नये, असे तप करायचे आहे. हे परपरिणाम आहेत, ते माझे नाहीत, या प्रकारे स्वपरिणामात दृढपणे राहणे, हेच तप आहे.

असे तप गजसुकुमारने केले होते. ते शुद्धात्म्याच्या ध्यानात होते तेव्हा त्यांच्या सासऱ्याने त्यांच्या डोक्यावर मातीची शेगडी बनवून त्यात धगधगीत निखारे भरले. ते पाहिल्यावर त्यांना वाटले की 'ओहोहो! हे सासरेबुवा तर मला मोक्षाची पगडी बांधत आहेत.' ते मग शुद्धात्म्याच्या ध्यानात श्रेणी चढत चढत केवळज्ञान प्राप्त करून मोक्षाला गेले.

## मोक्षाचा मार्ग शूरवीरांचा...

या शरीराला आपण म्हणावे की 'हे शरीरा! हे मना! हे वाणी! कधी ना कधी तर लोक तुम्हाला जाळणारच आहेत तर त्याऐवजी आम्हीच तुम्हाला जाळून टाकले तर त्यात काय वाईट आहे?'

म्हणजेच क्षत्रिय व्हा. जे स्वरूप आपले नाहीच तिथे मग कसला त्रास? हे स्वरूप तुमचे नाही असे 'ज्ञानी पुरुषां'नी तुम्हाला सांगितले, आणि ते तुम्हाला बुद्धीने समजले आहे, मग कसला त्रास?

तुमचे फक्त एकच घर असेल, तर ते मोडणे जीवावर येते. पण मग खूप कर्ज झाले म्हणून तुम्ही ते घर विकून टाकता त्याची कागदपत्रे पण होतात. त्यानंतर जर ते घर मोडले आणि तुम्ही आरडाओरडा केला की 'हे माझे घर आहे, माझे घर आहे', तर ते किती वाईट दिसेल?

**प्रश्नकर्ता :** बोलण्यास हरकत नाही पण जेव्हा वेदनीय हजर होते तेव्हा ती त्याचा प्रताप दाखवतेच.

**दादाश्री :** तुम्हाला कसली वेदनीय? (खरी) वेदनीय तर जेव्हा पक्षाघात झाला असेल तेव्हा त्याला वेदनीय म्हणतात. याला वेदनीय

कसे म्हणायचे? पोटात दुखले, डोके दुखले किंवा ठणका लागला तर त्याला वेदनीय कसे म्हणायचे? आपल्या एका महात्म्यांना पक्षाघात झाला होता. तेव्हा ते मला म्हणाले, 'दादा, ह्या मंगळदासला भेटायला येतात ते सर्व मंगळदासला पाहत असतात आणि 'मी' पण ह्या मंगळदासला पाहत असतो!'

**प्रश्नकर्ता :** जोपर्यंत आत्म्याचे स्पष्टवेदन होत नाही, अनंत स्वरूपाचे वेदन होत नाही तोपर्यंत दुसरे कसले ना कसले तरी वेदन असतेच ना? उदाहरणार्थ शाता-अशाता.

**दादाश्री :** त्याचे काय आहे की वेदनेचा स्वभावच असा आहे की ती परकी आहे असे जर जाणले तर मग तो जाणतच राहतो की ही (वेदना) परकीच आहे. तो फक्त जाणतच राहतो, वेदत नाही. पण ही वेदना 'मला होत आहे', असे म्हटले की मग वेदतो. आणि जर 'हे सहन होत नाही' असे म्हटले की ती वेदना दहा पट वाटते. 'सहन होत नाही', असे तर कधी बोलूच नये.

हा पाय मोडत असेल तर दुसऱ्या पायालाही म्हणावे, तू पण मोड. आपण दिवाळेच काढायचे. आता मोक्षमार्ग हाताशी आला आहे म्हणून जरा हिम्मत दाखवावी लागेल. उवा पडल्या म्हणून धोतर कशाला सोडायचे? उवांना वेचून फेकून द्यायचे.

जर कोणी तुमच्याबरोबर कषायी वाणी बोलला तर ते तुम्हाला सहन होईल का?

**प्रश्नकर्ता :** ते जरा दूरचे आहे म्हणून जास्त काही वाटत नाही.

**दादाश्री :** सर्व साधारणपणे माणसांचा स्वभाव कसा असतो? तर ते शारीरिक दु:खे सहन करतात पण कषायी वाणी सहन करत नाहीत. हे (पुद्गल) मला चिकटून आहे असेच ते मानतात. खरे म्हणजे ते एवढे चिकटलेले नाही, फक्त स्पर्शच आहे, एवढेच. आत्म्याचा आणि पुद्गलाचा दोघांचा फक्त स्पर्शच होत आहे. कधीच एकाकार झालेले नाही. पण आत्म्याचा गुण असा आहे की बोलताक्षणीच, जसे बोलाल

तसा त्याचा परिणाम होतो. म्हणून क्षत्रियपणाचा उपयोग करायला हवा. काही काळ आमच्या सहवासात राहायला हवे.

आत्म्याचा स्वभाव कसा आहे? जसे चिंतन करील, तसा तो ताबडतोब होऊन जातो. सुखमय चिंतन केले तर सुखी होतो, दु:खमय चिंतन केले तर दु:खी होतो. म्हणूनच यात दुसरे कुठले चिंतन होणार नाही यासाठी खूप जागृत राहायचे आहे. माझे डोके दुखत आहे. असे चिंतन होता कामा नये!

**प्रश्नकर्ता :** चिंतन होत नाही पण वातावरण बिघडते.

**दादाश्री :** वातावरणाचा परिणाम होतो पण आपण मला दुखले असे बोलता कामा नये. चंदुभाईचे डोके दुखत आहे असे आपण म्हटले पाहिजे.

ही तर केवळ भीती आहे. एका माणसाकडून कडू औषध प्यायले जात नव्हते. तेव्हा मी त्याच्या समोरच जसे आपण चहा आणि चपाती खातो तसे कडू औषध आणि चपाती आरामात खाल्ली. तो मनुष्य तर चकीत झाला, आणि म्हणाला, 'तुम्ही तर चहासारखेच पीत आहात!' अरे हो, चहासारखेच पिऊ शकतो. तुला फक्त भीतीने घेरले आहे. त्यानंतर तो पण ते कडू औषध पिऊ लागला. समोरच्याने दाखवले तर होऊ शकते. कोणीतरी दाखविणारा हवा. मी जर एकदा आगीत बोट धरून दाखविले तर तुम्ही पण तसे कराल. मात्र दाखविणारा हवा. आत्म्याला काहीही स्पर्शत नाही आणि काहीही बाधत नाही. म्हणून त्या रूपात राहावे. निर्लेप, असंग. अग्निचा संग देखील त्याला स्पर्श करत नाही, तर या दु:खाचा, शरीराचा स्पर्श तो कसा होईल?? म्हणून त्याचा हा स्वभाव आपण पकडून ठेवावा (लक्षात ठेवावा).

आणि परभावात परपरिणती उत्पन्न होत नाही ना, हे पाहत राहावे. परपरिणती कशाला म्हणतात? परपरिणामाला स्वत:चे परिणाम मानणे म्हणजे परपरिणती. डोके दुखत आहे हा परपरिणाम आहे आणि त्याला 'माझे डोके दुखत आहे' असे म्हणणे ही परपरिणती आहे. ज्याने

स्वपरिणती, स्वपरिणाम कधी पाहिलेच नाही तो परपरिणतीशिवाय दुसरे काय पाहणार? 'स्व' तर समकित प्राप्त झाल्यानंतरच हातात येते. 'स्व' हातात असेल तर क्रोध, मान, माया, लोभ हे मृतप्राय होतात. क्रोध, मान, माया, लोभ यांना कषाय म्हणतात.

मोक्ष हवा असेल तर प्राणांची बाजी लावण्याचा हा खेळ आहे. शौर्य म्हणजे शौर्य! वरून ॲटमबॉम्ब पडला तरी पण विचलित न होणे, याला शौर्य म्हणतात. जर तुम्ही शुद्धात्मा स्वरूप आहात, मी जे स्वरूप तुम्हाला दिले आहे त्या स्वरूपात तुम्ही असाल तर तुम्हाला पाण्याचाही स्पर्श होणार नाही.

आता तुम्ही निःशंक झाला आहात. आता आज्ञेत राहा आणि म्हातारपण व्यतीत करा. हा देह गेला तर भले गेला. कोणी कान कापले तर खुशाल कापू दे. पुद्‌गल देऊनच टाकायचे आहे. पुद्‌गल परके आहे. परकी वस्तू आपल्याजवळ राहणार नाही. जेव्हा 'व्यवस्थित'ची वेळ येईल तेव्हा ते जाणारच आहे. म्हणून 'जेव्हा घेऊन जायचे असेल तेव्हा घेऊन जा' असे म्हणावे. भीती बाळगायची नाही. कोणी नेणार नाही. असा कोणी रिकामा बसलेला नाही. आपण म्हटले की 'घेऊन जा' तरी कोणी घेऊन जाणार नाही. पण त्यामुळे आपण निर्भय राहू शकतो. व्हायचे असेल ते होवो, असे आपण म्हणावे.

**प्रश्नकर्ता :** बाहेरच्या फाइल्स इतका त्रास देत नाहीत पण आतील शाता-अशातामध्ये एकाकार व्हायला होते.

**दादाश्री :** शाता-अशाता यांना तर एका बाजूलाच ठेवून द्यायला हवे. शातामध्ये प्रमाद (अजागृती) होतो, शाता-अशाताची जास्त काळजी करत बसायचे नाही. अशाता आली, हाताची आग-आग झाली, तर आपण म्हणायला हवे, 'अरे हाता, 'व्यवस्थित'मध्ये असेल तर भाजू दे, किंवा स्वस्थ राहू दे.' असे म्हटले तर आग आग होत असेल ती बंद होईल. कारण आपणच भाजू दे असे म्हणतो ना, मग काय? कधीच कुरवाळत बसायचे नाही. हे पुद्‌गल आहे. ते 'व्यवस्थित'च्या ताब्यात आहे. त्याला यायची असेल तेवढी अशाता वेदनीय येऊ दे. शौर्य तर

हवे ना? नाहीतर तसेही रडत-रडत पण भोगायचेच आहे, त्याऐवजी हसत हसत भोगले तर काय वाईट? म्हणून तर म्हटले आहे, 'ज्ञानी वेदतात धैर्याने, अज्ञानी वेदतात रडून रडून.'

अर्धा पाय तुटला तर आपण म्हणावे, चला, दीड पाय तर शिल्लक आहेत ना! परत अर्धा गेला तर आपण म्हणावे, दोन नाही तर एक तर आहे ना! असे करत करत जर सगळे अवयव तुटले तरी शेवटी आपण आत्मा तर आहोत ना? शेवटी तर सगळे अवयव तुटणारच आहेत ना? पेट्रोल शिंपडून आग लावली तरी पण आम्ही आत्मस्वरूप आहोत! कधी ना कधी तर जळणारच आहे ना! नाही का जळणार? थोडा अभ्यास करायची गरज आहे. अनवाणी पायांनी साधू महाराज कसे चालत असतील? शेतकरी (शेतात) कसे चालत असतील? दोन-चार वेळा आपल्याला भाजले की मग आपोआप सर्व सुरळीत होते. नाहीतर जी वेदना एक गोळी घेतल्यावर थांबते, तिला वेदना म्हणायचेच कसे? 100-100 गोळ्या खाऊन देखील थांबत नसेल, तिला वेदना म्हणतात.

आता तर तुमचे काहीच नाही. 'ज्ञानी पुरुषां'ना सगळे समर्पित केले. मन, वचन, काया, भावकर्म, द्रव्यकर्म, नोकर्म सगळे तुम्ही अर्पण केले. मग तुमच्याजवळ काहीच शिल्लक राहत नाही.

## महावीरांचे वेदन - स्वसंवेदन

**प्रश्नकर्ता :** 'ज्ञानी वेदतात धैर्याने, अज्ञानी वेदतात रडून रडून.' म्हणजे ज्ञानी पण वेदतातच ना?

**दादाश्री :** वेदना तर असतेच, ती काही जात नाही! पण वेदना ते धैर्याने वेदतात. प्रत्येक व्यक्तीला आपापल्या सामर्थ्यानुसार धैर्य असते. तसे तर महावीर भगवंत फक्त जाणत असत, वेदत नसत. जर ढेकूण चावला तर स्वत: फक्त ते 'जाणत' असे, वेदत नसे. जेवढा अज्ञान भाग असेल, त्याप्रमाणात व्यक्ती वेदते. तुम्ही श्रद्धेने शुद्धात्मा झाला आहात. आता 'ज्ञाना'च्या अनुभवाने जेव्हा आत्मा व्हाल, तेव्हा फक्त जाणणेच राहील. तोपर्यंत मात्र वेदन आहेच! पण वेदण्याच्या बाबतीत

तर आम्ही तुम्हाला सांगतो ना की तुम्ही दूर बसा, आपल्या 'होम डिपार्टमेंटमध्ये' जाऊन बसा! तिथून जरासुद्धा मागे पुढे व्हायचे नाही. मग कितीही घंटा वाजवू देत! 1200 घंटा वाजविल्या तरी पण आपण आपले 'ऑफिस' कशाला सोडायचे?

शाता वेदनीय आणि अशाता वेदनीय तर तीर्थंकरांना सुद्धा येतात, परंतु ते त्याला ज्ञानाने, केवळज्ञानाने जाणतात.

मनाला जर डिस्चार्ज केले नाही तर मग ते परत आपल्यासोबतच येईल, माल-सामान आपल्यासोबत येईल. त्याऐवजी ते रिकामेच होऊ द्या ना! नियमच असा आहे की ते रिकामे होईलच. द्रव्य, क्षेत्र, काळ आणि भाव, हे चार संयोग एकत्र आले की ते रिकामे होईलच, नियमच आहे तसा.

आत्मा परम सुखी आहे. शरीर अशाता देते, मन अशाता देते, वाणी अशाता देते. कोणी काही बोलले की लगेच अशाता वेदनीय सुरू होते.

**प्रश्नकर्ता :** देहाची वेदनीय असते तेव्हा चित्त तिथे जास्त खेचले जाते.

**दादाश्री :** हो, चित्त तिथल्या तिथेच घुटमळत राहते. आपण त्याला म्हटले की जरा बाहेर फिरून ये, तरी पण जात नाही. घरीच थांबते.

**प्रश्नकर्ता :** त्यामुळे मग कर्मबंधन होणार ना?

**दादाश्री :** नाही. वेदना भोगून घ्यायची. भोगल्याशिवाय गत्यंतर नाही. कर्मबंध तर कर्ता झाला तरच पडतात. कर्ता मिटला की कर्मे सुटतात.

## चित्ताची शुद्धी - शाश्वत वस्तूंशी ऐक्य

पोलिस ओरडत आला, बेड्या घेऊन आला तरी पण आपल्यावर त्याचा काहीच परिणाम होत नाही, ते म्हणजे विज्ञान!

**प्रश्नकर्ता :** मग चित्त कशात ठेवायचे?

**दादाश्री :** चित्त स्वत:च्या स्वरूपात ठेवायचे. जे शाश्वत आहे त्यात चित्त ठेवा. चित्त शाश्वत वस्तूत ठेवायचे आहे. मंत्र शाश्वत वस्तू नाहीत. आत्म्याशिवाय या जगात कोणतीच वस्तू शाश्वत नाही. इतर सर्व टेम्परररी ॲडजस्टमेंटस् आहेत. ऑल दीज रिलेटिव्हस् आर टेम्परररी ॲडजस्टमेंटस्!

फक्त एक आत्माच परमर्नन्ट (शाश्वत) आहे. शाश्वत वस्तूत चित्त स्थिर झाले की मग ते इकडे-तिकडे भटकत नाही आणि तेव्हा त्याची मुक्ती होते. लोक मंत्रांचा जप करतात त्यात चित्त किती वेळ राहते? पोलिस येत नाही तोपर्यंत. पोलिस आला की जप पण राहत नाही आणि चित्त पण राहत नाही. म्हणजेच या सर्व 'टेम्परररी ॲडजस्टमेंट' आहेत. 'रिलीफ' देतात, शांती मिळायला मदत करतात परंतु कायमस्वरूपी काम होत नाही. जपयोगाचीही आवश्यकता आहे, पण जोपर्यंत शाश्वत वस्तू मिळत नाही तोपर्यंतच. जे चित्त शाश्वताशी जोडले गेले ते चित्त शुद्ध चित्त झाले, आणि शुद्धात्मा झाला म्हणजे विदेही झाला आणि विदेही झाला म्हणजेच मुक्ती झाली. म्हणजेच विदेही होण्याची गरज आहे. याला तर देही म्हणतात. 'मी चंदुभाई आहे' असे म्हटले की झाली भ्रांतीला सुरुवात. 'ज्ञानी पुरुष' आपली झोप उडवतात. संपूर्ण जग उघड्या डोळ्यांनी झोपलेले आहे. 'झोपणे' म्हणजेच 'मी हे करत आहे', 'मी कर्ता आहे' असे भान असते. या जगात कोणी असा जन्माला आलाच नाही ज्याला शौचाला जाण्याची स्वतंत्र शक्ती असेल, आणि स्वत:ची जी शक्ती आहे ती तर तो जाणतच नाही. स्वत:ची शक्ती स्वक्षेत्रात आहे. स्वत:ची शक्ती क्षेत्रज्ञ आहे. ती क्षेत्रज्ञ शक्ती एकदा उत्पन्न झाली की मग कामच झाले. क्षेत्रज्ञ संपूर्ण शक्ती आहे. बाकी सर्व भ्रांती आहे.

जपयज्ञ हे खूप सुंदर साधन आहे, परंतु जोपर्यंत निष्पक्षपाती भान उत्पन्न होत नाही, तोपर्यंतचेच ते साधन आहे. ते साध्य नाही. 'क्षेत्रज्ञ' हे साध्य आहे. स्वत:चा स्वभाव क्षेत्रज्ञ आहे. तसा स्वभाव उत्पन्न व्हावा, हे साध्य आहे.

जोपर्यंत एखाद्या पक्षात अडकलेला असेल तोपर्यंत त्याला भगवंत भेटत नाहीत. कोणी वैष्णव पक्षात, कोणी शैव पक्षात, कोणी मुस्लीम पक्षात, कोणी जैन पक्षात आहे. जोपर्यंत एखाद्या पक्षात अडकला आहे, तोपर्यंत भगवंत भेटत नाहीत. हा नियमच आहे. भगवंतांचा नियमच असा आहे की पक्षात अडकलेल्याला भेटायचे नाही. भगवंत स्वत:च निष्पक्षपाती आहेत. म्हणून जेव्हा निष्पक्षपाती भाव उत्पन्न होईल, तेव्हाच ही गोष्ट समजेल. पक्षात अडकलेला माणूस आणि संसारात अडकलेला माणूस यात मग फरकच काय?

## आडमुठेपणा

**प्रश्नकर्ता :** आडमुठेपणा कशाला म्हणतात?

**दादाश्री :** अज्ञान दशेत स्वत:ची चूक झाली, आणि ते स्वत:ला समजलेसुद्धा की आपली चूक झाली, तरी पण कोणी विचारले की असे का केले? तर म्हणेल असेच करायला हवे होते. इतका आडमुठेपणा करतो की काही विचारूच नका. लोक म्हणतात देखील की तुम्ही खूप आडमुठेपणा करता. लोक असे म्हणतात की नाही?

**प्रश्नकर्ता :** हो.

**दादाश्री :** हाच तर आडमुठेपणा आहे. चूक कळलीच नाही आणि ती झाकली तर ती गोष्ट वेगळी. पण चूक कळली आणि तरी ती झाकली म्हणजे प्रचंड आडमुठेपणा. दुसरा आडमुठेपणा म्हणजे रात्री एखाद्याचे कोणाशी भांडण झाले आणि सकाळी ती व्यक्ती चहा द्यायला आली तर तो म्हणेल, 'मला तुझा चहाही नको, आणि काहीच नको.' म्हणजे असा वाकडा वागतो. अरे, रात्रीची गोष्ट रात्रीच संपली. काल शनिवार होता, आज रविवार आहे. पण शनिवारची गोष्ट रविवारपर्यंत ताणतो. शनिवारची गोष्ट शनिवारी संपली. रविवारी परत नव्याने सुरुवात.

**प्रश्नकर्ता :** शनिवारची गोष्ट रविवारपर्यंत राहिली, म्हणजे त्याचा तंत राहिला, तर त्या आडमुठेपणा तोडण्याचा उपाय काय?

**दादाश्री :** आडमुठेपणा तोडण्याची गरज नाही. आपण तर दादांची आज्ञा पाळायची. 'व्यवस्थित' समजून घेतले की मग बोलायला काही शिल्लकच उरत नाही. 'व्यवस्थित'चा अर्थ काय? की आता आपले त्याच्याबरोबर भांडण-तक्रार वगैरे काहीच राहिले नाही, याला म्हणतात 'व्यवस्थित.' 'व्यवस्थित' म्हणजे 'व्यवस्थित'! 'व्यवस्थित' पूर्णपणे नीट समजून घ्यायला हवे, आणि या जगात दुसऱ्या कोणाची चूक तर नाहीच. ज्या काही चुका आहेत त्या सर्वच स्वतःच्याच चुकांचा परिणाम आहे. नाहीतर हा खिसेकापू इतर कोणाला नाही आणि मलाच कसा काय भेटला? आपली काहीतरी चूक असल्याशिवाय असे होणारच नाही.

बक्षीसे दोन प्रकारची असतात. एक म्हणजे लॉटरीत एक लाख रुपयांचे बक्षीस मिळते ते सुद्धा बक्षीस, आणि फक्त तुमचाच खिसा कापला गेला हे पण बक्षीस. सगळे 'व्यवस्थित' आहे.

## आत्मा - एकच की प्रत्येक?

ब्रह्मस्वरूप झाला असे कधी म्हणता येते की आता कोणत्याच प्रकारचा मतभेद राहिला नाही. प्रथम ब्रह्मस्वरूपाचा दरवाजा येतो. या दरवाज्यापाशी सगळी मते इथे एकत्र होतात. तिथे खूप मोठा दरवाजा आहे. ब्रह्मस्वरूप झाला असे कोणाला म्हणतात की ज्याची वाणी मतवाली नसते, गच्छवाली नसते, पण फक्त आत्म्याबद्दलचीच वाणी असते, त्यात वेगळेपणा नसतो. त्याला ब्रह्मस्वरूप म्हणतात. ब्रह्मस्वरूप झाल्यावर तर आत्मा परमात्माच आहे. मग शुद्धात्म्याबद्दल बोलण्याची गरजच काय?

**प्रश्नकर्ता :** ब्रह्मस्वरूप एक आहे की अनेक भासतात?

**दादाश्री :** एक आणि अनेक दोन्ही आहेत. काही बाबतीत एक आणि काही बाबतीत अनेक. ते तर ब्रह्मस्वरूपाबद्दल आहे. ब्रह्मस्वरूपाची तुलना तुम्ही शुद्धात्म्याबरोबर का करता? प्रत्यक्षात आत्मा प्रत्येक (प्रति एक) आहे. म्हणजेच जे आत्मे तिथे मोक्षात गेले आहेत. त्यांना मोक्षाचे सुख अनुभवास येते आणि जे इथे बांधले गेलेले आहेत, त्यांना बंधनाचे

सुख अनुभवास येते. आत्मा जर एकच असता तर मोक्षात गेलेल्यांनाही मोक्षाचे सुख आणि इथे असलेल्यांनाही मोक्षाचे सुख अनुभवास आले असते. म्हणजेच आत्मा प्रत्येक आहे, वेगळे-वेगळे आहेत. आणि तिथेही वेगळे-वेगळेच आहेत. तिथे गेल्यावर एकच होत असतील तर मग तिथे जाऊन आपल्याला काय फायदा? आपली सारी मिळकत त्यांना देऊन टाकायची का? तिथे सिद्धगतीत पोहोचल्यावर तर स्वतःच्याच स्वयं-सुखात राहायचे. तिथे जाऊन एकच व्हायचे असेल, तर मग इथेच काय वाईट आहे? बायको भजी-बिजी खायला तर देते. फार तर बायको दटावते एवढेच ना? आणखी काय दुःख आहे इथे?

## गलनचे रहस्य

'ज्ञानी पुरुष' काय सांगू इच्छितात की हे खातो, पितो ते सर्व गलन आहे. जग त्याला पूरण समजते, कारण इंद्रियज्ञाना द्वारे जे दिसते, त्याला जग सत्य मानते आणि यथार्थ सत्य मात्र याहून वेगळे आहे. पूरण काही अंशी तुमच्या हातात आहे, सर्वांशाने नाही. 'स्वरूप ज्ञान' मिळाले तर स्वतः स्वसत्तेत येतो, नाही तर येत नाही. किंवा मग मतिज्ञान मिळाले असेल तरी तेवढ्या प्रमाणात स्वसत्ता प्राप्त होते, आणि मतिज्ञान देखील स्वसत्तेचा आधार आहे. मतिज्ञान, श्रुतज्ञान, अवधिज्ञान हे सर्व पण स्वसत्तेचे आधार आहेत.

पैसे कमावले याला जग पूरण समजते आणि नुकसान झाले, किंवा खर्च केले याला गलन झाले असे समजतात. वास्तवात कमावले किंवा खर्च केले या दोन्ही गोष्टी गलनच आहेत आणि 'व्यवस्थित'च्या ताब्यात आहेत. परंतु जगाला हे कसे समजेल? जर 'व्यवस्थित'ची सत्ता समजली तर 'स्वतः' पूर्णपणे मुक्त होईल! मग तर स्वतःच्या स्वरूपातच राहू शकेल! एवढी गोष्ट तुम्हाला समजली की मग तुम्हाला कसला त्रास राहणारच नाही. तुम्ही ही गोष्ट विसरणारच नाही, आणि जगातील लोकांना सतत शिकवत राहिलो, तरी पण ते विसरतीलच. कारण ते कषायसहित आहेत. कषायी लोकांच्या ताब्यात काहीच राहत नाही. तुम्हाला 'ज्ञान' देतो त्यानंतर तुम्हाला पुस्तक वाचायला सांगितले आहे

का? हे 'ज्ञान' तर मौखिक दिले आहे. यात पुस्तक किंवा शास्त्र काहीच वाचायचे नसते, आणि तरी पण तुम्हाला दिलेले ज्ञान जसेच्या तसे त्याच प्रमाणात तुमच्याकडे राहते. पुस्तकातले काही लक्षात राहत नाही. 'तोंडी' सांगितलेले लक्षात राहील. कारण ते 'ज्ञानी पुरुषां'चे वचनबळ आहे. पुस्तकात वाचायला जाल तर ते 'जड' (निश्चेतन) होईल!

अर्थात हे जग पूर्णपणे गलन स्वरूपात आहे आणि तेही 'व्यवस्थित' भावाने आहे. हे मन-बुद्धी-चित्त आणि अहंकार सर्व काही 'व्यवस्थित'च्या ताब्यात आहेत. त्याच्या ताब्यात आहेत तर तुम्हाला त्याचे रक्षण करण्याची गरजच नाही ना? तुम्हाला तर करायला काही शिल्लकच राहिले नाही ना? 'व्यवस्थित' काय करत आहे ते फक्त 'पाहत' राहायचे! आमचा हा 'व्यवस्थित'चा शोध एकदम 'एक्झॅक्ट' आहे. 'पॉइंट टू पॉइंट' पर्यंत 'एक्झॅक्ट' आहे (सर्व मुद्दे तंतोतंत बरोबर आहेत). म्हणून तर आम्ही याला गलन म्हणतो, तुम्ही तुमच्या 'ज्ञाना'त राहावे यासाठी 'जसे आहे तसे' हे स्पष्टीकरण सांगत आहोत. म्हणून तर हे 'अक्रम विज्ञान' उघड करावे लागले आहे!

लोक ज्याला उदयकर्म म्हणतात ते सर्व गलन आहे. त्यात पूरण काहीही नाही. ही पाचही इंद्रिये उदयाच्या आधीन आहेत. ती इंद्रियेच जर उदयाच्या आधीन आहेत, तर त्यांची कर्मे पण उदयाच्या आधीनच असणार ना? पाच इंद्रियांची क्षयोपक्षम शक्ती उदयाच्या आधीन आहे. मग इंद्रिये जे पाहतात-जाणतात यात नवीन कसे असणार? ही गोष्ट समजेल अशी आहे की नाही? इथे तर समजते पण माझ्या अनुपस्थितीत परत आवरणे येतात. आमच्या उपस्थितीत तुम्हा सर्वांची आवरणे उघडतात, आणि आमचे 'ज्ञान' घेतल्यानंतर तर आवरणे कायमची दूर होतात!

कर्मबंधन कशामुळे होते?

'मी चंदुलाल आहे', 'मी आचार्य महाराज आहे' (ही मान्यताच) कर्मबंधनाचे मुख्य कारण आहे. आणि 'हे माझे आहे' हे 'सेकंडरी' (दुसरे) कारण आहे. 'कॉजेस' चार्ज रूपाने असतात. जिथे जिथे 'मी

आणि माझे' लावाल, तिथे तिथे तेवढी 'कॉजेस' असतात. आणखी काही 'कॉजेस' नसतात. चार्जला पूरण म्हणतात, आणि त्यांचा जो 'डिस्चार्ज' होतो त्याला गलन म्हणतात.

हे सर्व फक्त समजून घ्यायचे आहे. हे विज्ञान आहे. विज्ञानाचे अंकुर फुटले की विज्ञानात सर्व काही दिसते. विज्ञानात काय दिसत नाही? म्हणून हे सर्व समजून घ्या. काहीही करण्याची गरज नाही. विज्ञानात करण्यासाठी काहीच ठेवलेले नाही. जर 'केले' ना, तर तिथे समकित नसते. काहीही 'केले' तर तिथे समकित प्राप्त होत नाही!!

## विचारात तन्मय न होणे

**प्रश्नकर्ता :** विचार सतत त्रास देत असतील, आणि काळजीत पाडत असतील, तर त्यांना कसे थांबवावे?

**दादाश्री :** विचार करणे हा कोणाचा धर्म आहे?

तो आत्म्याचा धर्म नाही, मनाचा धर्म आहे. तुम्ही जरी ठरविले असेल की हे सगळे जण शिव्या देत आहेत पण मला काही ऐकायचे नाही, तरी पण कानांचा स्वभाव ऐकायचा आहे, म्हणून ते ऐकल्याशिवाय राहत नाहीत. आणि तसाच मनाचाही स्वभाव आहे. आपल्याला आवडो न आवडो तरी पण आत विचार येतातच. तो मनाचा स्वाभाविक धर्म आहे. विचार 'ज्ञेय' आहेत आणि 'आपण' 'ज्ञाता' आहोत. म्हणून जे विचार येतात त्यांना 'आपण' फक्त पाहतच राहायचे, निरिक्षण करतच राहायचे. विचार चांगले आहेत की वाईट आहेत, असा अभिप्राय तुम्ही बनवायचा नाही. कितीही वाईट विचार येवोत त्याला हरकत नाही. ज्या भावाने पूर्वबंध पडलेले आहेत त्या भावाने 'कर्म *निर्जरा*' होत आहे, त्याला आपण फक्त पाहत राहायचे की असे पूर्वबंध पडले होते, त्यांची आत्ता *निर्जरा* होत आहे. आपले हे 'ज्ञान' *'संवर'* वाले आहे, त्यामुळे नवीन कर्मबंधने पडत नाहीत. विचारात तन्मयाकार झालो तर कर्मबंधने होतात.

**प्रश्नकर्ता :** या विचारांचा काय परिणाम होईल?

**दादाश्री :** परिणाम 'व्यवस्थित' वर सोपवले आहे. आपले त्याच्याशी काहीच देणेघेणे नाही. आपण तर फक्त आरामात गाडीत बसून राहायचे. मन म्हणेल, 'पुढे गाडीची टक्कर झाली तर?' त्याला आपण फक्त पाहतच राहायचे, बस. त्याचा परिणाम 'व्यवस्थित' वर सोपवून आपण आरामात बसून राहायचे.

**प्रश्नकर्ता :** पण हे इतके सोपे नाही ना?

**दादाश्री :** सोपेच आहे. जेव्हापासून निश्चित कराल, तेव्हापासून तसे राहता येईल. कारण सगळे 'व्यवस्थित'च्या ताब्यात आहे. जे दुसऱ्यांच्या ताब्यात आहे तिथे आपण लुडबूड करू लागलो तर उलट आपण मूर्ख ठरू. प्रत्यक्षात काय घडत आहे ते 'पाहणे आणि जाणणे' एवढेच तुमच्या ताब्यात आहे. आणि जर काही उलट सुलट करायचे असेल तर ते 'व्यवस्थित' करील. खरे तर काही बिघडेल असे 'व्यवस्थित' नसतेच. सत्तराव्या वर्षी माणूस मरतो पण त्यापूर्वीच तो (खूप वेळा) 'मी मेलो, मी मेलो' असे उगाचच ओरडत असतो. आणि कायम भीतीग्रस्त असतो. भयभीत व्हावे असे जग नसते. मन आम्हालाही दाखविते की 'पुढे अपघात झाला तर?' तर आम्ही त्याला म्हणतो तू बोललास त्याची मी नोंद घेतली आहे. मग मन दुसऱ्या गोष्टींबद्दल बोलेल. अगोदरच्या गोष्टी धरून ठेवण्याचा मनाचा स्वभाव नसतो. मनाबरोबर तन्मयाकार व्हायचे नाही. तन्मयाकार झाल्यामुळे तर हे जग उत्पन्न झाले आहे. मनाचे सर्व भाव हे 'डिस्चार्ज' भाव आहेत. त्या 'डिस्चार्ज' भावात जर आपण तन्मयाकार झालो तर 'चार्ज' भाव तयार होतात. एलीवेशन किंवा डिप्रेशनचा परिणाम आपल्यावर होऊ द्यायचा नाही. काहीही होणार नाही आणि काही बिघडणारही नाही. मी क्षणभरदेखील संसारात नसतो. तरी पण काहीही बिघडत नाही.

**प्रश्नकर्ता :** म्हणजे भीती बाळगायचीच नाही?

**दादाश्री :** 'आपल्याला' भीती वाटतच नाही. 'आपण शुद्धात्मा', म्हणून 'आपल्याला' कोणी पाहू शकत नाही, नुकसान करू शकत नाही, मारू शकत नाही आणि कोणी नावही घेऊ शकत नाही! हे जग फक्त

काल्पनिक भीतीने उत्पन्न झाले आहे. यात कोणाचाही हस्तक्षेप नाही. आणि 'चंदुभाई' जरा कमकुवत झाले असतील तर 'आपण' त्यांना आरशासमोर उभे करून त्यांच्या खांद्यावर हळुवार थोपटून म्हणावे की ''आम्ही आहोत ना तुमच्याबरोबर! पूर्वी तर तुम्ही एकटेच होता, त्यामुळे गोंधळून जात होता. कोणाला काही सांगूही शकत नव्हता. आता तर आपण बरोबर आहोत. आता कशाला घाबरता? आम्ही 'भगवान' आहोत आणि तुम्ही 'चंदुभाई' आहात. म्हणून घाबरू नका.'' आणि जर चंदुभाई 'एलीवेट' होत असतील तर त्यांना सांगा 'आमच्या सत्तेमुळे तुमचा इतका रुबाब आहे.' म्हणजेच आपण 'होम डिपार्टमेंट'मध्ये बसल्या बसल्याच 'फॉरेन' डिपार्टमेंटचे सर्व काही करत राहायचे. हे निर्लेप 'ज्ञान' आहे, काहीही स्पर्श करू शकणार नाही, असे ज्ञान आहे!

मनाच्या स्वभावाच्या सर्व बारीक-सारीक गोष्टी सूक्ष्मतेने समजणे आवश्यक आहे. सर्व किल्ल्या समजून घ्यायच्या आहेत. उदाहरणार्थ, (मन म्हणाले की) पोलिसवाला वारंवार घरी येऊ लागला आहे, तर काय तो माझ्यावर हल्ला करणार आहे का? तेव्हा 'आपण' म्हणावे, 'नाही' असे काही नाही. पोलिसवाला तुमच्यासाठी नवीन जागा तयार करत आहे. म्हणजे पोलिसवाला आपले हित करत आहे असे समजायचे की तो आपले नुकसान करायला आला आहे असे समजायचे?

मन मेस्क्युलाइन जेन्डर (पुल्लिंग) नाही, फेमिनाइन जेन्डर (स्त्रीलिंग) नाही, ते न्युट्रल (नपुसक लिंग) आहे, म्हणून घाबरायचे काही कारण नाही. तुम्ही अशी ज्ञानाची जागृती राखायला हवी की दादांनी आपल्याला सांगितले आहे की आपण ज्ञाता-द्रष्टा आहोत. मग करू दे ना आरडाओरडा, जेवढा करायचा असेल तेवढा करू दे. मात्र त्यावेळी आपण स्थिरता सोडता कामा नये.

## गो टू दादा!

आणि जेव्हा खूप दुःख येऊन कोसळले असेल तेव्हा तुम्ही त्यांना सांगा की 'दादां'कडे जा.

**प्रश्नकर्ता :** पण दादा, आम्ही असे आमचे दु:ख तुम्हाला देऊ शकतो?

**दादाश्री :** हो, हो. दादांना सगळे काही देऊन टाका आणि म्हणा, 'जा, दादांकडे जा. इथे काय आहे? सब दे दिया दादा को. अब इधर क्यों आया?' (सगळे दादांना देऊन टाकले आहे. आता इकडे कशाला आलास?)

**प्रश्नकर्ता :** सुख पण देऊन टाकायचे?

**दादाश्री :** नाही, सुख नाही. सुख तुमच्याजवळच ठेवा. मला सुखाची हौस नाही, म्हणून ते तुमच्या जवळच ठेवा. तुम्हाला दु:ख सहन करता येत नसेल तर ते माझ्याकडे पाठवून द्या. दोन-पाच वेळा दु:खाचा अपमान करा आणि म्हणा, इकडे का आलास? दादांना देऊन टाकले आहे ना? मग ते (तिथे) थांबणारच नाही. या पुद्‌गलाचा गुण असा आहे की अपमान झाला तर ते तिथे थांबत नाही.

जे 'दादा भगवान' आहेत ते अचिंत्य चिंतामणी आहेत. जसे चिंतन करील तसा होईल. अडचणीत त्यांचे चिंतन केले तर सगळ्या अडचणी दूर होतील.

जसे चिंतन कराल तसे फळ देतात. मग तुम्हाला घाबरण्याची काय गरज?

## सद्‌वर्तनाबद्दलची नावड

**प्रश्नकर्ता :** कित्येकदा कोणी चांगले वागले तरी पण आम्हाला आवडत नाही.

**दादाश्री :** आवडीचा हिशोब संपला, की मग आवडेनासे होते. आवडत असेल तर सगळे आवडते आणि आवडत नसेल तर सगळेच वाईट लागते. आपण नावडत्या गोष्टींचा द्वेष करता कामा नये.

**प्रश्नकर्ता :** राग-द्वेष होत नाहीत, पण एकदा अभाव झाला की मग काही केल्या भाव होतच नाही.

**दादाश्री :** तू जरी असा रंग लावत राहिलास की ते खूप चांगले आहेत, तरी पण तो रंग लागणार नाही. कारण हिशोब चुकता झाला. हे घर विकून टाकल्यावर मग त्याच्यावर भाव राहतो का?

**प्रश्नकर्ता :** नाही.

**दादाश्री :** आणि विकण्यापूर्वी? काही कमी-जास्त झाले तरी मनात सलत राहते. हिशोब संपला की झाले!

## संसारानुगामी बुद्धी

जो एका मतात (पक्षात) पडलेला असेल त्याचे संस्कार एकदम जात नाहीत. ते सर्व संस्कार पुढे येतील, म्हणून मी तुम्हाला आधीच सावध करत आहे.

हे अलौकिक विज्ञान आहे. यातील सर्वच गोष्टी अलौकिक आहेत. इथे लौकिक नाहीच! लौकिक म्हणजे मताग्रही. मग ते दिगंबर असोत, श्वेतांबर असोत, स्थानकवासी असोत, देरावासी असोत किंवा तेरापंथी-मेरापंथी वगैरे वेगवेगळ्या पंथाचे असोत, किंवा वैष्णव धर्म असोत, शैव धर्म असोत वा मुस्लीम धर्म असोत! या सर्व धर्मांना लौकिक धर्म म्हणतात. तरी ते काही चुकीचे नाहीत. चांगले केले तर पुण्य मिळते, त्यामुळे मग घोडागाडी, मोटार, बंगले सगळे काही मिळते. आणि 'या' अलौकिक धर्माने मोक्ष मिळतो.

**प्रश्नकर्ता :** तुमच्या छायेत आल्यावर देखील जर बुद्धीने फसवले तर त्याच्यासारखा अभागी दुसरा कोणीच नाही.

**दादाश्री :** नाही, तरी पण ती फसवतेच. अगदी हुशार माणसाला सुद्धा फसवते. म्हणून तुम्ही तिला ओळखा. बुद्धी काही सल्ला देऊ लागली तर तिला म्हणा, 'ताई, तू तुझ्या माहेरी जा. आता माझे तुझ्याबरोबर काहीच काम नाही. मला तुझा सल्लाही ऐकायचा नाही.' मनाचा सल्ला ऐकायला हरकत नाही, पण या बुद्धीचा सल्ला मात्र ऐकू नये. बुद्धी संसाराच्या बाहेर निघू देत नाही. मोक्षाला जाऊ देत नाही, ती बुद्धी

आहे! बुद्धी फक्त नफा-तोटा दाखवते. असे होईल, तसे होईल वगैरे. आणि शिवाय ती मताग्रही आहे. अभिग्रह (नियम पाळण्यासाठी आग्रह) कसला? तर मताचा. आत्म्याचा अभिग्रह करण्याऐवजी मताचा अभिग्रह केला. बोला आता, तो केव्हा आणि कुठे जाऊन पोहोचेल? लाख जन्म झाले तरी पण काहीही निष्पन्न होणार नाही. अंतरदाह बंद होत नाही. आणि 'ज्ञानी पुरुषां'जवळ अंतरदाह कायमचा संपून जातो.

जेवढी बुद्धी वाढते, तेवढा दाह वाढत जातो. बुद्धी संसारानुगामी आहे. संसारासाठी हितकारी आहे. पण मोक्षमार्गात ती अडथळा आणते. मन फक्त विचारच करत राहते. जे निर्णय घेत नाही, ते मन! अनडिसाइडेड (अनिर्णित विचार) म्हणजे मन आणि डिसाइडेड (निर्णयपूर्वक) विचार म्हणजे बुद्धी! इथे बसल्याबसल्या हरवून गेला तर समजावे की त्याचे चित्त भटकायला गेले आहे. 'ज्ञानी पुरुषां'च्या जवळ बसले की बुद्धी सम्यक् होते. तेव्हा ती बुद्धी खरी. सम्यक् बुद्धी कशी असते? मत नसते, गच्छ नसते, वेगळेपणा नसतो, दुसरी काही भानगडच नसते आणि गच्छ-मतवाल्या बुद्धीला मिथ्याबुद्धी म्हणतात. 'हे आमचे आणि हे तुमचे' असा भेदभाव करविते.

## आउटर बुद्धी - इनर बुद्धी

'आउटर' (बाह्य) बुद्धी 'मेकॅनिकल' आहे आणि 'इनर' (आंतरिक) बुद्धी ती स्वतंत्र करणारी आहे. ती बुद्धीसुद्धा मेकॅनिकल आहे.

**प्रश्नकर्ता :** स्वतंत्र म्हणजे?

**दादाश्री :** स्वतंत्र म्हणजेच या जगात आपल्याला कोणी *उपरी* (बॉस, वरिष्ठ, मालक) राहत नाही. 'नो बॉस.' परमेश्वर पण *उपरी* नाही, असे हवे! हा *उपरीपणा* कसा काय चालेल? एक जण जरी *उपरी* असेल, तोपर्यंत परवशता (पारतंत्र्य) आहे असे म्हटले जाते. परवशता कशी आवडेल? *उपरी* तर केव्हाही फटकारेल, त्याचा काही नेम नाही. म्हणूनच *उपरी* नको. तुला समज नसल्यामुळे हे सर्व तुझे *उपरी* आहेत.

ती समज देण्यासाठीच मी आलो आहे. मला कोणीही *उपरी* नाही. आणि मी असे सांगू इच्छितो की तुम्हालाही कोणी *उपरी* नाहीच; हे समजून घ्या!

**प्रश्नकर्ता :** 'मेकॅनिकल' बुद्धीने मनुष्य काय मिळवू शकतो?

**दादाश्री :** 'मेकॅनिकल' बुद्धीमुळे संसाराच्या सर्व बाह्य गोष्टी त्याला मिळतात.

**प्रश्नकर्ता :** जर 'मेकॅनिकल' बुद्धी असेल तर सगळ्यांना बाह्य गोष्टी सारख्या प्रमाणात मिळायला हव्यात, नाही का?

**दादाश्री :** पण प्रत्येकाला मेकॅनिकल बुद्धी वेगवेगळ्या प्रमाणात असते. एक समान नसते. या 'आफ्रिकन' लोकांना त्यांच्या 'डेव्हलपमेंट' प्रमाणे बुद्धी असते. म्हणजेच प्रत्येक माणसाची 'डेव्हलपमेंट' वेगवेगळी असते.

**प्रश्नकर्ता :** यात 'मेकॅनिकल' कुठून आले?

**दादाश्री :** हे तू स्वत:ला जे मानतो ते सर्वच 'मेकॅनिकल' आहे. तू स्वत:च 'मेकॅनिकल' आहेस. जोपर्यंत तू तुझ्या 'सेल्फला'-आत्म्याला ओळखत नाहीस तोपर्यंत सर्व 'मेकॅनिकल' आहे, परवशता आहे. हे शरीर पण 'मेकॅनिकल' आहे आणि या 'मेकॅनिकल'चा एखादा भाग जर कधी घासला गेला की संपले! 'मेकॅनिकल' म्हणजेच परवशता. वास्तवात तू स्वत: या 'मेकॅनिकल' पासून वेगळा आहेस.

आपल्याला रोज पोटात जेवण घालावे लागते ना? जर 'मेकॅनिकल' नसते तर एक वेळ खाऊन भागले असते. एकदा खाल्ल्यानंतर परत खायला लागले नसते. पण इथे तर 'पूरण' करतो आणि नंतर 'गलन' होते. सर्व काही 'मेकॅनिकल' आहे. तू 'स्वत:' यापासून वेगळा आहेस. तू 'स्वत:' या 'मेकॅनिकल'ला 'जाणणारा' आहेस. ही मशिनरी हा एक प्रयोग आहे आणि तू प्रयोगी आहेस. हा कसला प्रयोग चालू आहे, 'चंदुलाल'मध्ये काय काय फरक होत आहे, या प्रयोगांचा तू 'जाणकार'

आहेस! त्या ऐवजी तू म्हणतोस की 'मी चंदुलाल आहे', एवढी मोठी चूक कशी काय चालेल?

**प्रश्नकर्ता :** बुद्धी 'मेकॅनिकल' कशी झाली? जनावरात पण कमी-जास्त प्रमाणात बुद्धी असतेच ना?

**दादाश्री :** जनावरांचे अंतःकरण मर्यादित असते -'लिमिटेड' असते आणि माणसांचे 'अनलिमिटेड' (अमर्यादित) असते. जनावरांचे मर्यादित असल्यामुळे त्यांची जास्त 'डेव्हलपमेंट' होऊ शकत नाही. त्यांचे मन-बुद्धी-चित्त आणि अहंकार एका मर्यादेत असतात. या गाईला भांडे दाखविले तर ती धावत धावत येईल. एवढी समज तिला आहे. आणखी दुसरी कोणती समज आहे? आपण जर काठी घेऊन बाहेर निघालो तर ती आपल्याजवळ येत नाही. त्याशिवाय झोपेची समज आहे. त्यांना मैथुन पण आहे. भूक लागली तर खायची समज आहे. काय खाऊ आणि काय खाऊ नये याची पण त्यांना समज आहे; मात्र माणसांना ती समज नाही! हे सर्व प्राणी वास घेऊन मगच खातात. फक्त ही माणसेच निसर्गाचे प्रचंड गुन्हेगार आहेत.

**प्रश्नकर्ता :** 'मेकॅनिकल' बुद्धी माणसाला कुठपर्यंतचे ज्ञान देऊ शकते?

**दादाश्री :** सर्वनाश होईपर्यंतचे! मेकॅनिकल बुद्धी जर 'अबॉव्ह नॉर्मल' झाली तर ती सर्वनाश आणील. हे जग सर्वनाशाकडे चालले आहे. 'मेकॅनिकल' बुद्धीच 'अबॉव्ह नॉर्मल' करीत आहे. 'आउटर' (बाह्य) बुद्धीची मर्यादा एवढीच आहे की जितकी आपली आवश्यकता असेल, तितक्या प्रमाणातच बुद्धी वापरली जावी. तिचा जर 'एक्सेस' (जास्त) वापर केला, 'हे काय आणि ते काय?' तर ती नुकसान करते.

**प्रश्नकर्ता :** माणसाने स्वतःचे रक्षण करणे हे गरजेचे आहे की नाही?

**दादाश्री :** सगळे जण करतातच ना! जाणूनबुजून कोणी मरत नाही.

**प्रश्नकर्ता :** माणसाला स्वत:चे रक्षण करण्यासाठी 'एटॉमिक न्युक्लियस' (अणुबॉम्ब)ची गरज पडते ना?

**दादाश्री :** हे सर्व अनावश्यक समस्या निर्माण करणे आहे. फॉरेनमध्ये असे 'डेव्हलप्ड' (प्रगत) देश आहेत की जिथे 66 मैलावर फोनची व्यवस्था केलेली असते, नंतर 68 मैलावरही केलेली असते. तर आता लोक म्हणतात 66 मैलाच्या पहिल्या फर्लांगवर जर आमची गाडी पंक्चर झाली तर आम्ही काय करणार? म्हणून आता तिथेही फोन ठेवा, म्हणजे आम्हाला चालावे लागणार नाही.

**प्रश्नकर्ता :** म्हणजे जी सोय आहे त्यापेक्षा त्यांना जास्त सोय हवी असते? असेच ना?

**दादाश्री :** सोयीलाच गैरसोय करून टाकले आहे या लोकांनी. 'अबॉव्ह नॉर्मल' झाले की गैरसोय होते.

**प्रश्नकर्ता :** रक्षण करण्यासाठी जर माणसाने बुद्धीचा उपयोग केला तर ते नॉर्मल नाही का? हे ॲटमबॉम्ब बनवतात ते रक्षणासाठीच ना?

**दादाश्री :** त्याला रक्षण म्हणत नाहीत. समोरच्या व्यक्तीने पण बनविले तर काय होईल? मग किती अधिक भीती वाटेल? हे तर समोरच्याला दाबण्यासाठी करतात. असे रक्षण करण्याची गरज नाही. निसर्ग याचे रक्षण करतच असतो. गरज नसताना असे वादळ करण्याची गरजच नाही. अशी साधने बनवूच नये. मुंबईच्या तलावात विष मिसळले तर सगळे जण मरून जातील, याला काही बुद्धी म्हणता येणार नाही!

**प्रश्नकर्ता :** याला दुर्बुद्धी म्हणायचे का?

**दादाश्री :** याला दुर्बुद्धीही म्हणता येणार नाही. याला तर भयंकर नरसंहार म्हणावे लागेल.

**प्रश्नकर्ता :** मला 'मेकॅनिकल' बुद्धीची मर्यादा जाणून घ्यायची आहे. इनर (अंतर) बुद्धीची सुरुवात आणि त्याची मर्यादा जाणून घ्यायची आहे.

**दादाश्री :** ती जाणून घेऊन तू काय करशील?

**प्रश्नकर्ता :** माझ्यात ती किती आहे ते समजून घ्यायचे आहे.

**दादाश्री :** तुझी तर सर्व 'आउटर' (बाह्य) बुद्धीच आहे. 'इनर' (अंतर) बुद्धी असती तर तू कधीचाच या बाजूला वळला असतास, आणि माझ्याशी पटकन 'ॲडजस्ट' झाला असता. तू स्वतःच म्हणाला असता की 'माझी सेफ साइड' करा. माझ्या स्वातंत्र्यासाठी काही तरी करा. हे पारतंत्र्य मला आवडत नाही.

## परवशता

ही केवळ परवशता! निरंतर परवशता! प्राणी परवश आणि माणूस पण परवश. हे कसे चालेल? डोके दुखले तरी उपाधी, पाय दुखले तरी उपाधी, डोळे दुखले तरी उपाधी, दात दुखतात तरी उपाधी. अशा भयंकर अशातामध्ये कसे जगावे?

ही परवशता तुम्हाला थोडीफार समजली आहे का?

**प्रश्नकर्ता :** हो.

**दादाश्री :** अनुभवली आहे का?

**प्रश्नकर्ता :** हो.

**दादाश्री :** तुला ती आवडते?

**प्रश्नकर्ता :** नाही.

**दादाश्री :** नाही ना, तर मग ही परवशता कशी जाईल ते का विचारत नाहीस?

**प्रश्नकर्ता :** त्याचे उत्तर तर माणूस स्वतःहूनच शोधू शकतो.

**दादाश्री :** काही मर्यादेपर्यंत 'सोल्युशन' (उत्तर) शोधू शकेल.

जसे जसे वय वाढते तसतशी परवशता वाढत जाते आणि मृत्यूच्या वेळी तर परवशतेला सीमाच राहत नाही. म्हातारपणी दात दुखतात, शरीर

त्रास देते, मुले दुःख देतात, भाऊ दुःख देतात. मुले म्हणतात, 'तुम्ही आता बसून रहा, इतकी बडबड करू नका.' केवढी सारी परवशता?

**प्रश्नकर्ता :** परवशता आणि चिंता हे दोन्ही एकच नाहीत का?

**दादाश्री :** चिंता म्हणजे तर 'अबॉव्ह नॉर्मल' 'इगोइजम' आणि परवशता म्हणजे लाचारी. इगोइजम 'अबॉव्ह नॉर्मल' झाला तर चिंता होते, नाहीतर होत नाही. घरात रात्री झोप कोणाला येत नाही? ज्याला 'इगोइजम' जास्त आहे, त्याला.

**प्रश्नकर्ता :** अशा परिस्थितीत मला काहीच जमत नाही म्हणून चिंता होते आणि त्याचेच दुसरे 'स्टेप' म्हणजे परवशता, असेच ना?

**दादाश्री :** ती परवशता आपण निर्माण केली आहे. एक परवशता तर आपोआपच उत्पन्न होते, ती म्हणजे म्हातारपणाची. परवशता आणि चिंता यांचा काहीच संबंध नाही.

कुठलीही वस्तू बिघडली की चिंता होते. परिणामाबद्दल चिंता होते. आणि परवशता म्हणजे तर लाचारी आहे. जगात कोणालाच परवशता आवडत नाही. परवशता हीच दुर्बलता आहे. दुर्बलता असेपर्यंत परवशता जात नाही. कारण आपण जर समोरच्याचे नुकसान केले तर तो आपले नुकसान करील. आपण जर कोणाचे नुकसान केले नाही, कोणाबद्दल वाईट विचार केले नाहीत, तर ती परवशता संपेल.

**प्रश्नकर्ता :** माणसाला जीवननिर्वाहासाठी चिंता वाटते म्हणून परवशता येते ना?

**दादाश्री :** ती परवशता वेगळी आहे. तो स्वतःच आपल्या जाळ्यात घुसला आहे. घुसायचे नसेल तरी नैसर्गिकपणे सर्व काही उत्पन्न होते. उंदराला जेव्हा पिंजऱ्यात काही तरी दिसते तेव्हा तर तो परवश नसतो, पण त्याला आतमध्ये खायची वस्तू दिसली म्हणून लोभापोटी जर तो आत घुसला तर अडकेल. पण अशी परवशता कधी ना कधी सुटेलच.

चिंता करण्याचे फळ काय? तर जनावरगती.

**प्रश्नकर्ता :** चिंता वाटू नये यासाठी काय उपाय?

**दादाश्री :** परत फिरणे. अहंकाराला बाजूला सारून परत फिरणे. किंवा मग 'इगोइजम' पूर्णपणे संपवून टाकणे. 'ज्ञानी पुरुष' भेटलेत आणि त्यांनी 'ज्ञान' दिले तर सर्व इगोइजम (अहंकार) संपून जाईल.

**प्रश्नकर्ता :** लाचारी म्हणजे काय?

**दादाश्री :** लाचार झालेल्या माणसाला विचारले तर लाचारी म्हणजे काय ते कळेल. किंवा खूप उधारी झाली असेल, रोजच्या जीवनावश्यक वस्तू मिळणे मुश्कील झाले असेल, बायको विचारत असेल, 'तुम्ही हे का आणत नाही?' अशा वेळी जवळ पैसे नसतील तर निव्वळ परवशता वाटते.

परवशतेमधून 'स्ववश' (स्वतंत्र) होण्यासाठी हे महावीरांचे विज्ञान आहे. आणि परवशतेमधून 'स्ववश' झालात की मग परवशता स्पर्शच करत नाही.

**प्रश्नकर्ता :** आत्म्याला परवशता नसतेच ना?

**दादाश्री :** नाही, आत्म्याला परवशता नसते.

**प्रश्नकर्ता :** तर मग शरीर लाचारी अनुभवते का?

**दादाश्री :** नाही, शरीर पण लाचारी अनुभवत नाही. अहंकार लाचारी अनुभवतो.

## आधार-आधारी

**प्रश्नकर्ता :** जे व्हायचे असते ते होतच असते. मग काहीही करा.

**दादाश्री :** जे व्हायचे असते ते होतेच असे बोलूच नये. कोणी शिव्या दिल्या, त्या वेळी जर चिंता वाटत नसेल तर ते ज्ञान उपयोगी आहे. तुम्हाला तर चिंता होतेच. तुम्ही तर संपूर्णपणे हादरता. कमकुवतपणा वाटू लागतो.

**प्रश्नकर्ता :** चिंता कोणाला होते? मला की माझ्या आत्म्याला?

**दादाश्री :** तुम्हाला होते.

**प्रश्नकर्ता :** म्हणजे शरीराला होते, असेच ना?

**दादाश्री :** तुम्हाला, तुम्ही 'सेल्फ' (स्वत:) असे ज्याला मानता त्याला होते. 'हे शरीर माझे आहे' असे जो मानतो त्याला चिंता होते.

**प्रश्नकर्ता :** 'मी म्हटले, पण त्याच्याशी माझा काहीच संबंध नाही', असे जर म्हटले, तर मग चिंतेचा काही प्रश्नच नाही ना?

**दादाश्री :** तुमच्यावर जर या संसाराचा काहीच परिणाम होत नसेल तर हरकतच नाही. तुम्हाला हे ज्ञान समजण्याची गरजच नाही. पण तुम्हाला कसल्या तरी प्रकारे हा संसार 'इफेक्टिव' (परिणामकारक) आहे असे वाटते का? हे सर्व 'रिलेटिव्ह' आहे. तुमच्यावर त्याचा परिणाम होतो का?

**प्रश्नकर्ता :** हो.

**दादाश्री :** जोपर्यंत तसा परिणाम होतो, तोपर्यंत दुर्बलता आहे. भयंकर दुर्बलता! माणसावर परिणाम होताच कामा नये.

इथे तर असे बंगले, मोटार सगळी साधने आहेत तरी पण परिणाम होतो, मग ही साधने नाहीशी झाली तर काय होईल? मग मनुष्य कल्पांत करून-करून आयुष्य काढतो. म्हणून आसपास काय आहे? हे जर अगोदरच जाणून घेतले असेल तर मग तुमच्यावर त्याचा परिणाम होणार नाही, पण ते जाणून न घेतल्यामुळे तुम्हाला सगळे आपल्या डोक्यावर घ्यावे लागते. लोक रात्री दु:ख डोक्यावर ठेवून झोपतात आणि झोप येत नाही. जेव्हा शरीर थकते, तेव्हा झोप येते. याला 'जीवन' कसे म्हणणार?

'तुम्ही' कोण आहात? 'तुम्ही' कोणाच्या आधारावर आहात? त्याची माहिती नाही. 'हे सगळे कशाच्या आधारावर आहे' त्याची तर

माहिती असायला हवी ना? आपण कुठल्या आधारावर उभे आहोत हे समजण्यासाठी आधार-आधारी यातला संबंध तर समजायला हवा ना? 'पोलिस' येत आहेत असे जरी कोणी म्हटले तरी ते येण्यापूर्वीच तुम्ही हादरून जाता. इतकी दुर्बलता कशासाठी? जग तर खूप खोल आहे. अनेक जन्म पाहत आलो आहोत. पण (तरी) लक्षात राहत नाही ना? म्हणूनच जाणण्यायोग्य हे जग आहे.

आणि ह्या जगात काय करणे योग्य आहे आणि काय करणे योग्य नाही. 'काय जाणणे योग्य आहे आणि काय जाणणे योग्य नाही', एवढेच समजून घ्यायला हवे.

## कर्ताभाव हाच कुसंग

स्वत:चे दोष दिसू लागतात, तेव्हापासून समकित झाले असे म्हटले जाते.

**प्रश्नकर्ता :** त्यामुळे त्याच्यात नम्रता येते का?

**दादाश्री :** नम्रता येईल, न येईल, पण जेव्हापासून स्वत:चे दोष दिसू लागतात तेव्हापासून समकित मानले जाते. नाहीतर स्वत:चा एकसुद्धा दोष दिसत नाही. 'मीच कर्ता आहे' असे वाटत असते!

आपल्या 'ज्ञाना'साठी कर्ताभाव हाच कुसंग आहे. एवढेच नाही तर त्याचा कैफ चढतो. जिथे कर्तापद आहे तिथे समकित पण नसते आणि जिथे समकित नसते तिथे मोक्षाबद्दल बोलणेच चुकीचे आहे, निरर्थक आहे!

## ज्याचे निदिध्यासन कराल...

**प्रश्नकर्ता :** दादा, तुमच्या स्मरणात आणि निदिध्यासनात काही फरक आहे का?

**दादाश्री :** निदिध्यासन हे मुखारविंदासहित असते. आणि स्मरण मुखारविंदाशिवाय राहू शकते. मुखारविंदासहितचे निदिध्यासन खूपच

परिणामकारक असते. 'दादा' 'एक्झॅक्ट' दिसले नाहीत तरी हरकत नाही. डोळे दिसले नाहीत तरी हरकत नाही, पण मूर्ती दिसली पाहिजे. ज्यांचे निदिध्यासन करतो, तद्रुप आपण होऊन जातो. दादा स्वत: स्वभावाचे कर्ता आहेत. 'दादा' जर 'एक्झॅक्ट' दिसले तर 'दादा' स्वरूप होता येईल. तुम्ही पण स्वभावाचे कर्ता व्हाल! 'दादां'चे स्मरण राहिले तरी पण चांगले आणि त्यांचे निदिध्यासन राहिले तरी पण चांगले.

**प्रश्नकर्ता :** सतत निदिध्यासन राहत नाही.

**दादाश्री :** दादांच्या स्मरणात मनाची चंचलता असते, चित्ताची चंचलताही असते आणि निदिध्यासनात चंचलता नसते. निदिध्यासनात चित्ताला तिथे हजर राहावे लागते. चित्त हजर असेल तोपर्यंतच निदिध्यासन राहील. मन चंचल असेल तरी हरकत नाही, पण चित्ताला मात्र तिथे हजर राहावेच लागेल आणि चित्त जिथे हजर असेल, तिथे मनाला बसून रहावे लागते. तरीही पूर्ण दिवस दादांचे स्मरण राहिले तरी खूप झाले. पण त्याचबरोबर थोडे-थोडे निदिध्यासन असेल तर उत्तम.

स्वप्नात तर दादा 'एक्झॅक्ट' दिसतात. ज्यांची आपण भक्ती करतो, त्यांच्यासारखे आपण बनून जातो. ज्यांचे निदिध्यासन करतो तसे आपण होतो. चित्त जर जाग्यावर राहिले तर निदिध्यासन होऊ शकते.

## अध्यात्म्याचे वातावरण

**प्रश्नकर्ता :** एखाद्या राजा-महाराजांच्या घरी किंवा एखाद्या चांगल्या अनुकूल ठिकाणी जन्म झाला तर तो अध्यात्मात प्रगती करू शकतो ना?

**दादाश्री :** हो. राजा-महाराजांच्या घरीही जन्माला येतो किंवा इथे एखाद्या चांगल्या घरी जन्माला येतो जिथे त्याला सगळीकडून मान मिळतो. सासरी गेला तर तिथेही मानपूर्वकच असते. ज्याचा लहानपणापासून अपमान होत असतो तो मग मनात ठरवतो की कसेही करून मी या लोकांकडून मान मिळवीनच. म्हणजेच त्याचे ध्येय बदलते आणि तो

'माना'कडे वळतो. त्याचा हा मानाचा माल पोसला जातो. नाहीतर दुसरी कुठली भीक असेल त्याचा मान पोसला जात नाही.

या हिंदुस्तानात जन्म झाला तोच अनंत जन्मांच्या आधारामुळे झाला आहे. नाहीतर फॉरेनचे लोक अध्यात्मात पुनर्जन्म समजतच नाहीत.

## विकल्पांद्वारे संसाराचे कर्मबीज

इथे शीशमहल असेल आणि आपण एकटे उभे असू तरी आपल्याला आपण दिडशे दिसू! असे आहे हे जग! विकल्प केला की तसे दिसते. विकल्पाची तशी प्रतिस्पंदने येतात.

**प्रश्नकर्ता :** विकल्पांची प्रतिस्पंदने येतात तर मग संकल्पांचा परिणाम काय?

**दादाश्री :** संकल्पांचा इथे काहीच संबंध नाही. विकल्पांचीच प्रतिस्पंदने येतात. 'संकल्प' म्हणजे 'माझे' झाले. विकल्प केल्यानंतर एखादी वस्तू आपली होते. मग आपण संकल्प करतो की ही माझी आहे. विकल्पातूनच हे सगळे उत्पन्न झाले आहे. म्हणजेच संकल्प बाधक नसतात पण विकल्पच बाधक असतात. 'निर्विकल्प' त्याचे सर्व काही मिटवून टाकते. विकल्प आहे म्हणून संकल्प निर्माण झाला. निर्विकल्प झाला की मग संकल्प पण नाहीत, विकल्प पण नाहीत, काहीच नाही.

'मी चंदुलाल आहे' असे जोपर्यंत वाटते तोपर्यंत विकल्पच आहेत, मग ते आचार्य महाराज असो किंवा कोणीही असो. 'मी शुद्धात्मा आहे' असे भान असेल तर त्याला निर्विकल्प म्हणतात. आता निर्विकल्प झालात तरी निर्विकल्प दशा का राहत नाही? तर त्याचे कारण मागची उधारी, पूर्वी ज्या कलमांचा भंग केला आहे, त्या कलमांतर्गत खटले चालणारच.

'शुद्धात्मा' झाल्यावर संकल्प आणि विकल्प दोन्ही गेले. आता मनातून जे बाहेर पडतात ते सर्व ज्ञेय आहेत. जोपर्यंत स्वत: विकल्पी आहे, तोपर्यंत ती ज्ञेये दिसत नाहीत. तो तर असेच म्हणतो की मलाच

विचार येतात, नाहीतर खरे म्हणजे स्वतः कल्प स्वरूप आहे. जसे चिंतन करतो तसा होतो. स्वतःला निर्विकल्प का म्हणतात? तर अज्ञान दशेत विकल्प केला होता, म्हणून आता ज्ञान प्राप्तीनंतर निर्विकल्प म्हटले जाते. मागे फिरलात म्हणून निर्विकल्प म्हटले गेले.

चिंतन फक्त स्वरूपाकडेच वळत नाही. ती नशा ज्ञानी पुरुष उतरवतात त्यानंतरच त्याचे काम होते.

शुभाचे मोठे-मोठे विकल्प केले असतील तर तेही फळ देतात. कोणाला मारून टाकायचे भाव केले असतील तर तसे फळ येते आणि दान देण्याचे भाव केले असतील तर तसे फळ येते.

**प्रश्नकर्ता :** तुम्ही म्हटले आहे की जग 'व्यवस्थित' आहे तर मग त्याला बदलण्याचा विकल्प का येतो?

**दादाश्री :** हे विकल्प तर पूर्वी जे विकल्प केले होते त्याचे फलस्वरूप येत आहेत. बिया टाकले असतील तर त्या उगवतीलच ना? तुम्ही जर त्या उपटून फेकून दिल्या नाहीत, उगवू दिल्या तर मग पुन्हा त्यांच्या बिया पडतात. म्हणून निर्विकल्प झाल्यानंतर त्यांना उपटून टाकायचे. 'समभावाने निकाल' करू लागला यालाच 'उपटून टाकणे' असे म्हणतात.

जग तर संपूर्ण व्यवस्थित आहे. मग भगवंतांनी ही गोष्ट उघड का केली नाही? कारण दुर्जन लोक त्याचा दुरुपयोग करतील, जग उलट्या मार्गाने चालू लागेल, म्हणून ही खरी गोष्ट सांगितली नाही. 'व्यवस्थित'च्या ज्ञानामुळे तुम्हाला संकल्प-विकल्प होत नाहीत. या जगात जर कर्तेपणा मिटला तर 'व्यवस्थित' समजेल, जोपर्यंत कर्तेपणा मिटत नाही तोपर्यंत समजतच नाही. स्वतः अकर्ता झाला की मग 'या सगळ्यांचा कर्ता कोण आहे' ते समजते. स्वतः कर्ता नाही तरी पण स्वतःला कर्ता मानतो, म्हणून त्याला खरा कर्ता कोण हे कसे समजेल?

**प्रश्नकर्ता :** स्वतःचे कर्तृत्व तर सोडत नाही.

**दादाश्री :** हो. आणि त्यामुळेच दुसऱ्याला कर्ता होऊच देत नाही

ना? नाहीतर जग 'व्यवस्थित'च आहे, पण कर्तेपणामुळे कल्पना उत्पन्न होतेच. 'अकर्ता' झाला की मग उकल होते. तोपर्यंत क्रोध-मान-माया-लोभ जात नाहीत, भय जात नाही. अशुभाचा कर्तेपणा सुटला तर शुभाचा कर्ता झाला. तरी पण कर्ता तर आहेच. म्हणूनच संकल्प-विकल्प झाल्याशिवाय राहतच नाहीत. आणि हे 'व्यवस्थित' पण त्याला समजत नाही. म्हणून मग आता 'माझे कसे होणार?' असे विचार येतात.

## विज्ञानाद्वारे मुक्ती

**प्रश्नकर्ता :** मोक्षाला जायची इच्छा आहे परंतु त्या मार्गात काही उणीव जाणवते मग काय करायला हवे?

**दादाश्री :** कुठल्या गोष्टीची उणीव वाटते?

**प्रश्नकर्ता :** कर्मे आहेत ना? कर्मे तर आपण करतच राहतो.

**दादाश्री :** कर्मे कशानी बांधली जातात, हे तुम्ही जाणून घ्यायला हवे ना?

**प्रश्नकर्ता :** अशुभ भावाने आणि शुभ भावाने.

**दादाश्री :** जो अशुभ भाव पण करत नाही आणि शुभ भाव पण करत नाही, त्याला कर्मे बांधली जात नाहीत. शुद्ध भाव असतील, त्याला कर्मे बांधली जात नाहीत. अशुभ भावाने पापबंधने पडतात आणि शुभ भावाने पुण्यबंधने पडतात. पुण्याची फळे गोड येतात आणि पापाची फळे कडू येतात. कोणी शिव्या दिल्या तर तोंड कडू होते ना?

**प्रश्नकर्ता :** हो.

**दादाश्री :** आणि कोणी हार घातला तर? गोड वाटते. शुभाचे फळ गोड आणि अशुभाचे फळ कडू आणि शुद्धचे फळ मोक्ष!

**प्रश्नकर्ता :** जीवाला मुक्ती कधी मिळते?

**दादाश्री :** शुद्ध झाला तर मुक्ती मिळते. शुद्धतेला काहीच चिकटू

शकत नाही. शुभाला चिकटू शकते. (आपला) हा शुभाचा मार्गच नाही. हा शुद्धाचा मार्ग आहे. म्हणजेच निर्लेप मार्ग आहे.

हे 'विज्ञान' आहे. 'विज्ञान' म्हणजे ते सर्व प्रकारे मुक्त करविते. जर शुद्ध झाला तर काहीही चिकटणार नाही आणि शुभ असेल तर अशुभ येऊन चिकटेल. म्हणून शुभवाल्याला शुभ मार्गाने चालावे लागेल. अर्थात शुभमार्गी जे काही करत असतील ते ठीकच आहे, पण हा तर शुद्धाचा मार्ग आहे. सर्वच शुद्ध उपयोगी. त्यामुळे यात इतर काही भानगडच नाही.

हा मार्गच वेगळ्या प्रकारचा आहे. हे विज्ञान आहे! विज्ञान म्हणजेच त्याला जाणून घेतल्यानेच मुक्त होता येते. करायचे काहीच नाही फक्त जाणून घेतल्यानेच मुक्ती! हे जे बाहेर आहे ते ज्ञान आहे. ज्ञान म्हणजेच ते क्रियाकारी नसते आणि हे विज्ञान क्रियाकारी असते. हे 'विज्ञान' प्राप्त झाल्यानंतर ते तुमच्या आत क्रिया करतच राहते. शुद्ध क्रिया करत राहते. अशुद्धता त्याला स्पर्शच करत नाही. हे विज्ञान वेगळ्याच प्रकारचे आहे. 'अक्रम विज्ञान' आहे!!

**प्रश्नकर्ता :** ज्याला निष्कामकर्म म्हणतात ते हेच का?

**दादाश्री :** निष्कामकर्म हे वेगळ्या प्रकारचे आहे. निष्काम कर्म हा तर एक प्रकारचा मार्ग आहे. त्यात तर कर्तापद हवे. स्वत: कर्ता असेल, तर निष्काम कर्म होईल. इथे कर्तापदच नाही. हे तर शुद्ध पद आहे. जिथे कर्तापद असते, तिथे शुभ पद असते, शुद्ध पद नसते.

**प्रश्नकर्ता :** शुद्धता आणण्यासाठी काय करायला हवे?

**दादाश्री :** करायला जाल तर कर्मबंधन होईल. तुम्ही 'इथे' सांगा की आम्हाला हे हवे आहे. केल्यामुळे कर्मे बांधली जातात. जे जे कराल, शुभ कराल तर शुभाची कर्मे बांधली जातील आणि अशुभ कराल तर अशुभाची कर्मे बांधली जातील आणि शुद्धमध्ये तर काहीच नाही. 'ज्ञान' आपलेआपण क्रियाकारी आहे. स्वत:ला काहीच करावे लागत नाही.

स्वत: महावीर भगवंतासारखाच आत्मा आहे पण त्याचे भान आलेले नाही ना? या 'अक्रम विज्ञाना'ने त्याचे भान येते. जागृती खूप वाढते. चिंता बंद होते, मुक्त होता येते! संपूर्ण जागृती उत्पन्न होते. हे 'केवळज्ञान' विज्ञान आहे. असे साधे-सुधे नाही. म्हणून आपले (मोक्षाचे) काम होऊन जाते.

**प्रश्नकर्ता :** दादा, आपण जेवढे 'ज्ञानी' आहात, तेवढे ज्ञान प्राप्त करण्यासाठी काय करायला हवे?

**दादाश्री :** त्यांच्यापाशी बसले पाहिजे. त्यांची कृपा प्राप्त केली पाहिजे. बस, आणखी काही करायची गरज नाही. 'ज्ञानीं'च्या कृपेमुळे सर्व काही होते. कृपेने 'केवळज्ञान' होते. काही करायला जाल तर कर्मबंधने पडतील, कारण 'तुम्ही कोण आहात?' हेच निश्चित झालेले नाही. 'तुम्ही कोण आहात?' हे निश्चित झाले की कर्ता निश्चित होईल.

## सापेक्ष व्यवहार

'व्यवहार' काय आहे, एवढेच जरी समजले तरी मोक्ष मिळेल. हा सारा 'रिलेटिव्ह' (सापेक्ष) व्यवहार आहे. आणि ऑल दिज आर रिलेटिव्ह टेम्पररी ॲडजस्टमेंटस् एन्ड रियल इज दि पर्मनन्ट ॲडजस्टमेंट.

नाशवंत वस्तूंमध्ये 'माझेपणा'चे आरोप करणे ही 'रॉंग बिलीफ' आहे. 'मी चंदुभाई आहे, हिचा पती आहे' ह्या सर्व 'रॉंग बिलीफस्' आहेत. तुम्ही 'चंदुभाई' आहात असे निश्चयाने मानता ना? पुरावा देऊ? 'चंदुभाई'ला कोणी शिवी दिली तर परिणाम होतो का?

**प्रश्नकर्ता :** अजिबात नाही.

**दादाश्री :** खिसा कापला गेला तर परिणाम होतो की नाही?

**प्रश्नकर्ता :** थोडा वेळ होतो.

**दादाश्री :** तर मग तुम्ही 'चंदुभाई' आहात. व्यवहाराने 'चंदुभाई' असाल तर तुम्हाला काहीच स्पर्शणार नाही.

**प्रश्नकर्ता :** जर असे असेल तर मग आमच्यात आणि इतरांच्यात फरकच काय? चुकीच्या गोष्टींचा त्याग करायलाच हवा. हळूहळू असा प्रयत्न करत गेलो तर फरक पडत जातो.

**दादाश्री :** जर मोक्षाला जायचे असेल तर खरे-खोटे या द्वंद्वातून बाहेर यावे लागेल आणि जर शुभातच यायचे असेल तर वाईट गोष्टींचा तिरस्कार करा आणि चांगल्या वस्तूंवर राग (मोह, आसक्ती) ठेवा. आणि शुद्धमध्ये चांगले-वाईट या दोन्हींबद्दलही राग-द्वेष नाही. प्रत्यक्षात चांगले आणि वाईट असे काही नसतेच. ती तर दृष्टीची मलिनता आहे. त्यामुळेच हे चांगले-वाईट दिसते. आणि दृष्टीची मलिनता हेच मिथ्यातत्त्व आहे. दृष्टीविष आहे. आम्ही ते दृष्टीविष काढून टाकतो.

## विनय आणि परम विनय

वीतरागींचा संपूर्ण मार्गच विनयाचा मार्ग आहे. या विनयधर्माची सुरुवातच हिंदुस्तानातून होते. हात जोडून नमस्कार करण्याची सुरुवात इथूनच होते, ती मग थेट साष्टांग दंडवतपर्यंत जाते. विनयधर्म तर अपार आहेत आणि परम विनय उत्पन्न झाला की मोक्ष होतो.

**प्रश्नकर्ता :** 'परम विनय' समजून सांगावा.

**दादाश्री :** तिथे वाद-विवाद नसतात, भांडण-तंटे नसतात, नियम नसतात. जिथे नियम असतील तिथे परम विनय राहू शकत नाही कारण तिथे आपल्याला नियमांच्या बंधनात राहावे लागते. आपण तर 'व्यवस्थित' जे करील ते पाहणारे आहोत. दुसरे काही आपल्याला कसे जमेल?

'रिलेटिव्ह' धर्मातदेखील जिथे विनय आहे तिथे मोक्षमार्ग आहे आणि विनय जर तुटला नाही तर मोक्षच आहे.

**प्रश्नकर्ता :** विनय आणि परम विनय यात काय फरक आहे?

**दादाश्री :** खूप फरक आहे. परम विनय तर माणसात उत्पन्नच होऊ शकत नाही. आत्मा प्राप्त झाल्यानंतरच परम विनय असतो आणि त्यामुळे वेगळेपणा वाटतच नाही. अभेद दृष्टी होते, अभेद बुद्धी होते

आणि जोपर्यंत विनय आहे तोपर्यंत 'मी आणि गुरुमहाराज' सर्व वेगळेच आहेत. तरी पण तो विनय 'परम विनया'कडे नेणारा आहे. ते पण एक स्टेशन आहे.

'ज्ञानी पुरुष' तुमच्या अविनयाची *नोंद* ठेवीत नाहीत. (नोंद = अत्यंत राग किंवा द्वेष यासह खूप काळ लक्षात ठेवणे, नोट करणे). तुम्हीच समजून घ्यायचे की 'मी कसा विनय ठेवू आणि कसा नाही? किंवा कसा न ठेवू?' तुम्ही चुकू शकता हे आम्ही जाणतो आणि या दूषमकाळात अविनयाची नोंद तर करूच शकत नाही ना? चौथ्या आऱ्यात अविनयाची नोंद करावी लागते. आता तर सर्व चालवून घ्यावे लागते. उलट अविनय करणाऱ्याला तर आशीर्वाद द्यावा लागतो!

## मिथ्याभास

मिथ्याभास म्हणजे काय? एका मोठ्या कार्यक्रमाला खूप मोठे-मोठे मंत्री आले होते. तिथे मंचावर ते सर्व बसले होते. तेव्हा मलाही मंचावर त्यांच्याबरोबर बसवले होते. जेव्हा मला ज्ञान प्राप्त झाले नव्हते तेव्हा मनात अशी भावना होती की खाली बसण्याऐवजी मंचावर बसायला मिळाले तर चांगले. त्या वेळी त्याची मला खूप किंमत वाटे आणि आता मंचावर बसविले तर ओझे वाटते, तो मिथ्याभास.

**प्रश्नकर्ता :** परंतु दादा, तुम्हाला तर कशाचेच दु:ख किंवा ओझे वाटत नाही ना?

**दादाश्री :** नाही, तसे ओझे वाटत नाही. पण आता 'इन्टरेस्ट' नसतो. म्हणजेच 'मुक्त' असे वाटते. आता आम्हाला कशातच 'इन्टरेस्ट' नसतो.

**प्रश्नकर्ता :** हळूहळू आमचा पण 'इन्टरेस्ट' कमी होत चालला आहे. तर मग जगायचे तरी कसे?

**दादाश्री :** तो मोह होता. मोह खूप त्रास देतो. आता तो तुम्हाला त्रास देणार नाही आणि संसार चालू राहील. रुची न ठेवता 'समभावाने निकाल' करा.

**प्रश्नकर्ता :** त्याला चांगले म्हणतात का?

**दादाश्री :** त्यांना 'ज्ञानी' म्हणतात. 'इन्टरेस्ट' शिवाय करतात त्यांना 'ज्ञानी' म्हणतात.

**प्रश्नकर्ता :** रुचीशिवाय एखादी गोष्ट केली तर शरीरावर त्याचा परिणाम होत नाही का?

**दादाश्री :** जो 'इन्टरेस्ट' होता, त्यामुळे शरीराला मोहाचा त्रास होत होता. शरीरावर त्याचा परिणाम होत होता. आणि यामुळे तर शरीर चांगले बनते. गुलाबाप्रमाणे उमलते. आणि रुची असलेल्या माणसांचे तोंड तर एरंडेल तेल चोपडल्यासारखे दिसते.

## सहजता आणि देहाध्यास

**प्रश्नकर्ता :** देह सहज झाला तर त्याला देहाध्यास म्हणतात का?

**दादाश्री :** सहजचा अर्थ तुम्ही काय समजता? सहजच्या भाषेत सहज समजला आहात की तुमच्या भाषेत? कोणी तुमचा खिसा कापला आणि तुमच्यावर काहीच परिणाम झाला नाही तर देहाध्यास गेला. देहाला जर कोणी कोणत्याही प्रकारे त्रास दिला आणि तो तुम्ही स्वीकारला तर तो देहाध्यास आहे. 'मला असे का केले?' असे वाटले तर तो देहाध्यास आहे.

ज्ञानींच्या भाषेत देह सहज झाला म्हणजे देहाध्यास गेला.

**प्रश्नकर्ता :** देह सहज झाला असे कधी मानले जाते?

**दादाश्री :** आपल्या देहाला कोणी काहीही केले तरी पण आपल्याला राग-द्वेष होत नाही, याला देह सहज झाला असे म्हणतात. आम्हाला पाहून समजून जा ना की सहज कशास म्हणतात? सहज म्हणजे स्वाभाविक, नैसर्गिक दशा, विभाविक दशा नाही. स्वत: 'मी आहे' असे भान नाही.

**प्रश्नकर्ता :** सहज कधी होता येते?

**दादाश्री :** हे 'ज्ञान' परिणमित झाले आणि कर्मे कमी होत गेली तर तो सहज होत जातो. आता एक-एक अंशाने सहज होत चालला आहे मग संपूर्ण सहज होऊन जाईल. देहाध्यास सुटला की मग सहजकडे प्रवास सुरू होतो. जितके अंश सहज होतो, तितके अंश समाधी असते. आता तुम्हाला 'मार्ग मिळाला आहे' अशी खात्री वाटते ना?

**प्रश्नकर्ता :** हो.

**दादाश्री :** ज्याला अशी खात्री झाली असेल त्याच्यासाठी अंत येईल. प्रत्येक गोष्टीचा अंत येतो, विचारांचा अंत येतो. ज्ञानाचा अंत येतो. सर्वांचा अंत येतो, फक्त अज्ञानाचा अंत मात्र येत नाही.

दृष्ट्यामध्ये दृष्टी पडली असे जे म्हणतात ते तर दृष्ट्यापासून खूप दूर आहेत. त्यांना द्रष्टा प्राप्त करण्यासाठी तर खूप वेळ लागेल. आपल्याला तर द्रष्टा प्राप्त झालेला आहे. जग ज्याचा शोध घेत आहे, ते आपल्याजवळ आहे, तर आता त्याचा उपयोग, शुद्ध उपयोग कसा करावा हे आपले काम आहे, त्याला पुरुषार्थ म्हणतात.

तुम्ही घरातून बाहेर पडताना शुद्ध उपयोग ठेवला की मग रियल आणि रिलेटिव्ह सर्व पाहत पाहत पुढे जाता येते. तेव्हा शुद्ध उपयोग राहतो. इथे कोणाबरोबर वार्तालाप करत असाल तेव्हा वार्तालाप करत राहायचे आणि आत शुद्ध उपयोगही चालू ठेवायचा. 'चंदुलाल' वार्तालाप करतो आणि 'तुम्ही' ते सर्व पाहत राहा. या प्रकारे उपयोग ठेवता येतो. ते काही फार अवघड काम नाही.

मनात तन्मयाकार परिणाम होत नाहीत, बोलण्यात तन्मयाकार परिणाम होत नाहीत, आचरणात तन्मयाकार होत नाहीत, म्हणजेच शुद्ध उपयोग. जागृती यायला वेळ लागतो. हळूहळू जसे जसे कषाय उपशम होतील, निकाली कषाय – 'डिस्चार्ज' कषाय कमी कमी होऊ लागतील, तशीतशी जागृती वाढेल. आता नवीन कषाय चार्ज होणार नाहीत, परंतु जे 'डिस्चार्ज' कषाय आहेत, त्यांचा 'डिस्चार्ज' होतच राहील.

आम्ही तुमच्या घरी आलो आणि त्यावेळी तुम्ही बायकोवर

चिडलेले असाल तर 'तुम्ही चुकीचे वागत आहात' अशी *नोंद* आम्ही ठेवत नाही. तुमचे ते चिडणे 'डिस्चार्ज' आहे. आम्ही तुम्हाला 'ज्ञान' दिले आहे म्हणून तुम्ही 'कच्चे' पडत नाही. पण डिस्चार्ज तर होणारच ना? आम्ही फक्त एवढेच पाहतो की उपयोग होता की नव्हता?

**प्रश्नकर्ता :** दृष्टीचा द्रष्टा शोधणे, ही गोष्ट अजूनही मला समजली नाही. ती जरा मला समजावून सांगा.

**दादाश्री :** आपण सर्व दृष्ट्याला शोधून मोकळे झालो आहोत. परंतु ज्याला स्वरूपाचे भान आलेले नाही त्याला आम्ही सांगतो की 'तुझी दृष्टी जिथे पडत आहे ते तर दृश्य आहे, पण तिथे द्रष्टा कोण आहे त्याचा शोध घे.' असे आम्ही सांगू इच्छितो.

बाहेर तर ही इंद्रियदृष्टी आहे. पण जेव्हा मनाच्या सर्व क्रिया - मन काय काय बोलते? काय विचार करते? मग बुद्धीच्या सर्व क्रिया - बुद्धी काय काय दाखविते? मग चित्त कुठे कुठे भटकते? अहंकार 'डिप्रेस' होतो की 'एलीवेट' होतो? या सर्व गोष्टी पाहत राहणे, तोच आपला द्रष्टा. दृष्टीचा विषय दृश्य आहे आणि आपण द्रष्टा आहोत.

**प्रश्नकर्ता :** बाहेरच्या किंवा आतील कोणत्याही घटनेमध्ये, किंवा कोणताही उदय असो तेव्हा आम्ही जाणतो की हा माझा स्वभाव नाही, तेव्हा अनुभव येतो ना?

**दादाश्री :** हो, होतो ना! 'हा माझा स्वभाव नाही' असे जो समजतो, तो 'स्वतःच्या स्वभावात' स्थिर होतो. चंदुलाल कितीही बेचैन झाले असतील तरी पण 'तुमची' जागृती जात नाही असे हे ज्ञान आहे, आणि बेचैनी तर होणारच, कारण आतमध्ये माल भरलेला आहे ना?

'डिस्चार्ज' म्हणजे उलटी असे समजा. एखाद्या माणसाची उलटी तुमच्या अंगावर पडली तर त्याच्यावर रागवायचे नसते, कारण त्या बिचाऱ्याला तसे करायचे नसते पण होऊन जाते. त्याला तो तरी काय करणार? तसेच हे कषाय उलटीप्रमाणे 'डिस्चार्ज' होत आहेत. पण नंतर चांगले होत जाते, भूमिका शुद्ध होत जाते.

उपयोग म्हणजे काय तर हजारा-हजाराच्या नोटा मोजत असताना त्याचा उपयोग दुसरीकडे जातो का? याला उपयोग म्हणतात. तसा उपयोग आमचा निरंतर असतो. आमच्या उपस्थितीत राहिलात तर तुम्हालाही उपयोग राहू लागेल.

**प्रश्नकर्ता :** या पदात किंवा इतर ठिकाणी वेगवेगळ्या प्रमाणात रुची असते त्यामुळे असे होते का?

**दादाश्री :** रुचीला पोषण देण्याची गरज नाही. तुम्हाला तर 'उपयोग' ठेवायचा आहे. 'चंदुलाल, तुम्ही आता दादांच्या दरबारात बसला आहात, तर आता इथे जे काय चालू आहे त्यात उपयोग ठेवून चाला.' मग तुम्ही 'पाहत' राहायचे, उपयोग चुकला तर लगेच सांगायचे 'चंदुलाल चुकलात, असे होता कामा नये.'

मला जर कोणी पाच किंवा दहा रुपयांची चिल्लर दिली तर मी मोजत बसत नाही. पंचवीस-पन्नास पैसे कदाचित कमी दिले असतील पण इतके मोजता मोजता माझा किती वेळ वाया जाईल? लक्ष्मीच्या बाबतीत नि:स्पृह व्हायचे नाही, परंतु त्यात उपयोग ठेवायचा नसतो.

उपयोग ही तर सर्वात उत्तम गोष्ट आहे.

उपयोग कधीपर्यंत द्यायचा आहे? रात्रं-दिवस 'दादां'ची आठवण येत राहते. त्यांच्याशिवाय करमतच नाही. त्यांचा 'विरह' वाटतो तेव्हा त्यातून 'इलेक्ट्रिसिटी' निर्माण होऊन प्रकाश उत्पन्न होतो, संपूर्ण स्वयं-प्रकाश!

## विरहीच्या वेदना

विरहीला वेदना उत्पन्न होतात. विरही म्हणजे काय? तर अजिबात चैनच पडत नाही. तेव्हा समजावे की आपण सगळ्या जंजाळातून सुटलो. नव विवाहित पत्नी असेल, तिचा पती ऑफिसला गेला असेल तरी पण तिचे चित्त सतत पतीतच रमलेले असते-मग ती घरी उत्तम स्वयंपाक करत असेल तरी.

त्याचे काय आहे की परमात्मा अभेद स्वरूपाचा आहे. अभेद स्वरूपाचा विरह वाटू लागला तर तुमचा संसार अतिशय सुंदर चालेल. पण हा तर उलट ढवळाढवळ करत असतो. खरे तर संसार सहजपणे चालेल असे आहे. उदा. जेवण झाल्यानंतर बाकी सर्व गोष्टी आतमध्ये सहज चालत असतात, तर बाहेर त्याहूनही अधिक सहज चालेल असे आहे. निसर्गाचा नियम असा आहे की तो आत आवश्यक असेल इतक्या प्रमाणातच पाचक रस घालतो, त्यामुळे आयुष्यभर त्याची मात्रा संतुलित राहते. आणि हा अभागी तर अशा तऱ्हेने घालतो की आज घातले तर पुढच्या वर्षी दुष्काळच पडेल!

**प्रश्नकर्ता :** 'ज्ञानी पुरुषां'च्या विरहामुळे जी वेदना उत्पन्न होते तिला कशा प्रकारची वेदना म्हणतात?

**दादाश्री :** ती वेदना तर अहाहा! आत 'इलेक्ट्रिसिटी' निर्माण होते आणि त्यामुळे स्वरूप तेजस्वी होत जाते. ती तर फारच उत्कृष्ट गोष्ट मानली जाते. विरह वेदनेचा उदय तर महाभाग्यानेच उत्पन्न होतो. दीर्घ काळाच्या परिचयामुळे त्याला असे होते. ज्याला मोक्षाला जायचे असते त्याला अशी वेदना उत्पन्न होते! त्यासाठी तुम्हाला जास्त घाई करण्याची गरज नाही. इतके सारे जन्म बिघडविले, आता आणखी एक-दोन जन्म लागले तर कोणते मोठे नुकसान होणार आहे? इतके जन्म तुम्ही भटकत होतात, त्याचा थकवा लागला नाही, तर काय आता एक-दोन जन्मासाठी थकवा लागणार आहे का?

## सच्चिदानंद स्वरूप

स्वत:चे जे स्वरूप आहे ते सच्चिदानंद स्वरूप आहे. सत्-चित्-आनंद. आणि हे असत् चित्त झालेले आहे. म्हणजे सुख पण काल्पनिक आहे आणि दु:ख पण काल्पनिक आहे. काल्पनिक असले तरी परिणाम खरे असल्यासारखाच होतो! सच्चिदानंद हे आपले मूळ स्वरूप आहे.

**प्रश्नकर्ता :** सच्चिदानंद स्वरूप प्रत्येकांमध्ये आहे का?

**दादाश्री :** हो, सर्वच जीवमात्रात आहे आणि तोच परमात्मा आहे!

सच्चिदानंद स्वरूपाचे दोन भाव आहेत. एक स्वभाव आणि दुसरे विभाव. विभाव म्हणजे विशेष भाव, विरुद्ध भाव नाही. ही तर संयोगांच्या दबावामुळे 'रॉंग बिलीफ' (चुकीची मान्यता) झाली आहे.

**प्रश्नकर्ता :** सच्चिदानंद स्वरूप साकार आहे की निराकार?

**दादाश्री :** ते रूपी नाही, अरूपी आहे. ही गोष्ट समजून घेण्यासारखी आहे. एकदमच समजण्याची गरज नाही. पण आता आपल्याला प्राप्ती कशी होईल हे समजून घ्यायचे आहे.

निराकार आहे असे म्हटले आहे तर आता निराकार समजून घ्या, मग पुढचे समजेल. निराकार तर काही हेतूने म्हटले गेले आहे. काही हेतुपूर्वकच्या गोष्टी अशा असतात की तो हेतू पूर्ण झाल्यानंतर समजतात. आत्मा निरंजन तर आहेच. त्याला कर्मांनी स्पर्श केलेलाच नाही. आजही तुमचा आत्मा 'शुद्धात्मा' आहे. स्पष्टपणे तसा दिसतो. मात्र तुम्ही 'माझ्याकडून' फक्त खूप पापे झाली आहेत, पुण्यकर्मे झाली आहेत, असे मानून चालला आहात. सर्व 'रॉंग बिलीफ' बसल्या आहेत. 'ज्ञानी पुरुष' या 'रॉंग बिलीफ' तोडून टाकतात आणि 'राइट बिलीफ' बसवून देतात. 'राइट बिलीफ' बसली की मग 'मी भगवानच आहे' असे भान येते.

## प्रशस्त मोह

माया म्हणजे अज्ञानता. माया असे काही नसते. माया 'रिलेटिव्ह' (सापेक्ष) आहे. विनाशी आहे आणि आपण अविनाशी आहोत. ती कधीपर्यंत टिकते? जोपर्यंत आपल्याला अविनाशी वस्तूंचा मोह असतो तोपर्यंत माया उत्पन्न होते. आणि आपल्याला स्वरूपाचा मोह उत्पन्न झाला, 'मी शुद्धात्मा आहे.' असा मोह उत्पन्न झाला की मग माया संपते.

**प्रश्नकर्ता :** काही काळानंतर स्वरूपाचा मोह देखील राहता कामा नये ना?

**दादाश्री :** स्वरूपाचा मोह तर चांगलाच आहे. त्याला मोह

म्हणतच नाहीत. त्याला आपण आपल्या भाषेत मोह म्हणतो. मोह म्हणजे तर मूर्छा. खरे तर त्याला आत्म्याची रुची म्हणत नाही, देहाचा मोह म्हटला जातो. आत्म्याची रममाणता आली की पर-रममाणता दूर होते. त्याचा संसार टळलाच!

**प्रश्नकर्ता :** गौतम स्वामींना महावीर स्वामींनी आपल्यापासून दूर केले, कारण गौतम स्वामींना महावीर स्वामींबद्दल मोह होता. तर त्या मोहाला कसला मोह म्हणणार?

**दादाश्री :** तो प्रशस्त मोह होता. जे मोक्षाला जाणारे असतात, त्यांच्याबद्दलही मोह उत्पन्न होतो. त्याला प्रशस्त मोह म्हणतात. पण शेवटी तर तो प्रशस्त मोह नुकसान करणारा नसतो. तो 'वस्तू' (आत्मा) प्राप्त करवून देईल. ज्ञान थोडे उशीरा होते, पण त्याला काय हरकत आहे?

वीतरागींबद्दल मोह, ज्यामुळे वीतरागता येईल अशा प्रकारच्या सर्व वस्तूंचा मोह, याला प्रशस्त मोह म्हटले जाते. मग तो मोह अगदी मूर्तीवर का असेना? पण त्यामुळे वीतरागता येते, म्हणून त्याला प्रशस्त मोह म्हणतात.

**प्रश्नकर्ता :** तुमच्याबद्दल मोह असेल तर त्याला प्रशस्त मोह म्हटले जाईल ना?

**दादाश्री :** हो, 'ज्ञानी पुरुषां'बद्दल मोह असणे याला तर खूपच उत्तम समजले जाते. कितीतरी जन्म त्याग केल्यामुळे, निर्वस्त्र फिरल्यामुळे त्याचा संसाराचा मोह कमी झालेला असतो, आणि मग त्याला 'ज्ञानी पुरुष' भेटतात.

## मन, विरोधाभासी

**प्रश्नकर्ता :** मनाला समजते की इकडे फसवणूक आहे, ती आवडत नाही आणि दुसरीकडे संसाराचे विचार येत राहतात. असे का?

**दादाश्री :** त्याचे कारण मन विरोधाभासी असते. आपल्या

समजेनुसार मन काम करते. आपल्याला माहीत असते की अहमदाबाद उत्तर दिशेला आहे म्हणून आपण आपली स्टीमर त्या दिशेने चालवितो, पण मग अचानक आपली समजूत बदलली किंवा चुकून स्टीमर दुसऱ्या दिशेला वळवली तर अहमदाबाद येईल का? म्हणजेच मन स्टीमरसारखे आहे. आपण त्याला जसे वळवू तसे ते काम करील. म्हणून आपल्या ज्ञानाने मनाला नीट समजावून सांगायला हवे. मग मन 'फर्स्ट क्लास' चालेल. मन ही गोष्ट पकडत नाही, आणि एकदा जर पकडली की मग सोडत नाही.

**प्रश्नकर्ता :** मग दादा, त्याने ती पकडावी यासाठी काय केले पाहिजे?

**दादाश्री :** ते सर्व आम्ही करून देतो. आम्ही 'ज्ञान' देतो त्याच दिवशी तुमचा आत्मा जागृत करतो, त्यामुळे मग मन या बाजूला वळते.

## शंकेचे उगमस्थान

व्यवहारात ज्या शंका येतात, ते मनाचे काम आहे. तो मनाचा गुण आहे. मन आणि बुद्धी एकत्र आले की तऱ्हेतऱ्हेची वादळे निर्माण करतात. जसे अवखळ वारा सुटल्यावर चक्रीवादळे निर्माण होतात तसेच मनातही चक्रीवादळे निर्माण होतात.

**प्रश्नकर्ता :** तर त्यात बुद्धी काय करते?

**दादाश्री :** हो, बुद्धी असते ना! मनाने स्वीकार केला की लगेच बुद्धी म्हणते, 'तसे नाही, असे आहे.' मग परत शंका येते. आतमध्ये पार्लमेंट आहे. आत्म्याबद्दल कोणी 'नि:शंक' झालेला नसतो. आत्म्याबद्दल नि:शंक झाला तर लक्ष बसून जाते.

**प्रश्नकर्ता :** मोक्ष मिळण्यासाठी पूर्णपणे नि:शंक होण्याची गरज असते का?

**दादाश्री :** आत्म्याबद्दल पूर्ण नि:शंक व्हावे लागते, पण आत्मा म्हणजे काय असेल? लोकांनी मानलेला आत्मा बुद्धीत सामावेल असा

नसतो. लोकांकडे बुद्धीच असते आणि आत्मा बुद्धीत सामावेल असा नाही, तर तो अमाप आहे. ज्याचे काही माप नाही, तोलमाप नाही, असा हा आत्मा फक्त ज्ञानानेच जाणता येतो. तेसुद्धा ज्ञानींच्या ज्ञानानेच आत्म्याचे लक्ष बसू शकते, नाहीतर लक्ष बसतच नाही.

**प्रश्नकर्ता :** 'कॉन्शियस माइंड' कशाला म्हणतात? ते मन आहे का?

**दादाश्री :** ते मनाला म्हणत नाहीत. ते म्हणजे चित्त. खरे मन जे आहे ते तर आत्म्याच्या सानिध्यामुळे उत्पन्न होते, त्याला हे लोक भाव म्हणतात.

**प्रश्नकर्ता :** आत्म्याशी त्याचा संबंध कोणत्या प्रकारचा असतो?

**दादाश्री :** फक्त 'टच' (स्पर्श) एवढाच संबंध आहे. सामीप्यभावामुळे चार्ज होत राहते. जोपर्यंत 'मी चंदुलाल आहे' असा भाव आहे, याचा पिता आहे, असे सर्व भाव होतात, तोपर्यंत 'स्पर्श' होत राहतो आणि 'चार्ज' होत राहते.

**प्रश्नकर्ता :** त्याला स्थूल मन म्हणतात का?

**दादाश्री :** नाही, हे आपण जे विचार करतो ते म्हणजे स्थूल मन. ते 'फिजिकल' आहे.

**प्रश्नकर्ता :** स्थूल आणि सूक्ष्म यात काय भेद आहे?

**दादाश्री :** स्थूल मन तर सर्वांनाच समजते. जे विचार करते ते स्थूल मन आहे आणि सूक्ष्म मन मात्र कोणाला समजतच नाही. फक्त 'ज्ञानी पुरुषां'नाच समजते. लोक 'भावमन, भावमन' असे बोलत राहतात पण भावमन म्हणजे नक्की काय ते त्यांना यथार्थ समजतच नाही.

**प्रश्नकर्ता :** ते यथार्थपणे केव्हा समजेल?

**दादाश्री :** ते तर 'ज्ञान' असेल तरच समजेल. 'ज्ञानी' होण्यापूर्वी काही काळ अगोदर 'भावमन' म्हणजे काय ते समजू शकते. जो स्वतःचा

अहंकार विलय करतो, अशा ज्ञानीला भावमन समजू शकते. स्वतः 'शुद्धात्मा' झाला म्हणून (नवीन) 'चार्ज' होणे बंद झाले. मग स्थूल मनाचा डिस्चार्ज होतच राहील, तेच त्याचे काम.

**प्रश्नकर्ता :** त्याच्यावर 'इफेक्ट' (परिणाम) होतो का?

**दादाश्री :** हो, मनाचा स्वभावच इफेक्टिव आहे ना? आपण समजून घ्यायचे की हे माझे स्वरूप नाही. तर मग इफेक्ट आपल्याला स्पर्श करणार नाही.

परवा तुम्ही तुमच्या मुलाला एखादी गाडी घेऊन हिंडताना पाहिले आणि आज जर तुम्हाला कोणी सांगितले की त्या गाडीला धडक बसून ती मोडली आहे, आणि तुम्ही ती गाडी पाहिली तर तुमच्यावर परिणाम होईल. पण नंतर जर कोणी म्हटले की नाही, ती गाडी तर कालच विकली गेली आहे. तर मग लगेच तो परिणाम नाहीसा होईल. सगळ्याच गोष्टी इफेक्टिव असतात. पण ज्ञान असेल तर इफेक्ट होत नाही. म्हणूनच आम्ही म्हटले आहे की मन इफेक्टिव आहे, वाणी इफेक्टिव आहे आणि देह सुद्धा इफेक्टिव आहे.

द्रव्यमन हे स्थूल मन आहे आणि भावमन सूक्ष्म मन आहे. भावमन बदलले तर मुक्त व्हाल. स्थूल मन कदाचित बदलले नाही तरी हरकत नाही. भावानुसार शिक्षा दिली जाते. द्रव्यात हिंसेचा विचार असतो, परंतु भाव वेगळा असू शकतो, म्हणून भावानुसार शिक्षा दिली जाते. द्रव्याच्या दोषाची शिक्षा इथल्या इथेच मिळते आणि भावातील दोषांची शिक्षा परलोकात (पुढच्या जन्मी) मिळते.

सध्या जगात जे जे धर्म चालू आहेत, त्यांची थियरी काय आहे? तर ते भाव नाही तर द्रव्य बदलायला जातात. लोकांच्या बाबतीत काय होत असते की द्रव्यानुसारच भाव बदलत राहतात. लोक चुकीचे करतात आणि तसे चुकीचे केल्यानंतरही 'असे तर करायलाच पाहिजे', असा भाव मनात पक्का करतात. म्हणून आमचा शोध असा आहे की जर द्रव्यमन बदलण्याचा प्रयत्न केलात तर ते कधी बदलणारच नाही. म्हणून

आम्ही स्थूल मन एका बाजूला ठेवले आणि स्थूल क्रियांनाही एका बाजूला ठेवले, शरीराच्या सर्व क्रियांना एका बाजूला ठेवले. आम्ही 'स्वरूपाचे ज्ञान' देतो. त्यानंतर संपूर्ण परिवर्तन होते, नाहीतर द्रव्यमनाच्या धक्क्यानेच माणूस चालत राहतो.

भावमन कोणाला समजतच नाही. भावमन आहे एवढे कळते पण ते कशा प्रकारे काम करते हे समजतच नाही.

**प्रश्नकर्ता :** म्हणजे ते 'अनकॉन्शियस्' आहे का?

**दादाश्री :** होय, ते अहंकाराच्या पडद्या मागे राहून, अंधारात सगळे काम करते. अहंकाराचा अंधार नसेल तर दिसेल. ही खूप सूक्ष्म गोष्ट आहे.

## बुद्धी मार्ग–अबुध मार्ग

जर संसारमार्गात 'डेव्हलप' व्हायचे (प्रगती करायची) असेल तर बुद्धी मार्गाने जा आणि मोक्ष मार्गाने जायचे असेल तर अबुध मार्गाने जा. आम्ही अबुध आहोत. आमच्यात किंचितही बुद्धी नाही. बुद्धी 'सेन्सिटिव' ठेवते. बुद्धीचे दोन प्रकार आहेत : एक सम्यक् बुद्धी आणि दुसरी विपरीत बुद्धी. इथे सत्संग होतो, त्यामुळे तुमची जी विपरीत बुद्धी असते, ती 'टर्न घेऊन (पूर्ण वळून) सम्यक् होते आणि सम्यक् बुद्धी मोक्षाला घेऊन जाते.'

**प्रश्नकर्ता :** अबुध झाल्यानंतर 'केवळज्ञान' उत्पन्न होते ना?

**दादाश्री :** 'अबुध' झाल्याशिवाय केवळज्ञान उत्पन्नच होत नाही. जिथे व्यावहारिक बुद्धी असते तिथे अहंकार असतो, अगदी ज्ञानी असले तरी, आणि बुद्धी नसेल तर व्यावहारिक अहंकार पण नसतो.

**प्रश्नकर्ता :** तर मग बुद्धी असणे चांगले की बुद्धी नसणे चांगले?

**दादाश्री :** मोक्षाला जायचे असेल तर बुद्धी उपयोगी नाहीच. बुद्धी तर संसारात भटकायला लावते. जिथे जाल तिथे नफा–नुकसानच

दाखविते. गाडीत बसताना देखील बुद्धी वापरली जाते की मी इथे बसलो तर फायदा आहे आणि तिथे बसलो तर नुकसान आहे! बुद्धीची भूक अशी असते की ती कधी संपतच नाही. म्हणून अंत येईल असे हवे. पूर्ण जग बुद्धीज्ञानातच असते.

**प्रश्नकर्ता :** बुद्धीच्या पुढे जायला पाहिजे का?

**दादाश्री :** बुद्धीच्या पुढे जाण्याशिवाय गत्यंतरच नाही. तोपर्यंत मोक्ष होणारच नाही.

## ज्ञानींची आज्ञा - प्रत्यक्ष मोक्ष वर्तना

**प्रश्नकर्ता :** ज्ञानींच्या आज्ञेतच वीतराग सामावलेले आहे असे का म्हणतात?

**दादाश्री :** त्या आज्ञेच्या व्यतिरिक्त दुसरा मार्गच नाही ना! जो ज्ञानींची आज्ञा पाळत नाही तो मोक्षाला जायला लायक नाही. जेव्हा लायक होईल तेव्हा तो आज्ञा पाळू शकेल. नाही तर स्वच्छंदीपणा उत्पन्न होईल. म्हणून श्रीमद् राजचंद्र यांनी म्हटले आहे :

*'रोके जीव स्वच्छंद तो पामे अवश्य मोक्ष,*
*पाम्या एम अनंत छे, भाख्युं जिन निर्दोष.*
*प्रत्यक्ष सत्गुरु योगथी स्वच्छंद ते रोकाय,*
*अन्य उपाय कर्या थकी प्राये बमणो थाय.'*

तुम्ही स्वत: थांबवायला जाल तर दुप्पट होईल. 'ज्ञानी पुरुषां'पाशी त्यांच्या आज्ञेची आराधना करणे, हाच एक उपाय. दुसरा कोणताच उपाय नाही.

## ज्ञानी, बालकासारखे!

हे लहान मूल रडते ते बुद्धीपूर्वक रडत नाही आणि 20-25 वर्षाची व्यक्ती बुद्धीपूर्वक रडते आणि 'ज्ञानी पुरुष' रडतात तेही बुद्धीपूर्वक रडत नाहीत. बालक आणि ज्ञानी दोन्ही सारखेच असतात. दोन्ही अबुधभाववाले असतात. बालकाचा उगवता सूर्य आणि ज्ञानींचा

मावळता सूर्य. बालकाला अहंकार असतो पण त्याला जागृती नसते. आणि आम्ही अहंकारशून्य आहोत.

जिथे बुद्धीचा उपयोग केला जातो, तिथे पाप बांधले जाते.

**प्रश्नकर्ता :** दादा, आम्ही चोवीस तास तुमचे नाव घेत राहिलो तर पाप बांधले जाणार नाही ना?

**दादाश्री :** दादांचे नाव घेणे म्हणजे स्वत:च्या 'शुद्धात्म्या'चेच नाव घेण्यासारखे आहे. ही भक्तीपदे म्हणतात ते स्वत:च्याच शुद्धात्म्याचे कीर्तन करण्यासारखे आहे. इथे सर्व काही स्वत:साठी आहे. ही आरती पण स्वत:चीच करत असतो, आमचे काहीच नाही. ज्याला जेवढे जमेल तेवढे त्याचे काम होईल.

## ओपन माइंड

जर 'ओपन माइंड' नसेल, नेहमी गोंधळलेलाच असेल, तर मुक्त हास्य उत्पन्न होत नाही.

**प्रश्नकर्ता :** 'ओपन माइंड' म्हणजे आपल्याला काय म्हणायचे आहे?

**दादाश्री :** जसे गुळाभोवती चारी बाजूंनी माश्या घोंघावत असतात, तशा प्रकारे मन एकाच जागी घुटमळत असेल तर त्याला 'ओपन माइंड' म्हणत नाहीत. ओपन माइंड म्हणजे ज्या वेळेस जे असेल त्यात एकरूप होऊन जातो. हसायच्या वेळी हसतो, गप्पा मारायच्या वेळी गप्पा मारतो, गायच्या वेळी गातो, सगळ्यात 'ओपन माइंड' असते.

## योगसाधनेद्वारे परमात्मदर्शन

**प्रश्नकर्ता :** योगसाधनेद्वारे परमात्मदर्शन होऊ शकते का?

**दादाश्री :** योगसाधनेमुळे काय होऊ शकत नाही? परंतु कसला योग?

**प्रश्नकर्ता :** सहज राजयोग म्हणतात तो योग.

**दादाश्री :** हो, पण तुम्ही राजयोग कशाला म्हणता?

**प्रश्नकर्ता :** मनाची एकाग्रता होते.

**दादाश्री :** त्याने आत्म्याला काय फायदा? तुम्हाला मोक्ष हवा आहे की मन मजबूत बनवायचे आहे?

**प्रश्नकर्ता :** फक्त परमात्म्याच्या दर्शनाबद्दल मी बोलत आहे.

**दादाश्री :** तर मग बिचाऱ्या मनाला कशाला त्रास का देता? एकाग्रता करायला हरकत नाही, पण तुम्हाला परमात्म्याचे दर्शन करायचे असेल तर मनाला त्रास देण्याची गरज नाही.

**प्रश्नकर्ता :** एकाग्रतेतून शून्यपणा येतो का?

**दादाश्री :** हो, येतो. पण तो शून्यपणा 'रिलेटिव्ह' आहे. 'टेम्परारी ॲडजस्टमेंट' (तात्पुरती तडजोड) आहे.

**प्रश्नकर्ता :** त्यावेळी मन आणि बुद्धी काय करतात?

**दादाश्री :** थोडा वेळ स्थिर राहतात, मग परत पूर्वीसारखे होतात. त्यात 'आपले' काहीच नाही. आपले ध्येय पूर्ण होत नाही आणि योग जर 'अबॉव नॉर्मल' झाला तर तो अतिरोगीष्ट आहे. माझ्याकडे योगवाले खूप जण येतात. त्यांनी इथे दर्शनासाठी अंगठ्याला स्पर्श केल्याबरोबरच त्यांचे पूर्ण शरीर थरथर कापते, कारण अहंकार बाहेर पडतो. जिथे जिथे काही कराल तिथे कर्तेपणाचा अहंकार वाढेल आणि कर्तेपणाचा अहंकार वाढेल तसातसा परमात्मा दूर दूर जात जाईल.

## साक्षीभाव

**प्रश्नकर्ता :** साक्षीभाव म्हणजे शेवट आला, असेच ना?

**दादाश्री :** सर्वच गोष्टीत साक्षीभाव असायला हवा. 'चंदुभाई नालायक आहेत' असे म्हणताच साक्षीभाव राहत नाही. खिसा कापला गेला तरी साक्षीभाव राहत नाही. कारण साक्षीभाव अहंकाराने असतो. साक्षीभावाचा अर्थ काय? खरे म्हणजे साक्षीभाव ही वीतराग बनण्याची

एक पायरी आहे, खरी पायरी आहे. साक्षीभाव आणि द्रष्टाभाव यात खूप फरक आहे.

जिथे आत्म्याचे गुण नाहीत, तिथे आत्मा नसतो. हे सोने आहे आणि ते जोपर्यंत आपल्या गुणात असते तोपर्यंत ते सोने असते. दुसऱ्यांच्या गुणात स्वतः नसते. या संसारात जे दिसतात ते सर्व दुसऱ्यांचे गुण आहेत. तिथे 'स्वतः' नसतो. 'स्वतः' ज्ञाता-द्रष्टा असतो, पण एकाकार होत नाही. आत्मा भेसळयुक्त नसतो, निर्भेळ असतो.

क्रमिक मार्गात सर्व जागृतीमध्ये आणण्याचे मार्ग आहेत. त्याने जागृती वाढत जाते. जेवढ्या बाबतीत वीतराग झाला, तेवढी जागृती त्याला असते आणि जेवढ्या बाबतीत राग-द्वेष शिल्लक आहेत तिथे जागृती राहत नाही. व्याख्यानात राग-द्वेष आहे. लोकांच्या बोलण्यात राग-द्वेष आहे. भले करण्यात राग-द्वेष आहे. शुभ करण्यात राग-द्वेष आहे. त्याबाबतीत त्यांना जागृती राहत नाही. राग-द्वेषामुळे जागृती थांबते. ज्याला तपाबद्दल राग (मोह, आसक्ती) असेल, त्याला दुसरे काहीच सुचत नाही.

## जर जीवाने स्वच्छंदीपणा सोडला तर...

स्वच्छंदीपणा सोडला तर मोक्ष मिळेल. गुरु पण स्वच्छंदी असता कामा नयेत. गुरु स्वच्छंदी असतील तर मग शिष्य पण स्वच्छंदी.

**प्रश्नकर्ता :** गुरु स्वच्छंदी कसे असतील?

**दादाश्री :** स्वच्छंदीच तर असतात! गुरुंचे गुरु, तेही स्वच्छंदी, म्हणजे सारे स्वच्छंदाचेच वादळ! गृहस्थ पण स्वच्छंदी आणि त्यागी पण स्वच्छंदी! स्वच्छंदी माणसाला एक प्रकारची नशा असते. 'स्वच्छंद कशाला म्हणतात' एवढे समजले तरी खूप झाले.

जो आमच्या आज्ञेत राहतो, तो स्वच्छंदीपणातून बाहेर पडतो. मग जरी संसारात तुमचा कितीही स्वच्छंद असेल तरी त्याला स्वच्छंद मानले जात नाही.

आत्म्याच्या बाबतीत स्वच्छंद, त्याला स्वच्छंद म्हणतात. संसारात

एखाद्याला दुपारी दोन वाजता चहा प्यायची सवय असेल तर त्याला आमची हरकत नाही. रात्री बारा वाजता नाश्ता करण्याची सवय असेल तरी आमची हरकत नाही. तो आत्म्याचा मार्ग नाही. तो तर व्यवहार आहे, संसार आहे. एखाद्याला तसे आवडते, एवढीच गोष्ट आहे.

सद्‌गुरु कोणाला म्हणतात ? हे सगळे गुरु तर आहेत, पण सद्‌गुरु कोणाला म्हणाल ? प्रभुश्रींना सद्‌गुरु म्हटले जाते. त्यांच्यात स्वच्छंदीपणाचा किंचित पण अंश नव्हता. त्यांचे सर्व कृपाळूदेवांच्या आधीन होते. कृपाळूदेव हजर असोत किंवा नसोत तरी पण त्यांच्याच आधीन! ते सच्चे पुरुष होते.

स्वच्छंदीपणामुळे अंतराय पडतात. ज्याला धर्माबाबत काहीच माहिती नाही त्याला अंतराय कमी पडतात. आणि धर्माच्या बाबतीत स्वच्छंदीपणा केला तर खूप अंतराय पडतात.

## ज्ञान, दर्शन आणि वर्तन

**प्रश्नकर्ता :** समजायला हवे की वर्तनात आणायला हवे ?

**दादाश्री :** वर्तनात आणायचे नाही, तर वर्तनात यायला हवे. समजण्याचे फळ काय ? तर ते 'आचरणात येतेच!' समज आहे तरी पण वर्तनात येत नाही तोवर त्याला दर्शन म्हणतात आणि वर्तनात आले तर त्याला ज्ञान म्हणतात.

**प्रश्नकर्ता :** समज, ज्ञान आणि वर्तन, हे सर्व समजले तरी पण वर्तनात येत नाही.

**दादाश्री :** हो, ज्ञानाशिवाय वर्तनात येत नाही. समज म्हणजे 'अनडिसाइडेड' (अनिश्चित) गोष्ट.

मी सांगितलेले तुमच्यावर ठसवायचे नाही. तुम्हाला स्वत:लाच समजायला हवे. माझी समज माझ्याजवळ आहे. तुमच्या मनावर ठसवल्याने काही काम होत नाही. तुम्हाला ते समजले तर आपोआपच तुम्ही त्या समजेनुसार वागू लागाल. ज्ञानात काहीही करण्याची गरज

नसते. समजण्याची गरज असते. 'ज्ञान' आणि समज यात काही फरक असेल का? तुम्ही माझ्याकडून समजून घ्या. ती समज मग हळूहळू ज्ञानात परिणमित होईल. 'ज्ञान' जाणता, परंतु वर्तनात येत नाही तिला समज म्हणतात.

ज्ञानाची आई कोण? तर समज. आईशिवाय मूल जन्माला येत नाही. कोणी मूल आकाशातून पडते का? नाही. आई तर हवीच ना? ज्ञानाची आई समज आहे. ती समज कुठून प्राप्त होणार? ते ज्ञानी पुरुषांपासून समजून घ्या. शास्त्रांपासून समजून घ्या. शास्त्रांपासून पूर्ण समज मिळत नाही पण थोडीशी समज मिळते.

आम्ही हे जे ज्ञान देतो ते 'केवळदर्शन' आहे. म्हणून यात पूर्ण समज आलेली आहे. आणि समजेतूनच वर्तन उत्पन्न होते परंतु समजच नसेल तर? वर्तनात कधीच येणार नाही. पूर्ण समज ते केवळदर्शन आहे आणि वर्तनात आले तर त्याला केवळज्ञान म्हणतात. केवळज्ञान म्हणजे पूर्णाहुती आणि केवळदर्शन म्हणजे केवळज्ञानाची सुरुवात.

समज कशाला म्हणतात? तर ठेच लागत नाही. (चिंता, कषाय, मतभेद होत नाहीत) संपूर्ण दिवसभर त्याला ठेचच लागत असते आणि म्हणतो 'मी जाणतो, मला समजते.' अरे बाबा, समज कशाला म्हणतोस? समज आणि ज्ञानात काय फरक आहे? समज आचरणात येत नाही तोपर्यंत त्या ज्ञानाला समज म्हणतात. ती समज हळूहळू आपोआप ज्ञानाच्या रूपात परिणमित होते. मग जेव्हा आचरणात येते तेव्हा समजावे की हे ज्ञान आहे, म्हणूनच तोपर्यंत समजत राहा.

शास्त्रांतून (ज्ञान) समजून घ्यायला गेला पण ते ज्ञान क्रियाकारी नसते आणि ही समज क्रियाकारी आहे. तुम्हाला काहीच करावे लागत नाही. आतून ज्ञानच सगळे करते. क्रियाकारी ज्ञान ते चेतनवंत ज्ञान आहे, तेच विज्ञान आहे. त्यालाच परमात्मज्ञान म्हणतात. आणि त्या शुष्क ज्ञानाला वांजोटे ज्ञान म्हणतात. पपई लागत नाही आणि मेहनत मात्र तेवढीच! संपूर्ण मनुष्य जन्म वाया जातो, म्हणून काही तरी समजायला हवेच ना? इथे फक्त समजायचेच आहे, करायचे काही नाही. जिथे

करणे असते, तो मोक्षाचा मार्ग नाही. जिथे समजणे आहे, तोच मोक्षाचा मार्ग आहे.

समज जेव्हा ज्ञानात परिणमित होईल, त्या दिवशी ती वस्तू (तो दोष) तुमच्याकडे राहणार नाही. तुम्हाला काहीच करायचे नाही. तुम्हाला ग्रहण किंवा त्याग करायचा अधिकारच नाही, कारण हा मोक्ष मार्ग आहे. ग्रहण-त्याग हे शुभाशुभ मार्गात असते, भ्रांति मार्गात असते, हा तर क्लीयर मोक्षमार्ग आहे.

जेव्हा तीच समज ज्ञानात परिणमित होईल, तेव्हा वर्तनात येईल. दादांनी जी समज दिली आहे, तीच समज अनुभव देत राहील. असे करत करत, अनुभव ज्ञान होत-होत ज्ञानाच्या रूपात ती परिणमित होईल, तेव्हा मग ती वस्तू (तो दोष) राहणार नाही.

मोक्षमार्ग सोपा आहे, सरळ आहे, आणि सुगम आहे. समभावी मार्ग आहे. काहीही मेहनत न करता चालेल असे आहे. म्हणून तुमचे काम पार पाडून घ्या. अनंत जन्मात हा योग परत येईल असे नाही.

देता येईल असे ज्ञान नसते. ज्ञान तर, आम्ही जी समज देतो त्या समजेमधून उत्पन्न होते. ज्ञान उत्पन्न झाले आहे हे कधी समजते? 'हे चुकीचे आहे' याला ज्ञान केव्हा म्हणायचे? तर आपोआप ती वस्तू (तो दोष) सुटते तेव्हा. सुटणे आणि ज्ञान होणे दोन्ही गोष्टी एकदमच घडतात. तोपर्यंत 'हे होता कामा नये, ते होता कामा नये' अशी समज तर असते. म्हणजेच आपले हे 'केवळदर्शन' अर्थात केवळ समज, याचे विज्ञान आहे. त्यानंतर तो केवळज्ञानात येतो.

**प्रश्नकर्ता :** समज आल्यानंतर ज्ञानात यायला किती वेळ लागतो?

**दादाश्री :** ज्याची समज जेवढी पक्की, तितकी त्याची ज्ञानात 'डेव्हलपमेंट' (प्रगती) होत जाईल. तसे कधी होईल याची चिंता करत बसायचे नाही. ते तर आपोआपच ज्ञानात परिणमित होईल. मग आपोआपच सुटेल. म्हणून तुम्ही फक्त इथे समजून घेत राहा. ज्ञानच काम करत आहे. तुम्हाला काहीच करायचे नाही. झोपतेही ज्ञान काम

करत आहे, जागे असतानाही ज्ञान काम करत आहे आणि स्वप्नातही ज्ञान काम करत आहे.

'दिल्लीला कसे जायचे' हे तू एकदा समजून घे, तर मग दिल्लीला पोहोचता येईल. समज म्हणजे 'बी' आहे आणि 'ज्ञान' म्हणजे 'झाड' आहे. तेव्हा तुम्ही थोडेसे पाणी शिंपडले पाहिजे आणि सोबत तुमच्या भावना जोडल्या पाहिजेत.

**प्रश्नकर्ता :** वर्तनात आले तर त्यालाच चारित्र्य म्हणतात का?

**दादाश्री :** हो, चारित्र्य म्हणतात. पण ते सम्यक् चारित्र्य आहे. फक्त 'केवळज्ञानी' आणि 'ज्ञानी पुरुष' यांचेच चारित्र्य केवळचारित्र्य असते.

**प्रश्नकर्ता :** केवळचारित्र्य आणि सम्यक्चारित्र्य यात काय फरक आहे?

**दादाश्री :** सम्यक्चारित्र्य हे जगातील लोक पाहू शकतात. केवळचारित्र्य कोणाला दिसत नाही. ते इंद्रियगम्य नसते. केवळचारित्र्य हे ज्ञानगम्य आहे.

**प्रश्नकर्ता :** श्रद्धा आणि दर्शन यात काय फरक आहे?

**दादाश्री :** दर्शन हे श्रद्धेपेक्षा उच्च गोष्ट आहे. श्रद्धा तर कधी अश्रद्धा पण होऊ शकते. एखाद्यावर श्रद्धा बसली असेल तरी ती श्रद्धा बदलू शकते. पण दर्शन मात्र बदलत नाही. दर्शन बदलण्यासाठी बदलणारा पाहिजे. सांगा, कोणाचे मिथ्यादर्शन बदलते का? गुरुंवर सहा महिने श्रद्धा ठेवली, तरी ती उडू शकते. वास्तवात तिला श्रद्धा म्हणता येणार नाही, त्याला विश्वास म्हणतात.

**प्रश्नकर्ता :** श्रद्धा आणि विश्वास यात काय फरक आहे?

**दादाश्री :** श्रद्धा हे दर्शनाहून खालचे पद आहे पण स्थिर आहे, डगमगत नाही असे आहे. परंतु लोक तो शब्द अयोग्य तऱ्हेने वापरतात. महाराज म्हणतात, 'माझ्यावर सहा महिने श्रद्धा ठेवा.' पण साहेब, माझी

तुमच्यावर श्रद्धा बसत नाही, तर मी ती कशी ठेवू? मी तिकीट चिकटवायला जातो पण ते चिकटतच नाही. तुम्ही श्रद्धा बसेल असे काही बोललात तर माझी तुमच्यावर श्रद्धा बसेल. म्हणजेच मला असे म्हणायचे आहे की श्रद्धा ही ठेवण्याची वस्तू नाही, श्रद्धा बसलीच पाहिजे.

आतमध्ये जी *सूझ* पडते (सुचते) ते दर्शन आहे. कोणाला *सूझ* जास्त पडते आणि कोणाला पडतच नाही! *सूझ* ही निसर्गाची देणगी आहे. ती अहंकारी गोष्ट नाही. 'नॅचरल गिफ्ट' आहे. प्रत्येकाकडे त्याच्या त्याच्या कुवतीप्रमाणे *सूझ* असते. लहान मुलालासुद्धा *सूझ* पडते!

## धर्माची दुकाने

**प्रश्नकर्ता :** सर्व प्रकारचे धर्म म्हणतात की आमचे खरे आहे, आमचे खरे आहे, मग खरे कोणाचे समजावे?

**दादाश्री :** वीतरागींचे. वीतरागींचे बोलणे समजण्यासारखे आहे, वीतरागींनी सांगितलेले मान्य करा. या सर्व दुकानात खरी गोष्ट नाही. प्रत्येकाची आपली-आपली गोष्ट असते. ती त्याच्या त्याच्या दृष्टीने बरोबर आहे. कोणाचीच चुकीची नाही.

**प्रश्नकर्ता :** सगळ्या गोष्टीचे सार एवढेच असते की 'मी' जाईल तेव्हाच काहीतरी होईल.

**दादाश्री :** ज्या दुकानाचा कोणी मालक नसेल, अशा मालक नसलेल्या दुकानात जाऊन बसा. जिथे 'मी' गेलेला असेल, जिथे क्रोध-मान-माया-लोभ दिसत नसतील, तेथील बोलणे ऐका, तर मोक्ष होईल, नाहीतर होणार नाही.

व्याख्यानात तर ऐकणाराही वेगळा आणि बोलणाराही वेगळा. त्याला व्याख्यान म्हणतात, आख्यान म्हणत नाहीत आणि मोक्षमार्गात तर आख्यानच नाही, मग व्याख्यान कुठून असेल?

**प्रश्नकर्ता :** आख्यान आणि व्याख्यान यांचे मर्म काय आहे?

**दादाश्री :** दोन-चार व्यक्तींबरोबर बोलणे म्हणजे आख्यान आणि पूर्ण समूहात बोलणे याला व्याख्यान म्हणतात.

## अनुकूलतेत सावधगिरी

**प्रश्नकर्ता :** रागाशिवायचे (मोह, आसक्ती नसलेले) प्रेम अनुभवास आलेले नाही, म्हणजे ही गोष्ट सामान्य कल्पनेपलीकडील आहे.

**दादाश्री :** इतर सर्व लोकांबरोबरचा हिशोब द्वेषाचा असतो. त्याचा 'समभावाने निकाल' करावा लागतो. त्यांना प्रतिकूल कषाय म्हणतात आणि ह्या रागवाल्याला अनुकूल कषाय म्हणतात. अनुकूलला जेव्हाही सोडायचे असेल तेव्हा सोडता येते, पण अनुकूलतेत खूपच जागृती ठेवावी लागते. प्रतिकूल गोष्टी कडू लागतात आणि कडू लागतात म्हणून ताबडतोब जागृती येते. अनुकूल गोड वाटते.

आम्हाला 'स्वरूप ज्ञान' झालेले नव्हते तेव्हा आम्ही अनुकूल स्थितीत फार सावध राहत असू. प्रतिकूलतेत तर आपल्याला कळते. अनुकूलतेतच बहुतेक सर्व भरकटतात. एखाद्याच्या घरात साप घुसला असेल आणि त्याने पाहिला असेल तर त्याला आपल्याला सांगावे लागत नाही की साप घुसला आहे, जागा रहा! म्हणजे सतत जागृत राहण्यासारखे हे जग आहे. ह्या ज्या चुका होतात, डुलकी लागते, ते कशामुळे? तर अनुकूलतेमुळेच असे होत असते.

## बंध - निर्जरा

निर्जरा होते तेव्हा कधी एकदम कडू, तर कधी एकदम गोड लागते. त्या कडू आणि गोड दोन्हीला आपण वेगळे राहून, 'शेजारी' राहून 'पाहत' राहायचे. कडू-गोड हा निरंतरचा पौद्‌गलिक स्वभाव आहे.

**प्रश्नकर्ता :** शरीरात निर्जरा खुशाल चालू असो. सांभाळण्याची गरज नाही.

**दादाश्री :** सांभाळायचे काही नसतेच ना? आणि सांभाळून काही सांभाळले जातही नाही ना? सांभाळायचे आहे स्वतःचे स्वरूप!

ज्या भावाने बंध पडला असेल त्याच भावाने निर्जरा होईल. तो त्याचा स्वभावच आहे. बंध 'आपल्या' हजेरीत बांधला गेला होता पण निर्जरा तर गैरहजेरीतही होऊ शकते. आपल्याला जरी संवर (शुद्ध उपयोगपूर्वक कर्मांची निर्जरा, ज्यामुळे नवीन कर्मे चार्ज होत नाहीत) असेल तरीही निर्जरा होऊ शकते. परंतु बंध मात्र कधी 'आपल्या' गैरहजेरीत पडत नाहीत. म्हणजेच ज्या भावाने बंध पडले होते, ते स्वत:च्या हजेरीत पडले होते. आणि आता निर्जरा पण त्याच भावाने होईल. त्याला आपण पाहत राहायचे की अरे! असे बंध पडले असावेत, असे दिसते.

**प्रश्नकर्ता :** ज्या भावाने बंध पडत असतात त्याच भावाने बंध सुटतात का?

**दादाश्री :** त्या भावाने नाही. भावाने बंध सुटत नाही. त्याच भाववाले परिणाम उत्पन्न होतात. ज्यांना क्रूर भावाचा बंध पडला असेल, तर त्याचा परिणाम होताना ते सर्व क्रूर दिसतात. परंतु आज हे भाव 'आपले' स्वत:चे नाहीत. ही तर निर्जरा होत आहे. 'निर्जरा कशी होत आहे' ते पाहत राहायचे! त्यावरून कसला बंध पडला होता, कोणत्या भावामुळे बंध पडला होता, या निर्जरेचे रूट कॉज (मूळ कारण) काय होते ते समजते.

## देवी-देवता यांचे विचरण

**प्रश्नकर्ता :** देवता सात क्षेत्रात विचरण करतात का?

**दादाश्री :** जिथे माणसे असतात तिथे देवी-देवता जाऊ शकतात. खास करून जिथे तीर्थंकर असतात तिथे देवी-देवता अधिक जातात. आपल्या या भूमीवर ते कमी वेळ येतात. आपली ही भूमी खूप घाण आणि दुर्गंधयुक्त आहे म्हणून इथे देवी-देवता येत नाहीत. 'ज्ञानी' असतात तिथे देवी-देवता येतात. जिथे विधी, पूजा वगैरे होत असते तिथेही देवी-देवता जातात, मग जरी तिथे 'ज्ञान' नसेल तरीही!

## धर्म : अधर्म - ही एक कल्पना

हे धर्म कसे आहेत? अधर्माला धक्के मारणे, त्याचे नाव धर्म.

फक्त धर्मच ठेवायचा आणि अधर्माला धक्के मारायचे. कोणाला धक्के मारणे ही काय चांगली गोष्ट आहे का?

**प्रश्नकर्ता :** अधर्माचे रूपांतर धर्मात करायला हवे.

**दादाश्री :** धर्म आणि अधर्म या दोनही गोष्टी काल्पनिकच आहेत ना? आपल्याला कल्पनेतून बाहेर पडायचे आहे की कल्पितमध्येच भटकत राहायचे आहे? कल्पित तर अनंत जन्म भटकवत आले आहे. धर्म म्हणजे कोणाचे तरी चांगले करणे, जीवमात्राला सुख देणे. पण सुख देणारा कोण आहे? तर 'अहंकार'. धर्माचे फळ भौतिक सुख-शांती मिळते आणि अधर्माचे फळ भौतिक अशांती मिळते. परंतु या प्रकारे धर्म करून देखील जनावर गतीत जावे लागते. जनावरगतीत कसे जातात? तर बिन हक्काचे गोळा करण्याचे विचार येणे ही पाशवतेची निशाणी आहे. त्यामुळे पशुयोनीत जावे लागते. हक्काचे उपभोगा, हक्काची स्त्री, हक्काची मुले, हक्काचे बंगले, उपभोगणे याला माणुसकी म्हणतात आणि स्वत:च्या हक्काचेही दुसऱ्याला देणे, याला देवत्व म्हणतात.

## मुक्तीचे साधन - शास्त्र की ज्ञानी पुरुष?

जे ज्ञान हितकारी होत नसेल ते कधीपर्यंत ऐकावे? तर जोपर्यंत 'ज्ञानी पुरुष' भेटत नाहीत तोपर्यंत. जोपर्यंत इंदूरी गहू मिळत नाही तोपर्यंत रेशनचे गहू खावे लागतीलच ना? परंतु जर 'ज्ञानी पुरुषां'चा योग जुळून आला की मग तुम्ही मागाल ते मिळेल. अध्यात्म्यात तर जे मागाल, ते मिळेल. कारण 'ज्ञानी पुरुष' मोक्षदाता पुरुष आहेत. मोक्षाचे दान देण्यासाठीच आले आहेत. स्वत: तर मुक्त झाले आहेत. तरणतारण झाले आहेत. स्वत: तरले आहेत आणि अनेकांना तारण्यास समर्थ आहेत. त्यांच्याकडे सर्व गोष्टी मिळतात. तुम्ही मला भेटलात म्हणून मी तुमच्याशी बोलत आहे. सर्व जंजाळातून मुक्त होण्याचे हे साधन आहे.

**प्रश्नकर्ता :** धार्मिक पुस्तके जंजाळातून मुक्त होण्यासाठीच लिहिली गेली आहेत ना?

**दादाश्री :** हो, परंतु ही पुस्तके जंजाळातून कसे मुक्त व्हावे या

बाबत काहीच सांगत नाहीत. ती तर फक्त धर्म करण्यासाठी आहेत. जेणेकरून जगात अधर्माचे वर्चस्व होत नाही. म्हणून असे काही चांगले शिकवितात. त्यामुळे सांसारिक सुख मिळते, अडचणी येत नाहीत, खायला-प्यायला मिळते, पैसे मिळतात, म्हणून धर्म शिकवीत राहतात. मात्र ज्ञानी पुरुष तर क्वचित कधी असतात. मी जे सांगतो त्या गोष्टी इतर कुठेही नसतात. पुस्तकात पण नसतात, कारण वर्णन करता येईल असे हे नाहीच. हे सर्व फक्त 'ज्ञानी पुरुषां'कडेच असते. ते तुम्हाला जे सांगतात, ते तुम्हाला बुद्धीद्वारे समजू शकते, आणि तुमच्या आत्म्याने कबुल केले तरच तुम्ही ते मान्य करा.

'ज्ञानीं'जवळ सरळ व्हावे लागेल. आडमुठेपणा अजिबात चालणार नाही. आणि जर तुमची चिंता गेली, मतभेद मिटले तर समजा की ऐकण्याचा काही परिणाम झाला आहे. इथे तर एक पण मतभेद गेला नाही, ध्यानात पण सुधारणा झाली नाही. आर्तध्यान आणि रौद्रध्यान चालूच आहे. याचाच अर्थ असा की धर्माचे एक अक्षर पण प्राप्त झालेले नाही. आणि तरी मनात असे मानून बसतो की 'मी तर गेली चाळीस वर्षे धर्म करत आहे, देवळांत आणि उपाश्रयांतच पडून असतो', पण त्याला काही अर्थ नाही, ते सर्व 'मीनिंगलेस' आहे. तुम्ही तुमचा वेळ वाया घालवीत आहात!

स्वत: अनंत दोषांनी भरलेले भाजन आहे, तरी पण स्वत:चा एकही दोष दिसत नाही. 'स्वत:'च्या 'सेल्फ'कडे (आत्म्याकडे) वळल्यावर या 'चंदुभाई' बद्दल तुमचा पक्षपात राहत नाही, तेव्हा मग दोष दिसू लागतात. सध्या तर 'मी चंदुभाई' असेच तुम्ही मानता, आरोपी पण तुम्हीच, वकील पण तुम्हीच आणि जज पण तुम्हीच. मग सांगा आता एकही दोष दिसणार का? हे सगळे कधी संपणार? असे किती दिवस भटकत राहायचे? आता तर खूपच विचित्र काळ येणार आहे. 'ज्ञानी पुरुष' मिळाले आहेत म्हणून (मोक्षाची) भावना करून आपण आपले काम साध्य करून घेतले पाहिजे. जगात अशी एकही वस्तू नाही की जी आपण ज्ञानी पुरुषांना दिली तर त्यांना ती उपयोगी होईल. कारण

त्यांना कोणत्याच वस्तूची भीक (तीव्र इच्छा) नसते. त्यांना लक्ष्मीची भीक नसते, कीर्तीची भीक नसते, विषयाची भीक नसते, मानाची भीक नसते, पूर्ण निरिच्छ असे 'ज्ञानी पुरुष', त्यांच्या फक्त दर्शनानेच पापे धुतली जातात! त्यांच्याजवळ बसल्यावर अपार शांतीचा अनुभव येतो.

## कुठे वीतराग मार्ग आणि कुठे...?

जसे जसे अज्ञान वाढते, मोह वाढतो, तशीतशी मोहाची अनेक साधने मिळत जातात आणि मग मला हा बंगला मिळाला, पंखे मिळाले! म्हणजे मी किती पुण्यवान् आहे असे स्वत:ला समजू लागतो! यामुळे तर तो आणखी अडकत जातो. चिखलात डुबल्यावर आपण जसजसे बाहेर पडायचा प्रयत्न करतो तसतसे प्रत्यक्षात आणखी रुतत जातो, अशी दशा होते. कुठे वीतरागांचा मार्ग आणि कुठे ही दशा?

सम्यक् आचार पण आता कुठे राहिला नाही. लोकाचारच झाला आहे. सम्यक् आचार पाहून तर आपण खुश होतो.

**प्रश्नकर्ता :** सम्यक् आचार आणि लोकाचार यात काय फरक आहे?

**दादाश्री :** लोकाचार म्हणजेच लोकांचे पाहून आचरण करत राहणे आणि सम्यक् आचार म्हणजे विचारपूर्वक आचार, पूर्णपणे नाही पण जितक्या अंशी विचारपूर्वक करतो, तितक्या अंशी सम्यक् आचार उत्पन्न होतो, परंतु जो सम्यक् आचार असतो, तो तर सर्वांशच असतो. भगवंतांच्या शास्त्रांशी जुळतो असाच असतो.

एकही प्राणी असा नसेल की जो सुख शोधत नसेल! आणि तेही शाश्वत सुख शोधत असतो. त्याला असे वाटते की पैशात शाश्वत सुख असते. पण त्यातही आतमध्ये जळजळ होते. जळजळ आणि शाश्वत सुख मिळणे, या दोन्ही गोष्टी एकत्र असणे असे शक्यच नाही. ह्या दोन्ही गोष्टी विरोधी आहेत. यात लक्ष्मीचा दोष नाही. दोष त्याचा स्वत:चाच आहे. तो फक्त लक्ष्मीकडे लक्ष देतो आणि दुसरीकडे कुठे पाहतच नाही. त्यामुळे आपले संस्कार विकले गेले आहेत, गहाण पडले

आहेत. याला जीवन जगले असे कसे म्हणता येईल? आपण हिंदुस्तानची आर्यप्रजा आहोत. आर्यप्रजेला हे शोभत नाही. आर्यप्रजेमध्ये तीन गोष्टी असतात, आर्यआचार, आर्यविचार आणि आर्यउच्चार. पण आता त्या तीनही गोष्टी अनाडी झाल्या आहेत (बिघडल्या आहेत)! आणि मनात मात्र मानतो की मला समकित झालेले आहे आणि आता मोक्ष मिळेल. अरे, तू जे करत आहेस, त्या प्रकारे तर लाखो जन्मांतही काही पदरी पडणार नाही. मोक्षमार्ग असा नसतो.

## पुण्याचा मार्गदर्शक

**प्रश्नकर्ता :** जोपर्यंत मोक्षमार्गावर आपण पोहोचत नाही, तोपर्यंत पुण्य नावाच्या मार्गदर्शकाची गरज तर पडेल ना?

**दादाश्री :** हो, त्या पुण्याच्या मार्गदर्शकासाठीच तर लोक शुभ-अशुभात अडकले आहेत ना? त्यांना वाटते त्या मार्गदर्शकामुळे सर्व मिळेल. पण मोक्ष मार्गावर चालताना त्यामुळे पुण्य बांधले जाते. खरे तर अशा पुण्याची आपल्याला गरज नाही. मोक्षाला जाणाऱ्याचे पुण्य कसे असते? त्याला सूर्य उगवला आहे की नाही हेही माहीत नसते, आणि तरी सगळे आयुष्य व्यतीत होते, असे पुण्य असते! तर मग अशा कचऱ्यासारख्या पुण्याची गरज तरी काय?

**प्रश्नकर्ता :** हा मार्ग मिळत नाही, तोपर्यंत तरी त्या पुण्याची गरज आहे ना?

**दादाश्री :** हो, ते बरोबर आहे. पण लोकांच्याजवळ पुण्य तरी कुठे शाबूत आहे? कशाचाच पत्ता नाही, कारण त्यांची इच्छा काय आहे? तर म्हणतात, मी पुण्य केले तर पापाचा उदय येणार नाही. याउट भगवंत काय म्हणतात? तुम्ही शंभर रुपयाचे पुण्य बांधलेत तर तुमच्या खात्यात शंभर रुपये जमा झाले. त्यानंतर दोन रुपयांचे पाप केले म्हणजे एखाद्या व्यक्तीला 'हट, हट, बाजूला हो' असे म्हटले, यात थोडा तिरस्कार आला. तर आता ह्याची जमा-उधारी होत नाही. भगवंत काही कच्ची माया नाहीत. जर पुण्य-पापाची जमा-उधारी होत असती तर मग

या वाणी लोकांकडे अजिबात दुःख नसते. पण इथे तर तुम्ही सुख पण भोगा आणि दुःख पण भोगा. भगवंत कसे पक्के आहेत! ते काहीच वजा करत नाहीत!

## जिथे कषाय, तिथे संसार

स्वरूपज्ञान झाल्यावर काहीच करायचे नसते. म्हणूनच आम्ही सांगतो की काही करू नका. करणारी दुसरीच शक्ती आहे, आणि लोक उगीचच आपल्या डोक्यावर घेऊन फिरतात, त्यामुळे तर उलट जन्म वाढतात.

जिथे कषाय आहेत, तिथे निव्वळ परिग्रहाची गाठोडीच आहेत. मग तो गृहस्थ असो, त्यागी असो की हिमालयात बसलेला असो! जिथे कषायांचा अभाव आहे, तिथे परिग्रहाचा अभाव आहे. मग भले तो राजवाड्यात राहत असो! माझ्याजवळ कुठे परिग्रह आहे? लोकांना वाटते की दादा परिग्रही आहेत. परिग्रह म्हणजे डोक्यावर ओझे! आम्हाला कधीच ओझे वाटत नाही. शरीराचे पण ओझे वाटत नाही. तरी पण हे दादा खातात, पितात, लग्नाला जातात, स्मशानात जातात!

वीतराग एवढेच पाहतात की कषायांचा अभाव झाला आहे की नाही? मग ते त्यागीची गादी पाहत नाहीत की गृहस्थाची गादी पाहत नाहीत! कषाय संपले आहेत की नाही? बस एवढेच पाहतात. किंवा कषाय मंद झाले आहेत की नाही? हे पाहतात. साधूंमध्ये काही थोडे, दोन-पाच टक्के भद्र स्वभावाचे मंदकषायी असतात.

**प्रश्नकर्ता :** ते समजदारीत मंद असतात का?

**दादाश्री :** समजदारीत नाही, ते स्वभाविकपणेच भद्र स्वभावी असतात. तरी पण भगवंत त्यांना कषायरहित म्हणत नाहीत. 'मी आहे', 'मी आहे' बोलतात ते कषाय आहेत.

कृपाळूदेवांची पुस्तके वाचून मंदकषायी होता येते. पण ते लोकांच्या लक्षात आले नाही. मंदकषायी कोणाला म्हणतात? कषाय उत्पन्न होतात

ते त्यांना स्वतःला समजतात पण दुसऱ्या कोणाला कळू देत नाहीत. कषायांना वळवता येते अशी दशा. कषाय हे संसाराचे स्वरूप आहे आणि अकषाय मोक्ष स्वरूप आहे. मुळात कषाय आहेत. जर कषाय गेले तर काम साध्य झाले, नाही तर ते साधू पण नाहीत आणि संन्यासी पण नाहीत. त्यापेक्षा तर मंदकषाय असलेले गृहस्थ चांगले.

## वृद्धांची व्यथा

हे भाऊसाहेब स्वभावाने मंदकषायी आहेत. पण 'ज्ञाना'शिवाय चित्त कशात गुंतलेले असते? तर दिवसभर व्यवसायात, मुलांमध्ये, कोणी आले असेल त्यांच्यात किंवा खाण्या-पिण्यात असते. अशाच सर्व गोष्टीत चित्त विखुरले जाते. यामुळे पुण्य मिळते पण आता किती दिवस कणसे कापत राहणार? बाजरी पेरा, कापा आणि खा, पेरा, कापा आणि खा. असे काम किती दिवस करत राहणार?

आणि विचारल्याशिवाय सल्ला पण देतात! मुलगा वडिलांना विचारत नाही तरी पण 'थांब जरा, थांब जरा, तू चूक करशील' असे म्हणून सल्ला देत राहतात. भगवंत म्हणतात मुले जर खूप अडचणीत असतील तरच त्यांना उत्तर द्यावे. हो, जर तो विचारत असेल तर आपण व्यवहारिकपणे उत्तर द्यायलाच हवे. विचारल्याशिवाय स्वतःच्या उपयोगात असलेला अशी हुशारी करील का? तुम्ही पैसे मोजत असाल आणि मुलगा जर धंद्याबद्दल विचारू लागला तर तुम्हाला वाटते 'हा जरा गप्प बसला तर चांगले.' तसेच सतत आत्म्याबद्दलही वाटायला हवे. तरी पण व्यवहार आहे, म्हणून त्यात पडल्यावाचून चालत नाही, पण जाणूनबुजून त्यात हात घालू नये.

**प्रश्नकर्ता :** मुलाला अनुभव कमी असतो आणि काही चूक करत आहे असे दिसले, तर त्याला सांगावेसे वाटेलच ना?

**दादाश्री :** आज जर तुमचे वडील असते ना, तर ते पण असेच म्हणाले असते की हा अजून कच्चा आहे! आणि त्यांचेही वडील असते तरी हेच म्हणाले असते! ही हिंदुस्तानची पद्धतच आहे. यालाच भगवंतांनी

'ओव्हरवाइज' (अतिशहाणे) होणे असे म्हटले आहे. साठ वर्षांचे वडील होते ते पण म्हणायचे की हा अजून लहान आहे. अरे, कसला लहान? तो तर आता आजोबा आहे ना!

हे जे तुमचे ज्ञान आहे ना, ते आपल्या गुजराती लोकांमध्ये मृत्यू जवळ आला तरी त्यांना असे वाटते की आपण गेल्यावर मुले काय करतील? ही एक प्रकारची वाईट सवय आहे. करणारी 'व्यवस्थित शक्ती' आहे. तुम्हाला तो दिसतो तोपर्यंत तुम्ही त्याला पकडून ठेवाल ना! आणि तो तुमच्या दृष्टीआड झाला मग? म्हणून मुलांनी आपल्याला विचारले तरच उत्तर द्यावे. मुलांना अनुभव आहे की नाही ते आपण पाहू नये. मुले जर व्यापार करत असतील तर तुम्हाला वाटेल की आज गिऱ्हाईक जरा जास्त आहेत, कोणी त्यांना फसवेल, म्हणून चला, आज मीच दुकानात जाऊन बसतो! अशा भानगडीत आपण कशाला पडायचे? आपण मुलांना वाढविले, शिकवले, त्यांचे लग्न लावून दिले, मग आता आपला काय संबंध? आता आपण आपल्या आत्म्याचे करायचे. आता 'सब सबकी संभालो' (आपले-आपले सांभाळावे) असा नियम आहे. हे गिऱ्हाईक आणि व्यापारी असे संबंध आहेत. पूर्वी अज्ञान असल्यामुळे आपण त्यात खोल गुंतलो होतो. आता आपल्याला 'ज्ञाना'ने समजता आले पाहिजे.

## अक्रम मार्गाने अकषाय-अवस्था

ज्याने कषायभाव जिंकले, तो अरिहंत झाला! जिथे 'मी शुद्धात्मा आहे' असे आहे तिथे कषायभाव राहत नाहीत. जिथे शुद्ध उपयोग आहे तिथे कषायभाव राहत नाहीत. जिथे शुद्धात्मा तिथे कषाय नाहीत आणि जिथे कषाय तिथे शुद्धात्मा नाही. 'अक्रम ज्ञाना'त कषाय होतच नाहीत. क्रमिक मार्गात *अशाता* वेदनीय (दु:ख परिणाम) असेल तर कर्मबंधन झाल्याशिवाय राहत नाही. याउलट 'अक्रम' मार्गात त्यामुळे कर्मबंधन होत नाही पण तेवढा वेळ वेदना भोगाव्याच लागतात.

**प्रश्नकर्ता :** ही 'अक्रम' ज्ञानाची महत्ता आहे ना?

**दादाश्री :** हो खूप मोठी महत्ता आहे! विलक्षण विकास आहे हा! नाहीतर एक अंश पण कषाय कमी होत नाहीत.

## सत्संगाची आवश्यकता

जीव अव्यवहार राशीतून व्यवहार राशीत आला की मग मोक्षाला जाईपर्यंत सगळे 'व्यवस्थित' आहे. उठाठेव केली नाही तर 'व्यवस्थित' मोक्षालाच नेईल. पण लोक उठाठेव करतातच ना?

**प्रश्नकर्ता :** तर मग तुमच्या दृष्टीने हा सत्संग सुद्धा केवळ उठाठेवच आहे ना?

**दादाश्री :** हो, उठाठेवच म्हणावी लागेल. ती करण्याची गरजच नाही. हे तर गृहीत मिथ्यात्वमुळे उलट केले होते म्हणून आता सरळ करावे लागत आहे. चहातील साखर हळूहळू विरघळतच राहते ना? याच प्रकारे हा आत्मा हळूहळू मोक्षाकडेच चालला आहे.

सत्संग देखील शेवटी तुम्हाला काय सांगत असतो? तर काहीही करू नका. फक्त जो परिणाम आहे तो पाहत राहा.

## नियतीवाद

**प्रश्नकर्ता :** सगळे काही जर 'व्यवस्थित'च असेल तर करण्याची काही गरजच नाही. जरा विरोधाभास वाटतो.

**दादाश्री :** हे सगळे 'व्यवस्थित'च आहे.

**प्रश्नकर्ता :** म्हणजे हा नियतीवाद झाला की सर्व काही निश्चितच आहे?

**दादाश्री :** नाही, नियतीवाद असता तर मग तो आग्रह झाला. आम्ही जिंकलो असे मग तो म्हणेल. मग नियतीच परमेश्वर आहे असे मानले जाईल. पण नियती हेच एकमेव कारण नाही. समुच्चय कारणांमुळे झाले आहे. म्हणून आम्ही म्हणतो की 'ऑनली सायंटिफीक सरकमस्टेन्शियल एविडेन्सेस्' (फक्त वैज्ञानिक संयोगिक पुरावे) आहेत.

नियतीवाद असता तर मग आरामच असता! नियतीवाद म्हणजे इथून समुद्रात टाकले की किनाऱ्यावर पोहोचेलच.

**प्रश्नकर्ता :** नियतीवाद म्हणजे प्रारब्धवाद असे म्हटले गेले आहे?

**दादाश्री :** प्रारब्ध आणि नशीब म्हणजे नियती नाही. नियती ही वेगळी गोष्ट आहे. नियती म्हणजे या संसारातील जीवांचा जो प्रवाह चालू आहे तो नियतीच्या काही नियमांनुसारच चालू आहे. परंतु त्यात इतरही बरीच काही कारणे येतात, उदा. काळ, क्षेत्र वगैरे.

## शुद्ध चिद्रूप

**प्रश्नकर्ता :** चित्ताची शुद्धी कशा प्रकारे होते?

**दादाश्री :** ही तुम्ही आता चित्ताची शुद्धीच करत आहात ना? लोक चित्ताचा अर्थ आपापल्या परीने समजतात, चित्त म्हणजे एखादी वेगळी गोष्ट आहे असे समजतात. ज्ञान-दर्शन एकत्र झाल्यावर जे भाव उत्पन्न होतात ते म्हणजे चित्त. चित्ताची शुद्धी करणे म्हणजे ज्ञान-दर्शन यांची शुद्धी करणे. शुद्धात्म्याला काय म्हणतात? शुद्ध 'चिद्रूप'. ज्याचे ज्ञान-दर्शन शुद्ध झाले आहेत, जे स्वत:चे स्वरूप आहे, तेच शुद्ध चिद्रूप आहे.

**प्रश्नकर्ता :** ज्याला आपण सच्चिदानंद म्हणतो ते?

**दादाश्री :** सच्चिदानंद ही तर अनुभवदशा आहे आणि शुद्धात्मा ही प्रतीती आणि लक्ष दशा आहे. तीच ती गोष्ट, शुद्ध चिद्रूप आणि शुद्धात्मा हे सर्व एकच आहेत. आम्ही स्वरूपाचे ज्ञान देतो तेव्हा तुमचे चित्त संपूर्ण शुद्ध होते. आता फक्त ही बुद्धीच त्रास देत असते, तिथेच सांभाळायचे आहे. बुद्धीला सन्मानपूर्वक परत पाठवायची आहे. जिथे स्वत:चे स्वरूप आहे तिथे अहंकार नाही. काल्पनिक ठिकाणी 'मी आहे' म्हणणे तो अहंकार आणि मूळ ठिकाणी 'मी' म्हणणे याला अहंकार म्हणत नाहीत. ती निर्विकल्प जागा आहे.

मनुष्यात 'मी-तू' असा भेद निर्माण झाला म्हणून तो कर्मबंधनात

पडतो. एखादे जनावर 'मी चंदुलाल आहे' असे म्हणते का? त्यांना अशी भानगडच नसते ना? म्हणजेच हा आरोपित भाव आहे. त्यामुळे कर्मे बांधली जातात.

## निर्-अहंकारामुळे निराकूळता

जिथे अहंकार शून्यतेवर असतो तिथे निराकूळता प्राप्त होते जोपर्यंत अहंकार शून्यावर येत नाही तोपर्यंत निराकूळता एक क्षणभरही प्राप्त होत नाही. चैन मिळते. चैन आणि निराकूळता यात खूप फरक आहे.

**प्रश्नकर्ता :** काय फरक आहे ते जरा समजावून सांगा.

**दादाश्री :** अहंकार गेल्यानंतर निराकूळता उत्पन्न होते आणि कुठलेही संयोग नसतील तर चैन मिळते. लोक चैन शोधत असतात. निराकूळता हा तर सिद्धांचा 1/8 (एक अष्टमांश) गुण आहे.

**प्रश्नकर्ता :** मन-बुद्धी-चित्त आणि अहंकार या सगळ्यात अधिक शक्ती तर चित्ताचीच आहे ना?

**दादाश्री :** त्याचे असे आहे की, चित्त हे मिश्रचेतन आहे आणि बाकीचे सर्व तर स्वभावाने पुद्‌गल आहेत. चित्त म्हणजे ज्ञान-दर्शन. ते जर शुद्ध झाले तर तो शुद्धात्मा होईल. आणि जोपर्यंत त्याला सांसारिक गोष्टी आवडत असतील, संसारातच चित्त भटकत असेल तर तो शुद्धात्मा नाही. या 'ज्ञाना'च्या प्रभावामुळे चित्त शुद्ध होते म्हणून मग 'स्टेडीनेस' येतो (स्थैर्य येते).

## आधार-आधारी संबंध

स्वतःच बनवलेला महाल असेल तर तो आपण तोडूही शकतो. पण हा महाल तर प्रकृतीने बनवला आहे. म्हणून पद्धतशीरपणे समजून समजून सर्व करायला हवे.

'ज्ञानी पुरुष' जाणतात की हा महाल कशा प्रकारे बनला आहे

आणि याचे बुरूज कुठे ठेवलेले आहेत. काय केले की पहिला मजला पडेल, मग दुसरा पडेल, हे सर्व 'ज्ञानी' जाणतात.

(पूर्वी) स्वत: आधार देत होतात म्हणून जग उत्पन्न झाले होते. 'मी चंदुभाई आहे' असे जोपर्यंत तुम्ही म्हणत होतात तोपर्यंत आधार देत होतात, आता तुम्ही 'मी शुद्धात्मा आहे' असे म्हणता त्यामुळे आधार देणे बंद झाले आणि निराधार झाले. त्यामुळे सगळ्या वस्तू पडू लागतात. या हाताच्या आधारावर वस्तू टिकून आहे, हात काढला तर वस्तू पडून जाईल. नाहीतर सोडू म्हटले तरी सुटणार नाही.

**प्रश्नकर्ता :** आधाराला चिकटून ज्या वृत्ती आहेत, त्या कशा सुटतील?

**दादाश्री :** 'मी शुद्धात्मा आहे' हे लक्ष तुम्हाला राहते का?

**प्रश्नकर्ता :** हो.

**दादाश्री :** तर मग आधार राहिलाच नाही. वृत्ती राहणारच नाहीत. ह्या ज्या वृत्ती आहेत त्या निराधारीच्या आहेत. आधारीच्या नाहीत. जेव्हापासून आधारीचा आधारभाव सुटतो आणि नंतर जो निराधारी होतो त्याच्या या सर्व वृत्ती आहेत. आपल्या हे ध्यानात असायला हवे की या वृत्ती आपल्या नाहीत. आपल्यात वृत्ती असे काही नसतेच. स्वाभाविक झाल्यानंतर आपली तर निजवृत्ती, निजभावातच असते!

## अकर्तेपदामुळे मनापासून मुक्ती

स्वत: शुद्धात्मा झाला त्यामुळे अकर्ता झाला. मग मनाच्या गाठीचे छेदन होतच राहते, आणि गाठ फुटते तेव्हा जर कर्ता झाला तर मन उत्पन्न होते. तुम्ही अकर्तापदात असाल तरी पण मनाच्या गाठी तर फुटतच राहतील. मन उडया मारत असेल तरी पण निर्जरा होत राहते, मात्र त्या वेळी 'तुम्ही' उपयोगात राहिले पाहिजे की काय होत आहे आणि काय होत नाही? वाईट विचार आले तरी हरकत नाही आणि चांगले विचार आले तरी हरकत नाही. कारण ज्याला दुकान रिकामेच

करायचे आहे, त्याला मग तो माल सडलेला असेल तरी काढून टाकायचा आहे आणि चांगला असेल तरीही काढूनच टाकायचा आहे.

*'कर्तापद छे आग्रही, अकर्तापद छे निराग्रही'* – नवनीत
(कर्तापद आग्रही असते, अकर्तापद निराग्रही असते)

शुभ आणि अशुभ याचा आता आग्रह नाही. दान देण्याचा पण आग्रह नाही. उदयकर्मात आले तर दान दिले जाईल तेव्हा त्याची निर्जरा होईल.

'अविचारपद म्हणजे शाश्वत ज्ञान.'

स्वत: जोपर्यंत विचारांत तन्मयाकार असतो तोपर्यंत विचारपद म्हटले जाते आणि स्वत: विचारांपासून अलग झाला तर मग ते अविचारपद म्हटले जाते.

## अंतिम दर्शन

**प्रश्नकर्ता :** महाविदेह क्षेत्रात कसे जाता येते? पुण्यामुळे?

**दादाश्री :** या आमच्या आज्ञांचे पालन तुम्ही करत आहात, त्यामुळे पुण्य बांधलेच जात आहे. ते पुण्य महाविदेह क्षेत्रात घेऊन जाते. आज्ञा पाळल्याने धर्मध्यान होते. ते सर्व फळ देईल.

**प्रश्नकर्ता :** जे शुभ ध्यान होत असते त्यालाही धर्मध्यान म्हणतात ना?

**दादाश्री :** हो, पण शुभ ध्यान किंवा अशुभ ध्यान, हे दोन्हीही जर कर्ता असेल तरच होते. आणि या ज्ञानानंतर तुम्हाला विचार आले, तुम्ही कोणाला दान देता, ती सर्व निर्जरा आहे.

**प्रश्नकर्ता :** मग इथे सत्संगात आम्ही भक्तीपदे गातो, ते काय आहे?

**दादाश्री :** ते सर्व आमच्या आज्ञेतच आले. ज्ञानींच्या आज्ञारूपी धर्मध्यानाचे फळ म्हणजे सर्वात उच्च मनुष्यगती मिळते. त्यामुळे पुढचा जन्म खूप सुंदर मिळेल, तीर्थंकरांची भेट होईल, मग आणखी काय

पाहिजे? आपल्या सर्वांना आत्मा तर प्राप्त झालेलाच आहे. फक्त तीर्थंकरांचे अंतिम दर्शन बाकी आहे, ते एकदा झाले तरी खूप झाले. केवळज्ञान थांबले आहे ते पूर्ण होईल. 'ज्ञानी पुरुष' स्वत: जिथपर्यंत पोहोचले असतील तिथपर्यंत ते तुम्हाला नेतात. त्याच्यापुढे ते नेऊ शकत नाहीत. जे पुढे गेलेले आहेत त्यांच्याजवळ ते नेतात, यात कोणाचे काही चालतच नाही ना?

## ॲसिडने भाजणे की मुक्तीचा स्वाद?

आपल्या इथे एक गृहस्थ येतात, त्यांचा भाचा ॲसिडने भाजला होता. निखाऱ्यांत पडलेले चांगले पण ॲसिडने भाजणे हे फार भयंकर असते. सर्व डॉक्टर घाबरले होते, त्यांना वाटले की हा मुलगा आता तीन तासांपेक्षा जास्त जगणार नाही. त्या मुलाला आम्ही 'ज्ञान' दिले होते. डॉक्टरांना त्याने हसतहसत सांगितले 'तुम्हाला मला जिथून कापायचे आहे तिथून कापा. मी वेगळा आहे आणि राजू वेगळा आहे.' हे ऐकून सगळे डॉक्टर थक्क झाले! तो मुलगा वाचला. त्याला जर हे 'ज्ञान' मिळालेले नसते तर तो मेलाच असता. माणूस निम्मा तर 'सायकोलोजिकल इफेक्ट'ने (मानसिक परिणामाने) मरतो. मला काय झाले? कसे झाले? हे तर आता बरेच होणार नाही. पण इथे तर राजूने सांगितले की 'मी वेगळा आणि राजू वेगळा.' मी जेव्हा त्याला हॉस्पिटलमध्ये भेटायला गेलो तेव्हा तो खूप आनंदात होता. मला म्हणाला 'राजू माझ्यासोबत झोपला आहे!'

सर्व डॉक्टर आश्चर्यचकित झाले! अशी केस त्यांनी कधीच पाहिली नव्हती. हे सर्व काय आहे? (असे त्यांना वाटले) तर 'या मागे दादा आहेत.' 'हा ज्ञाना'चा प्रताप आहे. आणि त्यातून तो क्षत्रिय होता. दादा म्हणाले की 'राजूपासून तू वेगळाच आहेस.' म्हणून तो स्वत:ला वेगळाच मानतो, आणि तुमच्या वणिक कुळवाल्यांवर त्याचा परिणाम झाल्याशिवाय राहणार का?

**प्रश्नकर्ता :** हो दादा. परिणाम झालाच असता. भाजणे हे कोणत्या कारणाचा परिणाम आहे?

**दादाश्री :** आम्हा क्षत्रियांची कामेच अशी असतात. कोणाला तरी अशाता वेदनीय दिली असेल तर तेवढी अशाता वेदनीय आपल्याला भोगावी लागते. मग तो कोणीही देहधारी असो, माणूस असो की जनावर असो! हे काही पैसे कमावताना केलेले नाही. हे तर अशाता वेदनीयचे फळ आहे. कोणालाही किंचितदेखील दु:ख होईल असे त्रास देतो तेव्हा असा फळ मिळते. क्षत्रिय लोक अशाता देऊ पण शकतात आणि अशाता भोगू पण शकतात. आणि तुम्ही अशाता देत पण नाहीत, आणि भोगत पण नाहीत.

**प्रश्नकर्ता :** हे सर्व पूर्वजन्माचे असेल ना?

**दादाश्री :** हे पूर्वजन्माच्या 'कॉजेस' (कारणां)चे 'इफेक्ट्स' (परिणाम) आहेत.

आईच्या पोटातून बाळ बाहेर येते, तेव्हा तर त्याचे डोके खाली असते. स्वत:हून तर त्याला फिरताही येत नाही. पण तरी ते बाहेर येते, तर त्याला आई ढकलते की डॉक्टर ओढतात की त्याचे ते स्वत:हूनच येते? हे सर्व कोण करते? हे सर्व 'इफेक्ट्स' आहेत, परिणाम आहेत. पूर्वी जी कॉजेस केली होती त्याचे हे परिणाम स्वाभाविकपणे घडून येतात.

## मित्र शत्रू की शत्रू मित्र?

*'नीपजे नरथी तो कोई न रहे दु:खी,*
*शत्रु मारीने सौ मित्र राखे.'*

जर शक्य असते तर माणसाने या सर्व शत्रूंना मारून फक्त मित्रांनाच ठेवले असते. पण तरीही शत्रूशिवायची भूमिका असू शकत नाही. त्या मित्रातूनच मग नवीन शत्रू उभे राहतील. या ऐवजी जर त्या शत्रूंना राहू दिले असते ना, तर हे मित्र जेव्हा शत्रू झाले असते तेव्हा ते शत्रू मित्र झाले असते! मग ते कामी आले असते. हे जग कोणाला मारण्यासारखे नाही. इथे काहीही शाश्वत नसते. हा माझा कायमचा शत्रू आहे असे तुम्ही ठरवूच नका.

**प्रश्नकर्ता :** 'नमो अरिहंताणम्' मध्ये आम्ही जे बोलतो आणि तुम्ही जे शत्रू आणि मित्रबद्दल बोललात, यात काय फरक आहे?

**दादाश्री :** अरिहंतांची गोष्ट आंतरशत्रूंसाठी आहे. आंतरशत्रू म्हणजे क्रोध-मान-माया-लोभ यांचे ज्यांनी हनन केले आहे अशा अरिहंत भगवंतांना मी नमस्कार करतो.

स्वाभाविक होण्यात नैमित्तिक कारणे असतात. आंतरशत्रूंना ओळखा की हे आपल्या विरोधी आहेत, आपले शत्रू आहेत. मारायचे तर कोणालाच नाही. शत्रूप्रती द्वेष ठेवायचा नसतो. तर आता या शत्रूंना मी बोलावले आहे की शत्रूंनी बोलावल्यामुळे मी आलो आहे, याचा शोध घ्या. आणि मग ते शत्रू कसे जातील, त्यांच्यापासून कसे मुक्त होता येईल याचा शोध घ्या.

## साधना, साध्यभावाने-साधनभावाने

**प्रश्नकर्ता :** शत्रुंचे हनन करण्यासाठी साधना करायची जी सवय पडली आहे, त्यामुळे शत्रुंचे हनन होते का?

**दादाश्री :** त्याचे असे आहे की, साधना दोन प्रकारची आहे :

(1) साधना, साध्यभावासाठीच करायची, ती.

(2) साधना, साधनेसाठी करायची, ती.

साध्यभावाने करायची साधना ती अंतिम साधना आणि ती काही मर्यादेपर्यंत माणूस स्वत:हून करू शकतो. पण ती साधने अमर्याद नाहीत. अमर्यादसाठी तर 'ज्ञानी पुरुषां'च्या निमित्ताची गरज असते. त्यांची भेट झाली तर आपण त्यांना म्हणायचे की 'तुम्हाला जे पद प्राप्त झाले आहे ते पद आम्हालाही प्राप्त होईल अशी कृपा करावी.' फक्त कृपेचीच मागणी करायची आहे. आणि त्यातही ज्ञानी पुरुष कर्ता नसतात. ते फक्त निमित्त असतात. आणि निमित्त असेल तरच कार्य होईल, नाहीतर होणार नाही.

**प्रश्नकर्ता :** साधनामार्गात जे गुरु असतात ते लोक स्वत:ला निमित्त मानत नाहीत.

**दादाश्री :** खरी गोष्ट आहे. त्यात ते स्वत:साठी मानतात की मला हे एवढे केलेच पाहिजे, आणि माझ्या शिष्यांनीही एवढे केलेच पाहिजे. म्हणजेच स्वत:लाही बंधन होते आणि शिष्यांनाही बंधन होते. पण मग असेच बंधन होत होत पुढे जातात, प्रगती करतात. आणि हे तर 'ज्ञानी पुरुष', स्वत:ही बंधनात अडकत नाहीत आणि (दुसऱ्यांना) मुक्त करतात. कर्ताभावाने बंधन होते, निमित्तभाव मुक्त करवितो.

## पूरण-गलन आणि परमात्मा

**प्रश्नकर्ता :** शुद्धात्मा फक्त ज्ञाता-द्रष्टा आहे, तर मग कृपा-अवकृपा असा गोंधळ कोण घालतो? कोणत्या माध्यमाद्वारे करवितो?

**दादाश्री :** कोणीच गोंधळ घालत नाही, हे सर्व पुद्‌गलाचेच आहे.

**प्रश्नकर्ता :** सगळी प्रेरणा पुद्‌गलाचीच आहे?

**दादाश्री :** सगळे पुद्‌गलच आहे. पुद्‌गलात अहंकार पण आला. क्रोध-मान-माया-लोभ सगळेच त्यात आले. सारे पुद्‌गल पूरण-गलन होत राहते.

अहंकार देखील पूरण-गलन होत असतो. लग्न-समारंभात गेला आणि कोणी नमस्कार केला तर अहंकाराचे पूरण होते; आणि जर नमस्कार केला नाही तर गलन होते! क्रोध एकदम उसळतो तेव्हा तो 500 डिग्रीचा असतो, मग 400 डिग्री होतो, 300 होतो, 200 डिग्री होतो, 100 डिग्री होतो आणि मग शून्य होतो.

याच प्रकारे लोभ पण पूरण-गलन होत असतो. सर्व काही पूरण-गलन होत असते.

**प्रश्नकर्ता :** आत्मा आणि पुद्‌गल यात काय फरक आहे?

**दादाश्री :** आत्मा एकच वस्तू आहे. एकच वस्तू म्हणजे ती कमी-जास्त होत नाही, एकच स्वाभाविक वस्तू आहे. याउलट पुद्‌गल स्वाभाविक वस्तू नाही.

पुद्गल कशाला म्हणतात? यात (पोटात) जेवण घालतो, त्याला पूरण म्हणतात आणि संडासला जातो त्याला गलन म्हणतात. श्वास घेतला ते पूरण आणि उच्छ्वास ते गलन आहे. हा पुद्गल शब्द पुर्गल (पूरण-गलन) यापासून बनला आहे.

या शरीरात पुद्गल आणि आत्मा अशा दोनच वस्तू आहेत. जर पुद्गल आणि आत्म्याला वेगळे करता आले तर त्याला आत्मा सापडेल. पण माणसाकडे एवढी शक्ती नाही, ही माणसाच्या मतीपलीकडची गोष्ट आहे. बुद्धीपलीकडची गोष्ट आहे! 'ज्ञानी पुरुषा'त भगवंत स्वतः बसलेले असतात, मग त्यांच्या कृपेने काय होऊ शकत नाही?

## ज्ञानींची कृपा

**प्रश्नकर्ता :** आम्ही सर्व इथे बसलो आहोत तर दादा भगवांनांची कृपा सर्वांवर सारखीच होईल का?

**दादाश्री :** नाही, एक सारखी नाही. तुमचा 'दादा भगवान' यांच्यावर कसा भाव आहे, त्यावर ती कृपा आधारित आहे.

**प्रश्नकर्ता :** समजा माझे भांडे मोठे आहे, तर त्यात अधिक पाणी राहील आणि कोणाचे भांडे तांब्याएवढे लहान असेल तर त्यात कमी पाणी राहील. तर मग भांड्यावर आधारित आहे की भावावर?

**दादाश्री :** त्यात भांड्यांची गरजच नाही. एखाद्याला काहीच येत नसेल तर मी त्याला सांगतो की 'काही येत नसेल तरी तू इथे बसून रहा, आणि ते बूट साफ करत रहा.'

ज्ञानींचे कृपापात्र बनायचे आहे. दुसरे काही करायचे नाही. कृपापात्र बनण्यात कोण अडथळा आणतो? तर आपला आडमुठेपणा.

**प्रश्नकर्ता :** हा आडमुठेपणा काढायला नको का?

**दादाश्री :** नाही, आडमुठेपणा त्वरीत लाभ मिळू देत नाही. आडमुठेपणा पाहिल्यावर आम्ही त्याच्यावर करुणाभाव ठेवतो. असे

करुणाभाव ठेवत ठेवत, हळूहळू आडमुठेपणा दूर होत जातो. तिथे जरा जास्त प्रयत्न करावे लागतात.

## शास्त्रांचे वाचन

**प्रश्नकर्ता :** सद्शास्त्रांच्या वाचनाने पापांचा क्षय होत नाही का?

**दादाश्री :** नाही, त्यामुळे पुण्य मात्र जरूर मिळते. पण पापांचा क्षय होत नाही. दुसरे नवीन पुण्य लाभते, त्याला पुण्यानुबंधी पुण्य असे म्हणतात. सद्शास्त्रांचे अध्ययन केले की त्यातून स्वाध्याय होतो. त्यामुळे चित्ताची एकाग्रता, मनाची एकाग्रता खूप सुंदर होते.

**प्रश्नकर्ता :** 'ज्ञानी पुरुषांच्या' सत्संगाबरोबरच सद्शास्त्रांचे वाचन आणि मनन करायला हवे ना?

**दादाश्री :** ते बरोबर आहे, परंतु जर ज्ञानी पुरुषांच्या सत्संगाने फुल मार्क्स मिळत असतील तर मग वाचनाची गरजच उरली नाही ना? फुल मार्कस् मिळाल्यानंतर देखील ही शास्त्रे वाचत राहिलात तर उलट बॉदरेशन (ओझे) वाढेल. आता एवढी सुंदर जागृती झाल्यावर वेळ उगीचच वाया जाईल.

**प्रश्नकर्ता :** निमित्त म्हणून वाचले तर?

**दादाश्री :** निमित्त म्हणून ठीक आहे, पण ते संयोगांच्या आधीन आहे. म्हणजेच आपल्या हातात नाही.

**प्रश्नकर्ता :** संयोगावर ताबा नाही असे म्हणणे म्हणजे आपल्या मनाचा कमकुवतपणा नाही का?

**दादाश्री :** नाही, या जगात संयोगावर ताबा असेल अशी कोणतीच व्यक्ती नाही.

## द्रव्य जरी बदलले नाही, भाव बदलले तरी...

*'द्रव्य न पलटे, भाव फरे तो छूटी शके छे भवनो फजेतो.'* – नवनीत

द्रव्य म्हणजे फळ देण्यास तयार झाले असेल असे कर्म. द्रव्य बदलत नाही याचे उदाहरण मी सांगतो. एका माणसाला चोरीची सवय लागली आहे, तो स्वत:च म्हणतो की मला ही सवय सोडायची आहे, पण तरीही ती सुटत नाही असे होते की नाही? ती वेळ येईल तेव्हाच ती सुटेल. आता कवी काय सांगू इच्छितात की तू रोज मनात भाव कर की चोरी करणे योग्य नाही. तर मग चोरीची बीजे एक दिवस संपतील. आणि जर तू परत चोरी करण्याचे भाव करशील तर मग परत चोरी करण्याची बीजे पडतील. म्हणजेच चोरीतून पुन्हा चोरीच होईल.

हे वाक्य खूप खोल, गूढ अर्थ असणारे आहे.

आता ज्याने स्वरूपाचे ज्ञान घेतले आहे त्याने काय करायला हवे? तर 'पाहत'च राहायचे. 'पाहत' राहिले की नवीन बी पडत नाही. शिवाय जर कोणाला दु:ख होईल अशी चोरी केली असेल तर आम्ही त्याला आणखी काय म्हणतो की 'चंदुभाई, हे अतिक्रमण केलेस, म्हणून आता प्रतिक्रमण कर.'

जगातील लोक चोरी करतात तेव्हा पुन्हा चोरीचे बी पडते. लाच घेत असेल पण मनात खटकते की हे असे होताच कामा नये. परंतु जर त्याला कोणी म्हटले की, 'ही लाच का घेतोस?' तेव्हा तो म्हणतो, 'तुला अक्कल नाही. चूप बस! या दोन मुलींचे लग्न कसे करू मी मग?' म्हणजेच त्याने या चुकीच्या गोष्टीला प्रोत्साहन दिले. त्यामुळे त्याचा पुढचा जन्म पक्का झाला.

म्हणजेच या जगात लोक जर चोरी करत असतील, लबाडी करत असतील, लाच घेत असतील तर त्यांनी मनात मात्र असे भाव ठेवले पाहिजेत की हे चुकीचे काम होत आहे. हे असे करताच कामा नये, असे सतत म्हणत राहिले पाहिजे. द्रव्य आता हातात राहिले नाही. पाण्याचे बर्फ झाले आहे. आता त्याचे ओघड कसे वाहणार? त्याचा तर ढीगच होईल.

**प्रश्नकर्ता :** चुकीचे करत असू तेव्हा माझ्याकडून असे होता कामा नये असे भाव असले पाहिजेत की मग ज्ञाता-द्रष्टाच राहायचे?

**दादाश्री :** ज्ञाता-द्रष्टा राहायचे, आणि प्रतिक्रमण करायलाही सांगितले आहे ना?

**प्रश्नकर्ता :** पण भाव तर असताच कामा नयेत ना?

**दादाश्री :** भाव तर होतील पण 'तुम्ही' तर चंदुभाईला जागृत करायचे की 'प्रतिक्रमण करा.' अतिक्रमण का केले? दिवसभर क्रमण चालू असते. अतिक्रमण दिवसभर होत नसते.तासाभरात एक, दोन वेळा होते, त्यासाठी तुम्हाला प्रतिक्रमण करावे लागेल.

तुम्हाला तुमच्या सर्व निर्बलता जाणून घेतल्या पाहिजेत. आता तुम्ही 'स्वत:' निर्बल नाहीत. तुम्ही तर आत्मा झाले आहात. परंतु अज्ञानदशेत यांचे मूळ निर्माते तर तुम्हीच होता ना? म्हणून तुम्हाला शेजाऱ्याप्रमाणे सांगितले पाहिजे की 'चंदुभाई प्रतिक्रमण करा.'

प्रतिक्रमणे तर तुम्ही खूपच करा. तुमच्या सर्कलमध्ये पन्नास-शंभर, जेवढी ही माणसे असतील, ज्यांना ज्यांना तुम्ही त्रास दिला असेल, त्या सगळ्यांचे सवडीच्या वेळी एक-एक तास बसून, आठवून-आठवून, शोधून शोधून प्रतिक्रमण करा. जितक्या लोकांना त्रास दिला आहे, ते सर्व धुवावे तर लागेलच ना? त्यानंतर ज्ञान प्रकट होईल.

**प्रश्नकर्ता :** पण दादा, ज्यांनी मला त्रास दिला, त्यांनाच मी त्रास दिला आहे.

**दादाश्री :** तुम्हाला ज्यांनी त्रास दिला आहे, त्याचे तर ते भोगून घेतील. त्याची जबाबदारी तुमच्यावर नाही. जे त्रास देतात, त्यांना जबाबदारीचे भान नाही. ते या जन्मात पोळी खात आहेत तर पुढील जन्मात गवत खायला त्यांची हरकत नाही!

## अहंकाराचा लाभ!

अहंकार गेला की उकल होईल. अहंकार आहे तोपर्यंत संसार उभा राहणारच. एक तर आत्मा असतो किंवा अहंकार असतो. अहंकार असेल तर आत्म्याचा लाभ मिळत नाही आणि आत्मा असेल तर अहंकाराचा लाभ मिळत नाही.

**प्रश्नकर्ता :** अहंकारात पण लाभ असू शकतो?

**दादाश्री :** या अहंकाराच्या लाभात तर हे सर्व मुलींची लग्ने लावतात, मुलांची लग्ने लावतात, मुलांचे वडील म्हणून मिरवतात. पत्नीचे पती म्हणून मिरवतात. याला अहंकाराचा लाभ मिळाला असे म्हणता येणार नाही का? सर्व जग अहंकाराचा लाभ उपभोगत आहे. आम्ही स्वरूपधारी आत्म्याचा लाभ उपभोगत आहोत. हा स्व-उपार्जित आहे आणि तो अहंकार-उपार्जित आहे.

**प्रश्नकर्ता :** भ्रांती गेली तर मुक्त होता येईल ना?

**दादाश्री :** हो, भ्रांती गेली म्हणजेच 'जसे आहे तसे' जाणले. भ्रांती गेली म्हणजे अज्ञान गेले. अज्ञान गेले म्हणजेच माया गेली. भगवंतांची माया गेली म्हणजेच अहंकार गेला, अहंकारशून्य झाला म्हणजे मुक्त झाला!

## 'इगोलेस' करायची गरज नाही...

ज्याला कुठल्याही प्रकारचे काम नसते तो आत्मा!

**प्रश्नकर्ता :** हे प्रयत्न कोण करतो?

**दादाश्री :** अहंकार करतो.

**प्रश्नकर्ता :** उड्या कोण मारतो?

**दादाश्री :** अहंकराचा बाह्य भाग उड्या मारतो. ती डिस्चार्ज होत असलेली वस्तू आहे, आणि 'इगोइजम' (अहंकार) चार्ज करत असतो.

**प्रश्नकर्ता :** संपूर्ण निर्‌हंकार केव्हा उत्पन्न होतो?

**दादाश्री :** तो उत्पन्न करून तुम्हाला काय करायचे आहे?

**प्रश्नकर्ता :** 'इगो'मुळे फायदा नाही, एवढे तर कळले आहे.

**दादाश्री :** म्हणजे 'इगोलेस' झालात तर काय उत्तम फळ मिळेल?

**प्रश्नकर्ता :** स्वतःच्या आतील आनंद, परमानंद त्यानंतर प्रकट होईल.

**दादाश्री :** त्याचे काय आहे की 'इगोलेस' करण्याची गरज नाही. 'आपण कोण आहोत' ते जाणणे गरजेचे आहे. आपले जे स्वरूप आहे त्यात 'इगोइजम' नाहीच. 'तुम्ही' चंदुभाई नाहीत, तरी पण 'मी चंदुभाई आहे' असे तुम्ही मानता तोच 'इगोइजम' आहे.

## अज्ञानाचा आधार

आतमध्ये चीड असते, तिला तो वळवून घेण्याचा प्रयत्न करतो, परंतु चीड हा परिणाम आहे आणि ती वळवण्याचा प्रयत्न करतो, ते कॉजेस् (कारणे) आहेत. कित्येक लोक चिडतात पण त्याबद्दल पश्चात्ताप करत नाहीत. उलट 'हो, रागावण्यासारखेच तर होते' असे म्हणतात. तर हे पण कॉजेसच आहेत. समजले का तुम्हाला?

**प्रश्नकर्ता :** चिडायचे काय कारण आहे?

**दादाश्री :** अज्ञानता. अज्ञानतेमुळे राग-द्वेष करत राहतात. हे चांगले, हे वाईट असे करत राहतात. खरे तर हा त्याचा 'इफेक्ट' आहे, त्याला 'आपण' स्वीकारतो, त्याला आधार देतो. 'मला थंडी वाजली, मला असे झाले, मला हे आवडत नाही.' असे म्हणणे म्हणजे आधार देणे असे म्हटले जाते. कढी खारट लागली, ही गोष्ट जिभेचा ताब्यात आहे. त्यात आपण बोलण्याची काय गरज? म्हणजे अशा प्रकारे आधार देत राहतात आणि कारणे तयार करत राहतात. आयुष्यभर राग-द्वेष करत राहतात. आवडत्या वस्तूंबद्दल राग आणि नावडत्या वस्तूंचा द्वेष करतात.

**प्रश्नकर्ता :** हा राग-द्वेष करणारा कोण आहे? अज्ञानता?

**दादाश्री :** 'इगोइजम'. अज्ञानाच्या आधाराने 'इगोइजम' उभा राहिला आहे आणि 'इगोइजम' हे सर्व करत राहतो. जर अज्ञानाचा आधार तुटला तर 'इगोइजम' नष्ट होईल.

## संसाराचे 'रूट कॉज'

हे 'कॉजेस्' (कारणा)चे तुम्हाला समजले की नाही? तुमचा एखादा आवडता मित्र आला तर तुम्ही खुश होता तो राग आहे, आणि नावडती व्यक्ती समोर आली तर?

**प्रश्नकर्ता :** एकदम त्याला जा असे तर म्हणू शकत नाही, म्हणून मन मारून बसून राहतो.

**दादाश्री :** त्याला द्वेष म्हणतात. असे राग-द्वेष तुम्ही करत राहता.

वेदांत काय म्हणतो? ही माणसे परमात्मा का बनू शकत नाहीत? कारण मळ, विक्षेप आणि अज्ञान आहे म्हणून. आणि जैन लोकांची थियरी म्हणते की राग-द्वेष आणि अज्ञान आहे म्हणून. दोघांच्याही मुळाशी अज्ञानता आहेच. म्हणजेच अज्ञानता गेली की आधार तुटतो.

'इफेक्ट' तर आपोआप होतच असतो. पण स्वत: आतमध्ये कॉजेस करतो, आधार देतो आणि म्हणतो, 'मी केले, मी म्हणालो.' वास्तवात 'इफेक्ट'मध्ये कोणाला काही करायची गरजच नसते. इफेक्ट आपोआप सहजपणे होतच असतो पण आपण त्याचे 'मी करतो' असे म्हणून समर्थन करतो. तीच भ्रांती आहे आणि तीच कॉजेस आहेत.

**प्रश्नकर्ता :** त्या 'कॉजेस्'चे 'कॉज' काय आहे?

**दादाश्री :** अज्ञानता. 'रूट कॉज' (मूळ कारण) अज्ञानता आहे. 'ज्ञानी पुरुष' अज्ञानता दूर करतात.

## लक्ष्मीची लिंक

श्रीमंत कोण? तर जो मनाने राजा आहे तो. असेल तर खर्च करतो आणि नसेल तरी पण खर्च करतो.

हे धान्य आहे, ते तीन ते पाच वर्षात निर्जीव होते. मग ते उगवत नाही. दर अकरा वर्षांनी पैसे बदलतात. पंचवीस कोटी जवळ असेलला श्रीमंत असो, परंतु जर अकरा वर्षात त्याच्याजवळ एक रुपया पण आला नसेल तर ते पैसे संपून जातील, जशी या औषधांवर एक्सपायरी डेट (निरुपयोगी होण्याची तारीख) लिहिलेली असते तशीच लक्ष्मीवर पण 11 वर्षांची एक्सपायरी डेट लिहिलेली असते.

**प्रश्नकर्ता :** संपूर्ण आयुष्यभर लोकांजवळ लक्ष्मी असतेच ना?

**दादाश्री :** आज 1977 चे वर्ष आहे, तर आज तुमच्याजवळ 1966 ची लक्ष्मी नसेल.

**प्रश्नकर्ता :** अकरा वर्षांचा हा नियम कुठून आला?

**दादाश्री :** जशी या औषधांची एक्सपायरी डेट 6 महिन्यांची, किंवा दोन वर्षांची असते, धान्यांची तीन वर्षांची असते, तशीच लक्ष्मीची अकरा वर्षांची असते.

लक्ष्मीला जंगम मिळकत म्हणतात. 200 वर्षांपूर्वी जे वाणी लोक असत, त्यांच्याकडे लाख रुपये असले तर ते पंचवीस हजारांची स्थावर मिळकत घेत असत, पंचवीस हजाराचे सोने आणि दागिने घेत असत, पंचवीस हजार रुपये एखाद्या सराफाच्या पेढीवर व्याजावर लावत असत आणि पंचवीस हजार व्यापारात लावत असत. व्यापारात गरज भासली तर पाच हजार रुपये व्याजावर आणत असत. ही त्यांची पद्धत होती. तर मग त्यांचे दिवाळे कसे काय निघू शकेल? चारी बाजूंनी भक्कम खिळे गाडलेले होते. आजकालच्या वाणी लोकांना तर असे काही येतच नाही!

एखादी बाहेरची व्यक्ती माझ्याजवळ व्यावहारिक सल्ला घ्यायला आली आणि म्हणाली की 'कितीही कष्ट केले तरी काही होत नाही.' तेव्हा मी म्हणेन 'सध्या तुझ्या पापकर्माचा उदय चालू आहे. तेव्हा आज जर तू कोणाकडून पैसे उधार आणशील तर रस्त्यात तुझा खिसा कापला जाईल! म्हणून सध्या तू घरी बसून आरामात जी शास्त्रे वाचतोस, ती वाचत बस आणि देवाचे नाव घेत रहा.'

**प्रश्नकर्ता :** सगळेच जर पाप-पुण्याच्या आधीन आहे तर मग 'टेन्डर' कशासाठी भरायची? त्याची गरज काय?

**दादाश्री :** ही 'टेन्डर्स' भरली जातात ती पाप-पुण्याच्या आधारावर भरली जातात. म्हणून मी 'टेन्डर भरा' असे तर सांगतो पण 'टेन्डर' कशाच्या आधारावर भरले जाते ते मला माहीत आहे. या दोन नियमांच्या बाहेर जाता येईल असे नाही.

मी पुष्कळ लोकांना माझ्याजवळ 'टेन्डर' भरून आणायला सांगतो.

पण अजून कोणीच भरून आणलेले नाही. कसे भरतील? ते पाप-पुण्याच्या आधीन आहे. म्हणून पापाचा उदय चालू असेल तेव्हा जर खूप पळापळ करशील तर उलट जे आहे तेसुद्धा निघून जाईल. म्हणून घरी जा आणि झोप आणि साधारण थोडे-थोडे काम कर, आणि पुण्याचा उदय असेल तर मग भटकायची गरजच काय? घर बसल्या समोरासमोर थोडेसे काम केले तरी सगळे येऊन मिळते! म्हणून दोनही स्थितीत पळापळ करायला आम्ही मनाई करतो. ही गोष्ट फक्त समजून घ्यायची गरज आहे.

आम्ही 1968 ला जयगडचा धक्का बांधत होतो. तिथे एक कॉन्ट्रॅक्टर आमच्याजवळ आला. तो मला विचारू लागला, 'मी माझ्या गुरु महाराजांपाशी जातो. दर वर्षी माझे पैसे वाढतच जातात, माझी तशी इच्छा नाही तरी पण वाढतच जातात, तर काय ती गुरुंची कृपा आहे का?' मी त्याला म्हटले 'असे मानून घेऊ नकोस, जर यापुढे तुझे पैसे गेले तर तू म्हणशील मी आता गुरुंना दगडच हाणतो.'

यात गुरु तर निमित्त आहेत, त्यांचे आशीर्वाद निमित्त आहेत. गुरुनांच पाहिजे असतील तेव्हा चार आणे पण मिळत नाहीत ना! म्हणून मग त्याने मला विचारले, 'मग मी काय करू?' मी म्हटले 'दादांचे नाव घे.' आतापर्यंत तुझी पुण्याची लिंक चालू होती. पुण्याची लिंक म्हणजे काळोखात पत्ते उचलले तरी प्रथम चव्वी येईल, मग पंजी येईल आणि मग छक्की येईल. मग लोक म्हणतील 'वाह शेठ, वाह शेठ', असे तुझे 107 पर्यंत खरे झाले आहे पण आता बदलणार आहे. म्हणून सावध रहा. आता तू उचलशील तर प्रथम 57 येतील, मग 3 येतील आणि मग 111 येतील! तेव्हा लोक तुला मूर्ख म्हणतील! म्हणून 'दादां'चे नाव सोडू नकोस नाहीतर हाल होतील.

मग आम्ही मुंबईला आलो. तो माणूस चार-पाच दिवसांनी माझे बोलणे विसरून गेला. त्याला नंतर खूप मोठे नुकसान झाले. म्हणून त्या पती-पत्नी दोघांनीही ढेकूण मारण्याचे औषध घेतले. तो 'दादां'चे नाव घ्यायचेच विसरला होता. पण तो इतका पुण्यशाली की त्याचा भाऊच डॉक्टर होता तो आला आणि त्याच्यामुळे तो वाचला. त्यानंतर तो मोटार

घेऊन धावत माझ्याकडे आला. मी त्याला म्हणालो, 'या दादांचे नाव घेत रहा आणि पुन्हा कधी असे करू नकोस.' मग तो दादांचे नाव घेत राहिला, त्याची सर्व पापे धुतली गेली आणि सर्व काही सुरळीत झाले.

जेव्हा तुम्ही 'दादा' म्हणता, त्यावेळी पापे तुमच्या जवळपास देखील येत नाहीत. चारी बाजूंनी फिरत राहतात पण ती तुम्हाला स्पर्श करत नाहीत. तुम्हाला जर डुलकी लागली तर त्यावेळी ती तुम्हाला स्पर्श करतात. रात्री झोपेत स्पर्श करत नाहीत. जागे असेपर्यंत जर तुम्ही दादांचे नाव घेत राहिला असाल आणि सकाळी उठल्याबरोबर नाव घेतले तर तो मधला काळ देखील तद्रूप मानला जातो.

## मेकॅनिकल चेतन

जगातील लोकांना हे कळतच नाही की चेतन कशाला म्हणतात? ते शरीराला चेतन म्हणतात. चेतनच सर्व क्रिया करते असे म्हणतात. पण चेतन काहीच करत नाही. चेतन फक्त 'जाणण्याची' आणि 'पाहण्याची' ह्या दोनच क्रिया करते. बाकी सर्व अनात्म विभागाचे आहे.

हे बोलतो ते कोण आहे? ते निश्चेतन चेतन आहे. मेकॅनिकल चेतन आहे. दरअसल (मूळ, अस्सल) चेतन नाही. काही जण त्याला स्थिर करायचा प्रयत्न करतात. अरे, कशासाठी त्याला स्थिर करतोस? तू मूळ स्वरूप शोधून काढ ना! मूळ स्वरूप स्थिरच आहे. मग उगाच ह्याला स्थिर करायची सवय कशाला लावतोस? हे निश्चेतन चेतन तर मुळातच चंचल स्वभावाचे आहे. मेकॅनिकलचा अर्थच चंचल आहे. या चंचलाला स्थिर करायचा लोक प्रयत्न करतात, म्हणजे किती चुकीचा मार्ग पकडून ठेवला आहे? म्हणूनच तर अनंत जन्म भटकत राहिले आहेत.

या जगात दोन वस्तू आहेत : एक सचर आहे आणि एक अचर आहे. हे शरीर सचराचर आहे आणि हे जग पण सचराचर आहे. सचर मेकॅनिकल भाग आहे, अनात्मा विभाग आहे आणि अचर आत्मविभाग आहे. ही गोष्ट समजली तर निराकरण होईल, नाहीतर कोटी जन्मांतही ठाव ठिकाणा लागणार नाही.

कोटी जन्म त्याग केला, तप केले तरी काहीही निष्पन्न होणार

नाही. आत्मा त्याग स्वरूपच आहे. सर्वसंग परित्याग स्वरूपच आहे. आता आत्म्यासाठी त्याग करणे हा तर उपद्व्यापच आहे. 'त्यागे उसे आगे' जर तुम्हाला भविष्यात हवे असेल तर त्याग करा.

## चित्त आणि अंतरात्मा

**प्रश्नकर्ता :** चित्त आणि अंतरात्मा यातील भेद समजावून सांगा.

**दादाश्री :** चित्त शुद्ध झाले म्हणजेच अंतरात्मा. त्याला अंतरात्मा म्हणतात, कारण स्वतःच्या परमात्म्याची म्हणजेच शुद्धात्म्याची भक्ती करायची आहे. ते रूप म्हणजे शुद्धात्मा रूप व्हायचे आहे. प्रथम, शुद्धात्मा प्रतीतीत येतो. लक्षात येतो. त्यानंतर अनुभवपदात राहण्यासाठी शुद्धात्म्याबरोबर एक लक्ष, एक तार, करायचे आहे! परंतु जोपर्यंत बाहेर फाइल्स असतील तोपर्यंत दिवसभर तसे होणार नाही. म्हणून अंतरात्मदशा म्हटले आहे. अंतरात्मा म्हणजे 'इंटरिम गर्व्हमेंट' आणि ह्या सर्व फाइल्स पूर्ण झाल्यावर 'फुल गर्व्हमेंट', परमात्मा होतो.

इथे याल तर त्याचे निराकरण होईल, आणि लांब फिरायला जाल तर फक्त पुस्तके आणि पुस्तके भरतील. त्याचा शेवट येणारच नाही.

परमात्मा 'पर्मनन्ट' आहे. मूढात्मा, बहिर्मुखी आत्मा तो 'पर्मनन्ट' नाही आणि अंतरात्मा पुढील जन्मात पण सोबत जातो. अशीच्या अशी मूढात्म दशा पुढील जन्मात नसते. तिथे दुसरी मूढात्मा दशा असेल.

## वृत्ती वाहतात निज भावात

**प्रश्नकर्ता :** चित्त शुद्ध झाल्यानंतर अंतरात्म्याचे जे ज्ञान प्रकट करते ते बाह्य आवरणापासून मुक्त राखते. त्यामुळे मन एकदम बाह्य विचारांकडे झुकत नाही तर आंतरिक विचारांकडे अधिक झुकते.

**दादाश्री :** म्हणजे पूर्वी ज्या वृत्ती बाहेर भटकायला जात असत, त्या आता परत आत येतात, स्वतःच्या घरी येतात.

**प्रश्नकर्ता :** त्यामुळे मनाच्या संवेदना (भावनिकता, जिव्हाळा) यात काही बदल होतो का?

**दादाश्री :** काहीही बदल होत नाही. मन जड आहे. जी बाहेर जाते ती 'पर्मनन्ट' (शाश्वत) वस्तू नसतेच. ती क्षणोक्षणी बदलत असते. यात 'पर्मनन्ट' फक्त आपण 'स्वत:' आहोत. बाकी हे सर्व तर बदलत राहते. तुम्हाला फक्त भासते की आता पाऊस येईल आणि सगळे नष्ट होईल. तो फक्त भास्यमान परिणाम आहे. त्याचा काही विशेष अर्थ नाही. म्हणून आपल्याला हा कसला भास होत आहे? कोणाला भास होत आहे? हे शोधून काढायचे.

जे चित्त 'दादा भगवानांना' आठवत राहते, प्रत्येकांमध्ये 'दादा' दिसतात, अशा चित्ताला खूप चांगले चित्त म्हणतात. पुष्कळ लोकांना असे होत असते. फक्त प्रमाण कमी जास्त एवढेच. 'दादा भगवान' हाच स्वत:चा 'शुद्धात्मा' आहे. म्हणून चित्त शुद्धात्म्यात राखा किंवा 'दादा भगवान'यांच्यात राखा, दोन्ही सारखेच आहे. दोन्ही गोष्टी चित्ताला शुद्धच राखतात.

संसारी चित्त, त्याला अशुद्ध चित्त असे म्हणतात. अशुद्ध चित्त मिश्रचेतन आहे. ते चित्त जेव्हा शुद्ध होते तेव्हा ते शुद्धचेतन होते. शुद्ध चित्त म्हणजेच शुद्ध चेतन. 'मी शुद्धात्मा आहे' असे लक्ष बसले, तेच आपले स्वरूप आहे. त्याला अंतरात्मदशा म्हणतात.

## चित्त आणि प्रज्ञा

**प्रश्नकर्ता :** चित्ताप्रमाणे प्रज्ञा शक्ती पण बाहेर जाते का?

**दादाश्री :** नाही, फक्त चित्तच भटकते. शुद्ध झाल्यानंतर ते भटकत नाही. अशुद्ध चित्त सतत भटकत असते. अरे, जिथे दारुच्या बाटल्याची मेजवानी होत असेल अशा मैफलीत देखील ते जाऊन येते! चित्ताच्या शक्ती जबरदस्त असतात. म्हणून तर लोक कंटाळून जातात ना!

हे मन लोकांना एवढा त्रास देत नाही पण चित्त खूप त्रास देते. मन तर दोन कामे करते, एक म्हणजे त्यातून चांगले विचार फुटतात किंवा वाईट विचार फुटतात, जसे फटाके फुटतात तसे. विचार हे ज्ञेय आहेत आणि 'आपण' ज्ञाता आहोत. पण भ्रांतीमुळे आपल्याला असे वाटते की मला विचार आले.

## दादाश्री - कळी उमलवतात

**दादाश्री :** असे उरफाटे धंदे परत करशील का? तुला जनावर व्हायचे आहे का?

**प्रश्नकर्ता :** नाही.

**दादाश्री :** या दोन पायांनी पडायला होते, त्याऐवजी जर चार पाय असतील तर बरे, मग पडायला तर होणार नाही! शिवाय शेपूट बक्षीस म्हणून मिळेल ते वेगळेच, मग उड्या मारत मारत जाता तर येईल!!! तुला आता असे काही बनायचे आहे की माणूस बनायचे आहे?

**प्रश्नकर्ता :** माणूस बनायचे आहे.

**दादाश्री :** तर त्यासाठी माणसांचे गुण लागतील. जे तुला आवडते तसेच तू समोरच्याला दिलेस तर मनुष्य जन्म मिळेल. तुला जर कोणी नालायक म्हटले तर तुला आवडेल का?

**प्रश्नकर्ता :** नाही आवडणार.

**दादाश्री :** म्हणून आपल्याला समजायला हवे की आपण कोणाला नालायक म्हटले तर ते त्याला कसे आवडेल? म्हणजे आपण असे म्हणायला हवे की या भाऊसाहेब, तुम्ही खूप चांगले आहात, तर त्याला आनंद होईल.

कोणी आपल्याशी खोटे बोलले तर आपल्याला दु:ख होते, त्याचप्रकारे आपण दुसऱ्यांशी खोटे बोललो तर त्याला किती दु:ख होईल?

बिन हक्काचा उपभोग घेऊ नये. लोक उपभोगतात का बिन हक्काचे?

**प्रश्नकर्ता :** खूप लोक उपभोगतात.

**दादाश्री :** अरे, लोक तर दुसऱ्यांची बायको देखील पळवून नेतात! स्वत:च्या हक्काचीच बायको असावी. हे लोक तर दुसऱ्यांची बायको उचलून आणतात! स्वत:च्या हक्काची बायको असेल तर लोक

नावे ठेवणार नाहीत. घरातील लोक पण रागावणार नाहीत. मग कुठल्या खड्ड्यात पडणे जास्त चांगले?

**प्रश्नकर्ता :** हक्काच्या.

**दादाश्री :** बिन हक्काचा खड्डा तर खूप खोल आहे! परत त्यातून वर येता येणारच नाही. तेव्हा सावधान राहिलेले बरे. म्हणून तू सावध हो. हे तारुण्य आहे, म्हणून हा भीतीचा इशारा आम्ही तुला देत आहोत. जो म्हातारपणाच्या वाटेवर आहे त्याला आम्ही असे सांगत नाही.

**प्रश्नकर्ता :** हो, हो, नाही घेऊन जाणार, दुसऱ्याची बायको घेऊन जाणार नाही.

**दादाश्री :** हो, मग ठीक आहे. असा विचारही मनात आणू नकोस. एखाद्या स्त्रीबद्दल आकर्षण वाटल्यास, 'हे दादा भगवान! मला माफ करा.' असे म्हण.

बिन हक्काचा पैसा लुबाडू नये. या मुंबई शहरात लोक भेसळ करत नाहीत ना?

**प्रश्नकर्ता :** व्यापारी तर करतातच.

**दादाश्री :** मग जर कोणी ओळखीचा असेल तर त्याला सावध कर, 'चार पायाचे व्हायचे असेल तर भेसळ करा.' तरी पण तुम्ही उपाशी मरणार नाही याची आम्ही खात्री देतो. काही तरी समजायला तर हवे ना? आपण कुठल्या देशाचे लोक आहोत?

**प्रश्नकर्ता :** भारत देशाचे.

**दादाश्री :** आपण भारत देशाचे आहोत मग आपले गुण काय आहेत? आपण आर्य प्रजा आहोत! आणि इतरत्र कोणते लोक आहोत?

**प्रश्नकर्ता :** अनार्य.

**दादाश्री :** आपल्याकडे काही काही व्यक्ती अशा होऊन जातात, त्यांना आपण काय म्हणतो? अनाडी. आर्यप्रजा म्हणजेच आर्य आचार, आर्य विचार आणि आर्य उच्चार.

तुला माझे बोलणे आवडते का? की कंटाळा येतो?

**प्रश्नकर्ता :** आवडते म्हणूनच तर बसलो आहे.

**दादाश्री :** तू कधी खोटे बोलतोस का?

**प्रश्नकर्ता :** बोलतो.

**दादाश्री :** खोटे बोलण्यामुळे काय नुकसान होत असेल?

**प्रश्नकर्ता :** नुकसान होते.

**दादाश्री :** आपल्यावरचा विश्वास उडतो.

**प्रश्नकर्ता :** खोटे बोललेले समोरच्याला कळणार नाही असे मानून बोलतो.

**दादाश्री :** हो, पण विश्वास उडाला तर माणसाची किंमत शून्य. तू कधी चोरी केली आहेस का?

**प्रश्नकर्ता :** नाही, नाही केली.

**दादाश्री :** नाही केलीस? तुला चोरी करणे आवडत नाही?

**प्रश्नकर्ता :** आवडते पण भीती वाटते.

## भूक लागली? विझवा!

**दादाश्री :** तू रोज पोटात जेवण घालतोस ते कशासाठी?

**प्रश्नकर्ता :** भुकेला संतुष्ट करण्यासाठी

**दादाश्री :** तुला भूक लागते त्यावेळी आत पोटात लागते की विझते?

**प्रश्नकर्ता :** भूक तर लागतेच ना?

**दादाश्री :** विझत नाही?

**प्रश्नकर्ता :** नाही, खाल्यानंतर विझते.

**दादाश्री :** हो, म्हणून भुकेला अग्नि म्हणतात ना? पोटात आग

लागते तेव्हा काय खातोस? या मोटारीचे जेवण तर पेट्रोल आहे आणि आपले इंधन तेल-तूप असे असते. तुला फक्त भूकच लागते की तहान पण लागते?

**प्रश्नकर्ता :** तहान पण लागते ना?

**दादाश्री :** म्हणजे तहानेने पण आतमध्ये आग लागते असेच ना? मग तू त्यात पाणी ओततोस तेव्हा ती विझते, हो ना?

**प्रश्नकर्ता :** हो.

**दादाश्री :** तुला थकवा जाणवतो का?

**प्रश्नकर्ता :** हो, थकवासुद्धा जाणवतो.

**दादाश्री :** थकल्यावर तू तासभर आराम करतोस. झोप लागते का?

**प्रश्नकर्ता :** हो, लागते.

**दादाश्री :** म्हणजे हे सर्व लागते.

भगवांतांनी काय म्हटले होते की हा माणसाचा जन्म लागलेली आग विझविण्यासाठी आहे. तेव्हा आपण म्हणतो, 'साहेब, लागलेली आग विझवून टाकली. आता आणखी मी काय करायला हवे?' तेव्हा भगवंत म्हणतात, 'तुम्ही फक्त माझे नाव घेत राहा आणि सुटण्याची तयारी करा.' हिंदुस्तानात आर्यप्रजेच्या रूपात जन्म झाला म्हणजे तो सुटायला लायक झाला.

एका व्यक्तीला मी विचारले 'तुझ्या गल्लीत तर सर्व सावकारच राहतात, म्हणून तिथे तर चोऱ्या होतच नसतील?' तेव्हा तो म्हणाला, 'ही समोरची पोलिस चौकी काढून पाहा. मग आमचे शेजारी-पाजारी संडासातील टमरेलसुद्धा राहू देणार नाहीत.' म्हणजे तू म्हणतोस तसेच, केवळ भितीमुळेच! भीती नसेल तर मग काहीच हरकत नाही ना?

**प्रश्नकर्ता :** हो, मग काहीच हरकत नाही.

**दादाश्री :** तुला आवडतात त्या वस्तू तू चोरून आणतोस?

**प्रश्नकर्ता :** हो, आवडीच्या वस्तू तर आणतो.

**दादाश्री :** सोन्याची साखळी कांब पडली असेल तर आणशील का?

**प्रश्नकर्ता :** तसे असेल तर सगळ्यांच्याच मनात लालच होईल ना?

**दादाश्री :** या लोकांचे मन काही स्थिर नाही. हे लोक तर फक्त भितीमुळे सरळ राहतील असे आहेत. या कविराजांनी मला एक दिवस म्हटले होते की या अशा नालायक लोकांसाठी सरकारला सैन्य आणि पोलिस ठेवावे लागतात आणि त्यासाठी लागणारा कर (टैक्स) ते लायक लोकांकडून घेतात! जगात असे अनेक लोक आहेत की ज्यांच्यासाठी पोलिसांची गरज नाही.

## संघर्षामुळे अटकण

मॅजिस्ट्रेट साहेब घरी बायकोबरोबर दोन-दोन महिने बोलत नाहीत आणि तिथे कोर्टात सात वर्षांची शिक्षा सुनावून येतात! अरे, मग घरात तोंड फुगवून का फिरता? निकाल लावून टाका ना!

माझा कोणाशीही किंचितही मतभेद झालेला नाही. याचे काय कारण?

**प्रश्नकर्ता :** जर मतभेद होईल असे बोललो नाही, वागलो नाही तर मतभेद होणार नाहीत.

**दादाश्री :** मतभेद म्हणजे काय? संघर्ष (भांडण, वाद-विवाद). तुम्ही असे सरळ सरळ चालला असाल आणि वाटेत इलेक्ट्रिकचा खांब आला तर तुम्हाला समजायला हवे. तुम्ही जर त्याला म्हणाले, 'मला अडवणारा तू कोण?' तर काय होईल? समोरून म्हशीचा मुलगा-रेडा येत असेल तर काय आपण त्याला बाजूला हो, बाजूला हो असे म्हणणार का?

**प्रश्नकर्ता :** नाही, तसे चालणार नाही.

**दादाश्री :** अशा वेळी आपण बाजूला व्हायला हवे. साप येत असेल तर?

**प्रश्नकर्ता :** ते तर जनावरांचे जग झाले.

**दादाश्री :** हे जे मी जनावरांबद्दल बोलतो, पण माणसेही तशीच असतात.

**प्रश्नकर्ता :** त्यांना कसे ओळखावे?

**दादाश्री :** आपल्याला ते समजतेच, त्याने शिंगे उगारली तर आपल्याला हा रेडा आहे हे समजेल की नाही? म्हणून आपण तिथून बाजूला सरकावे. मला तर येण्यापूर्वीच समजते. वासावरूनच ओळखता येते. काही दगडासारखेही असतात, खांबासारखेही असतात.

**प्रश्नकर्ता :** कित्येकांना तर चेहरा पाहून समजते ना?

**दादाश्री :** हो, खरे आहे. परंतु जे चेहऱ्यावरून ओळखू शकतात त्यांना स्वतःचा 'थर्मामीटर' किती 'करेक्ट' ठेवावा लागेल?

**प्रश्नकर्ता :** पूर्वग्रहरहित ठेवावा लागेल.

**दादाश्री :** जर माणूस पूर्वग्रहरहित झाला तर त्याचे कल्याणच होईल. काल जर तुम्ही माझ्याशी भांडण करून गेला असाल आणि आज तुम्ही परत आलात तर मी कालची गोष्ट बाजूला सारून टाकलेली असते. मी पूर्वग्रह ठेवला तर ती माझी चूक आहे, मग जरी आजही तुम्ही तसेच वागलात तरी हरकत नाही. या पूर्वग्रहांमुळेच सारे जग सतत मार खाते आणि म्हणून त्यामुळे दोष लागतात. तुम्ही जसे आहात तसे तुम्ही मानत नाहीत आणि जसे नाहीत तसे मानता! जेव्हा तुम्ही समोरच्याला गाढव म्हणता त्याचबरोबर तुम्ही भगवंतांना देखील गाढव म्हणता. म्हणून समोरच्याला गाढव म्हणण्यापूर्वी पूर्ण विचार करा. संघर्ष होता कामाच नये. त्याचे निराकरण झाले पाहिजे. निराकरण केल्याशिवाय निवांत बसून राहणे म्हणजे 'वेस्ट ऑफ टाईम एन्ड एनर्जी' (केवळ वेळ आणि शक्ती यांचा अपव्यय) आहे.

## स्थितप्रज्ञ असे कधी म्हणता येईल?

एका पंडिताने मला विचारले, 'स्थितप्रज्ञ म्हणजे काय?' पण मी काही पंडित नाही. मी तर ज्ञानी आहे. त्या पंडिताचा कारण नसताना

पारा चढला होता. मी त्यांना सांगितले की जेव्हा तुमचा पारा उतरेल तेव्हा स्थितप्रज्ञ दशा येईल! म्हणून प्रथम हा पारा उतरवा. पंडित हे तर विशेषण आहे. खूप लोकांना ते असते. पंडित तर खूप असतात, पण एकदा विना विशेषणाचे व्हा. मी विना विशेषणाचे आहे, म्हणून लोक मला ज्ञानी म्हणतात. नाहीतर मी ज्ञानी पण नाही. मी तर कोणतेही विशेषण नसलेला 'निर्विशेष पुरुष' आहे.

## विचारांनी कर्मांचा नाश होतो का?

**प्रश्नकर्ता :** असे म्हणतात की संपूर्ण मोहनीय कर्म विचारांनी नष्ट करता येते.

**दादाश्री :** हो, पण ते विचार 'ज्ञानी पुरुषां'कडून घेतलेले असावेत. स्वत:च्या विचारांनी नाही.

विचार दोन प्रकारचे असतात : एक स्वच्छंदी विचार आणि दुसरे 'ज्ञानी पुरुषां'कडून घेतलेले विचार. 'ज्ञानी पुरुषां'ना विचारावे की मला असे असे विचार येत आहेत. मग ते म्हणतील हो, हे 'करेक्ट' आहे. तर मग पुढे चालू ठेवा, नाहीतर जर स्वच्छंदी विचार असतील तर ते कोठे पोहोचतील ते सांगता येत नाही. विचारांनी सगळे काही संपू शकते. माझे सगळे विचारांनीच संपले आहे. या जगात असा एकही परमाणू नाही, अशी एकही वस्तू नाही की ज्याबद्दल मी विचार केला नसेल.

## कर्मांची निर्जरा-ज्ञानींची पद्धत!

**प्रश्नकर्ता :** जे ज्ञानी आहेत, ते जर मोहनीय कर्मांचे ज्ञाता-द्रष्टा राहिले तर ती कर्मे नष्ट होतील ना?

**दादाश्री :** ज्ञाता-द्रष्टा राहिले तर सर्वच कर्मे संपतील. मग चारित्र्य मोह पूर्णपणे संपेल. फक्त शुद्ध उपयोगच राहील. 'मी शुद्धात्मा आहे' हाच उपयोग राहायला हवा. हा पण शुद्धात्मा आहे, तो पण शुद्धात्मा आहे. गाढव, कुत्रा, मांजर, सर्वच शुद्धात्मा आहेत. खिसे कापणारा पण शुद्धात्मा आहे.

या दूषमकाळातील जीवांची समज मोह आणि मूर्च्छेने भरलेली

आहे. म्हणून कृपाळूदेवांनी या काळातील जीवांना हत्पुण्यशाली म्हटले आहे. हे लोक दिवसभर क्रोध-मान-माया-लोभ, राग-द्वेष करत राहतात! वाडवडील करत असत, तीच रूढी चालत असते, त्याप्रमाणेच धर्म करतात. पण तो समजपूर्वकचे नसतो. प्रत्येकाला आपापल्या धर्माच्या पुद्‌गलाचे आवरण असते. जैनांना जैन पुद्‌गल आणि वैष्णवांना वैष्णव पुद्‌गल मोक्षाला जाऊ देत नाही. त्या पुद्‌गलाची जेव्हा *निर्जरा* होईल तेव्हा कल्याण होईल. मोक्षासाठी जैन पुद्‌गल पण उपयोगी पडणार नाही आणि दुसरे कुठले पुद्‌गल पण उपयोगी पडणार नाही. प्रत्येक पुद्‌गलाचा निकाल करावा लागेल.

**प्रश्नकर्ता :** मोक्षाच्या दारात पुद्‌गलाला तर प्रवेश करायचाच नसतो ना? तिथे तर फक्त आत्म्यालाच प्रवेश करायचा आहे.

**दादाश्री :** शुद्धात्मापद प्राप्त झाल्यानंतरच मोक्षात प्रवेश करता येते. इतर सर्वांबद्दलचे राग-द्वेष संपले की जे उरते त्याला चारित्र्य मोह म्हणतात. त्याची *निर्जरा* झाली की मोक्ष मिळेल!

**प्रश्नकर्ता :** कर्माची *निर्जरा* कशी होते?

**दादाश्री :** जर तुम्ही शुद्धात्म्यात असाल तर कर्मांची *निर्जराच* होत असते. कसली *निर्जरा* होत आहे, त्याच्याशी तुम्हाला काय कर्तव्य? तुम्ही रोज संडासमध्ये पाहत राहता की आज संडास पिवळी झाली की काळी झाली? ती पण एक *निर्जराच* आहे, शरीराची एक प्रकारची *निर्जरा* आहे.

**प्रश्नकर्ता :** ते बरोबर आहे, पण *निर्जरा* पूर्ण कधी होते?

**दादाश्री :** पूर्ण करून तुम्हाला काय करायचे आहे?

**प्रश्नकर्ता :** मग समजेल ना की आता मोक्ष जवळ आला आहे.

**दादाश्री :** अशी घाई केली तर वाटेत दुसरी काटेरी झुडपे चिकटतील! हा घाईचा मार्ग नाही. हा तर जागृती राखण्याचा मार्ग आहे. शुद्ध उपयोगात राहिलात तर आपोआप *निर्जरा* होतच राहील. तुम्ही काहीही करायचे नाही. म्हणून तर आम्ही पण असे सांगतो की आम्हाला मोक्षाला जायची घाई नाही. आम्हाला घाई कशासाठी? आम्ही तर इथेच मोक्ष

अनुभवत आहोत, मग आणखी दुसरा कुठला मोक्ष हवा आहे? आणि तो मोक्ष तर नियमानुसार आहेच. त्याची आपोआप पाटी येईल की तीन वाजून तीन सेकंदाने होईल! मग आपल्याला घाई करायची काय गरज?

**प्रश्नकर्ता :** मोक्ष अगदी निश्चितच आहे का?

**दादाश्री :** नाही, निश्चित समजू नका. निश्चित असेल तर सर्व निवांत झोपतील. असे नसते.

## शुद्ध उपयोगामुळे अबंध दशा

'तुम्ही शुद्ध उपयोगातच राहा' एवढेच आम्ही सांगू इच्छितो. बाकी कसलाही विचार तुम्ही करू नका. हा काही दिवस नाही की आता संपेल! हा तर संसार आहे. तुम्ही उपयोगात राहाल तर सर्व हिशोब संपेल! तुम्ही जर 'हे कधी संपेल?' असा विचार करत बसलात तर दुसरे भूत घुसेल. आपल्याला कसली घाई आहे?

आमच्यात खूप कमी चारित्र्यमोह आहे आणि तुमचा अजून खूप खूप शिल्लक आहे. पण तुमचाही दिवसेंदिवस कमीच होत चालला आहे. चारित्र्यमोह जात आहे, आणि तो मुक्ती देऊनच जातो.

चारित्र्यमोहाचे पाच लाख पाहुणे होते, त्यातील आता पाचशे गेले, म्हणजे ते पाचशे कमी झाले, मग पुन्हा पाचशे गेले, पुन्हा पाचशे गेले, असे करत करत ते कमी होत चालले आहेत. मग पाच लाखांचे चार लाख उरतील. मग तीन लाख उरतील, मग दोन लाख, असे करत करत संपेल. आपण रोज मोजत राहिलो की किती राहिले, किती राहिले, तर असे मोजून काय फायदा आहे? शुद्ध उपयोगात राहिलो तर *संवर* सह *निर्जरा* होतच राहील.

**प्रश्नकर्ता :** याचा अर्थ असा झाला की जितके अधिक शुद्ध उपयोगात राहू, तितकी अधिक *निर्जरा* होईल?

**दादाश्री :** हो, शुद्ध उपयोगच काम करील. शुद्ध उपयोग हा तुमचा धर्म आहे. तो जितका चुकेल तितका तुम्हाला त्रास होईल आणि आम्ही ज्या पाच आज्ञा दिल्या आहेत, त्या शुद्ध उपयोगात राहण्यासाठीच

आहेत. पाच आज्ञा पाळल्या म्हणजेच शुद्ध उपयोग. त्यातली एक जरी पाळली तरी तो शुद्ध उपयोगच आहे. पाचमधून एक तरी आज्ञा पाळणे तुम्हाला जमणार नाही का?

**प्रश्नकर्ता :** दादा, त्याचे काय आहे की त्यातली एक पाळली की पाचही पाळल्या जातात.

**दादाश्री :** ते तर उलट चांगलेच आहे ना? एक पाळली तरी पाचही पाळल्याचा लाभ मिळतो. हे तर खूपच सोपे आणि सरळ आहे. काहीच कठीण नाही. डोक्यावर कोणी रागावणारा नाही. नाहीतर तुमच्या डोक्यावर गुरु महाराज असतील तर ते तुमचे तेल काढतील! सकाळी उठल्यापासून सतत तुम्हाला रागावतच राहतील.

## कर्मांचे आयोजन - क्रिया की ध्यान?

**प्रश्नकर्ता :** तुम्ही म्हणता की सध्या आम्ही भोगतो त्यामागे आयोजन आहे. त्यात क्रियमाण कर्म पण असतात आणि संचित कर्म पण असतात, तर मग कर्म आणि कारण यांचे आयोजन कसे समजावे?

**दादाश्री :** ते आयोजन आपल्या क्रियांवर आधारित नाही. आपल्या ध्यानावर आधारित आहे. तुम्ही नगीनदासच्या दबावामुळे पाच हजार रुपये दान तर देता, परंतु तुमचे ध्यान वास्तविक नव्हते.

**प्रश्नकर्ता :** तशी फारशी इच्छा तर नव्हती.

**दादाश्री :** नाही, इच्छा नव्हती असे नाही. इच्छेची गरजच नाही. इच्छेने कर्मबंधन होत नाही. ते ध्यानावर आधारित आहे. इच्छा तर असेल किंवा नसेलही. पैसे देताना मनात असे येते की जर हे नगीनभाई नसते तर मी दिलेच नसते. म्हणजे उलट तुम्ही दान देऊनही जनावरगतीत जाल - कारण हे तुम्ही रौद्रध्यान केले म्हणून.

**प्रश्नकर्ता :** ध्यान कशावर आधारित आहे?

**दादाश्री :** ध्यान तर तुमच्या डेव्हलपमेंट (प्रगती)वर आधारित आहे. तुमची कोणत्या प्रकारच्या ज्ञानाची डेव्हलपमेंट झाली आहे, त्यावर अवलंबून आहे.

तुम्ही एखादी वाईट कृती कराल परंतु जर आतमध्ये ध्यान चांगल्या प्रकारचे असेल तर तुम्हाला पुण्य मिळेल. शिकाऱ्याने हरणाला मारले, पण मनात खूप पश्चात्ताप केला की 'माझ्या वाट्याला हे असे करणे का बरे आले? बायको-मुलांसाठी नाइलाजाने मला हे करावे लागत आहे!' तर ते ध्यान उच्च प्रकारचे झाले असे म्हटले जाईल. निसर्ग क्रिया पाहत नाही. ती क्रिया करताना तुमचे ध्यान कसल्या प्रकारचे होते ते पाहतो. इच्छा पण पाहत नाही.

एखाद्या व्यक्तीने तुम्हाला लुटले तर त्यावेळी तुमच्या मनातील भाव रौद्र होतात. काळोखात असे भाव होतात आणि शुद्ध प्रकाशात कसे भाव होतील? 'व्यवस्थित' आहे असे म्हणून कसलेही भाव-अभाव न करता तुम्ही पुढे चालू लागाल.

## धर्म, अर्थ काम आणि मोक्ष

**प्रश्नकर्ता :** धर्म, अर्थ, काम आणि मोक्ष, जीवनाचे हे चार पद समजावून सांगा.

**दादाश्री :** अर्थ म्हणजे आपल्या इथे लोक ज्याला सांसारिक स्वार्थ म्हणतात तो. तिथपासून ते थेट परमार्थापर्यंतचा अर्थ तो अर्थ आहे. थेट परमात्म्यापर्यंत अर्थ राहतो.

परमार्थाचा अर्थ काय? तर फक्त आत्म्याबद्दलच जिथे स्वार्थ आहे, दुसरा कुठलाही स्वार्थ नाही. आत्म्याशिवाय कुठलाही सांसारिक स्वार्थ जिथे नाही, त्याला परमार्थ असे म्हणतात. आणि आत्म्यासंबंधी स्वार्थी तर 'ज्ञानी पुरुष'च असतात!

अर्थ मग जो स्वार्थात घेऊन जातो, त्या वेळी तो सकामात परिणमित होतो, आणि अर्थ जेव्हा परमार्थात जातो तेव्हा तो निष्कामात परिणमित होतो. तेच काम (निष्काम) मोक्षाला घेऊन जाते आणि तेच काम (सकाम) संसारात भटकवते.

धर्माचे पण तसेच, तोच धर्म संसारातही भटकवतो आणि तोच धर्म मोक्षात पण घेऊन जातो.

**प्रश्नकर्ता :** धर्माची व्याख्या काय?

**दादाश्री :** या संसारात भटकवतो तो शुभ धर्म आणि मोक्षात घेऊन जातो तो शुद्ध धर्म.

धर्म असे नाव का पडले? कारण अधर्म होता म्हणून धर्म नाव पडले. म्हणजेच हा धर्माधर्म आहे. संसारातील धार्मिक पुरुष काय करतात? अधर्माचे विचार आले तर त्यांना सतत धक्का मारत राहतात. अधर्माला धक्का मारत बसणे, त्याला धर्म म्हणतात.

**प्रश्नकर्ता :** धर्माचे पालन केले तर अधर्म आपोआप निघून जाईल ना?

**दादाश्री :** धर्म दोन प्रकारचे असतात. एक स्वाभाविक धर्म आणि दुसरा विशेष धर्म. जेव्हा शुद्धात्मा प्राप्त होतो, तेव्हा तो स्वाभाविक धर्मात येतो. स्वाभाविक धर्म हाच खरा धर्म आहे, त्या धर्मात काहीच 'निवडायचे' नसते! विशेष धर्मात सर्व काही 'निवडायचे' असते.

लौकिक धर्म कशाला म्हणतात? दान देणे, लोकांवर उपकार करणे, 'ओब्लाइजिंग नेचर' ठेवणे, लोकांची सेवा करणे, या सर्वांना धर्म म्हणतात. त्यामुळे पुण्य मिळते आणि शिव्या देणे, मारामारी करणे, लुबाडणे यामुळे पाप लागते. जिथे पाप आणि पुण्य असते, तिथे खरा धर्मच नाही. खरा धर्म पाप-पुण्य रहित असतो. जिथे पाप-पुण्याला 'हेय' (त्याज्य) मानले जाते आणि स्वत:च्या स्वरूपाला 'उपादेय' मानले जाते, तो रियल धर्म आहे. म्हणजेच 'रियल' आणि 'रिलेटिव्ह', हे दोन्ही धर्म वेगळे आहेत.

अर्थ सांसारिक स्वार्थात परिणमित होतो तो अधर्म आणि आत्मिक स्वार्थात परिणमित होतो तो धर्म. सकाम आणि निष्कामचे पण तसेच आहे.

**प्रश्नकर्ता :** धर्माशिवाय कोणी जीव राहू शकतो का?

**दादाश्री :** कोणीही जीव धर्माच्या बाहेर नसतो. एकतर तो धर्मात असतो किंवा अधर्मात असतो. त्याशिवाय कुठेच नसतो.

**प्रश्नकर्ता :** कित्येक जण ईश्वराला मानत नाहीत ना?

**दादाश्री :** या जगात ईश्वराला न मानणाऱ्यांना आपण नास्तिक म्हणू नये. त्यांना नास्तिक म्हणणे हा खूप मोठा गुन्हा आहे. त्याचे काय कारण आहे? ज्याला 'मी आहे' असे स्वत:च्या अस्तित्वाचे भान आहे, ते सर्व आस्तिकच आहेत. आणि सर्व धर्म वेगळ्या-वेगळ्या प्रकारचे असतात. कोणी नीतिला प्रमाण मानतात, कोणी सत्याला प्रमाण मानतात, कोणी माणसांना वाचविण्याला प्रमाण मानतात, ह्या सर्व गोष्टी पण धर्माचेच भाग आहेत. फक्त मंदिरे उभारणे म्हणजेच धर्म नाही. जो पूर्णपणे नीतिपरायण आहे तो जर मंदिरात दर्शन करण्यास गेला नाही तरी हरकत नाही. त्याला दुसरी कसली गरजच नाही. प्रामाणिकपणा हे तर धर्माचे सर्वात मोठे साधन आहे. प्रामाणिकपणा आणि नीती यासारखी आणखी दुसरी कोणतीच धर्माची साधने नाहीत. इथे तर नीती, प्रामाणिकपणा नावालाही नसतो, म्हणून मग स्वत: धर्मात जाऊन, देवळात जाऊन 'हे प्रभू! मी कापड ताणून-ताणून विकतो पण मला माफ कर', असे म्हणतो. हे व्यापारी कापड विकताना कापड ताणून ताणून का विकतात? मी त्यांना विचारतो की तुम्ही भगवंतांची भक्ती करता मग कापड ताणून ताणून का विकता? तेव्हा ते म्हणतात, 'सगळेजण ताणतात म्हणून मी पण ताणतो.' मी म्हणालो 'सगळ्यांनी विहीरीत उड्या टाकल्या म्हणून तू टाकशील का? तू का ताणतोस?' तेव्हा तो व्यापारी म्हणतो की 'असे केले की चाळीस मीटरमध्ये अर्धा-पाव मीटर वाढते!' अरे, ही ताणण्याची कसरत का करतोस? हे तर तू वारंवार रौद्रध्यान करत आहेस. मग तुझी काय दशा होईल? महावीरांच्या सभेत तुला बसलेला मी पाहिला होता. जे लोक महावीरांच्या सभेत बसले होते तेच आता इथे कपडे ताणून मोजतात आणि म्हणूनच या लोकांची मोक्षात जाण्याची पाळी येत नाही. हे लोक तर फक्त चटणीसाठी बसून राहिले आहेत. पूर्ण ताटासाठी बसलेले नाहीत.

**प्रश्नकर्ता :** सत्य, अहिंसा, प्रामाणिकपणा, हे जे सर्व दिव्य गुण आहेत. त्यातील एखाद्याच गुणांची उपासना केली की बाकी गुण 'ऑटोमेटिक' (आपोआप) येतात असे आहे का?

**दादाश्री :** हो, एक गुण पकडला तर सर्व येतील. एकाला पकडून बसला तर सर्वच येतील!

## मुक्तीची कामना असलेला

**प्रश्नकर्ता :** माणूस श्रद्धेने जीवनात टिकतो का? ते कशा प्रकारे?

**दादाश्री :** आपण एका स्टीमरमध्ये बसलो, नंतर एखाद्या माणसाच्या मनात अशी शंका आली की ही स्टीमर बुडणार आहे तर आपण लगेच उतरतो, परंतु जर श्रद्धा बसली असेल तर? तर मग बसून राहू की नाही? काय वाटते तुम्हाला? श्रद्धा बसली नसेल तर मात्र तो ताबडतोब उठेल.

**प्रश्नकर्ता :** कित्येकदा आम्ही श्रद्धा ठेवून काम करत असतो पण तरी त्यात आम्हाला संकटच येते.

**दादाश्री :** ती श्रद्धा नाही, तो विश्वास आहे. विश्वासात संकटे येतात, श्रद्धेत येत नाहीत.

**प्रश्नकर्ता :** माझ्या बाबतीत असे घडले आहे.

**दादाश्री :** श्रद्धा आणि विश्वास या दोन वेगळ्या गोष्टी आहेत. श्रद्धा 'बिलीफ' (मान्यते)वर अवलंबून आहे. विश्वास असेल तिथे विश्वासघातही होऊ शकतो.

हे पूर्ण जग 'बिलीफ'च्या आधारावर चालले आहे. परंतु ह्या जगात दु:ख का आहे? कारण त्याला 'रॉंग बिलीफस्' मिळाल्या आहेत, जर 'राइट बिलीफ' असती तर या जगात दु:खे नसतीच! सर्व जीवमात्र बिलीफ - मान्यतेवरच चालू आहेत. यात मनुष्य सोडून इतर सर्व जीव तर आश्रितच आहेत. देवी-देवता, जनावरे, हे सर्व आश्रितच आहेत. फक्त माणूसच निराश्रित आहे.

**प्रश्नकर्ता :** माणसे निराश्रित कशी? आणि देवी-देवता आश्रित कसे?

**दादाश्री :** फक्त माणूसच निराश्रित आहे. कारण माणसासारखे दुसरे कोणतेही जीव, अगदी देवी-देवतासुद्धा 'मी कर्ता आहे' असे भान ठेवीत नाहीत आणि जिथे कर्ता झाला तिथे भगवंताचा आश्रीतपणा सुटतो. भगवंत म्हणतात 'तू करतो आहेस ना, मग मी वेगळा आणि तू वेगळा!'

मग तुमचा आणि भगवंतांचा काय संबंध? मग तुम्ही थकता, कंटाळता आणि मग महावीरांच्या किंवा कृष्णाच्या मूर्तीसमोर बसून डोके आपटत बसता! मग तेव्हा कोणीही तुम्हाला आश्रित म्हणून स्वीकारत नाहीत!

कर्तेपणाची 'राँग बिलीफ' सुटली तरच तुम्ही आश्रित आहात, सर्वस्व आहात. पण ही राँग बिलीफ सुटतच नाही ना?

**प्रश्नकर्ता :** 'दादा' सोडवतात ना?

**दादाश्री :** ज्यांची सुटायची इच्छा आहे त्यांना सोडवतात ज्यांना सुटायचेच नसते त्यांना कसे सोडवणार? कारण भगवंतांच्या घरी पण नियम आहेत. भगवंतांचा नियम काय आहे? ज्याला सुटायचे असेल त्याला भगवंत कधीच बांधत नाहीत, आणि ज्याला बंधनातच राहायचे आहे त्याला कधी सोडवत नाहीत! आता जगातील लोकांना विचारायला जायचे की तुम्हाला सुटायचे आहे की बंधनातच राहायचे आहे?

**प्रश्नकर्ता :** बंधनातच राहायचे आहे की सुटायचे आहे हे आपल्याला कसे कळणार?

**दादाश्री :** ते बंधन होईल अशा कारणांचे सेवन करत आहेत की सुटण्याच्या कारणांचे सेवन करत आहेत यावरून समजेल. जे सुटण्याच्या कारणांचे सेवन करतात त्यांना सुटण्याचे संयोग जुळून येतात. त्यांना भगवंत मदत करतच राहतात. आणि जे बंधनाच्या कारणांचे सेवन करतात त्यांनाही भगवंत मदत करतात. मदत करणे हेच तर भगवंतांचे काम आहे ना!

**प्रश्नकर्ता :** मदत करणे यात भगवंतांचा पक्षपात आहे का? मदत करण्यापुरता पक्षपात?

**दादाश्री :** भगवंत स्वत: मदत करीत नाहीत. ही सगळी नैसर्गिक रचना आहे - स्वतंत्र. 'सायंटिफिक सरकमस्टेन्शियल एविडेन्स' आहे. कारण सर्व जीव स्वतंत्र आहेत. स्वतंत्र म्हणजे निसर्ग त्यांना कायम मदत करत असतो. तो जर म्हणाला, 'मला चोरी करायची आहे', तर चंद्र, तारे सगळे त्यासाठी हजर असतात. भगवंत तर त्यात फक्त प्रकाश

देण्याचे काम करतात. यात चोरी करण्याचा मूळ भाव त्याचा स्वत:चा आहे. निसर्ग त्याला त्याचे पुण्य जिथेही खर्च करायचे असेल तिथे मदत करतो, म्हणजे त्यासाठी लागणारे सर्व संयोग त्याला मिळवून देतो. भगवंत यात फक्त प्रकाशच देतात.

## भक्ती, योग आणि ध्यान

**प्रश्नकर्ता :** गीतेत असे म्हटले आहे की पृथ्वीवर पापाचा भार जेव्हा जेव्हा वाढतो तेव्हा त्याचा नाश करण्यासाठी 'मी' जन्म घेतो, तर 'मी' म्हणजे कोण?

**दादाश्री :** त्यालाच आत्मा म्हणतात. मी म्हणजे श्रीकृष्ण नाही. 'मी' म्हणजेच आत्मा. नियम असा आहे की पृथ्वीवर जेव्हा पापाचा भार वाढतो तेव्हा एखाद्या महान पुरुषाचा जन्म होतोच होतो. म्हणजेच प्रत्येक युगात महान पुरुषांचा जन्म होतो.

**प्रश्नकर्ता :** असे म्हणतात की श्रीकृष्ण भगवंतानी रासलीला केली, त्याचे काय कारण आहे?

**दादाश्री :** भगवंत रासलीला खेळलेच नाहीत. तुम्हाला कोणी सांगितले की श्रीकृष्ण रासलीला खेळले होते? कृष्ण तर खूप मोठे योगेश्वर होते. लोकांनी त्यांना रासलीलेत आणून दुरुपयोग केला.

श्रीकृष्णांची दोन प्रकारे आराधना केली जाते. बालमंदिराच्या माणसांनी बाळकृष्णांचे दर्शन घ्यावे. आणि ज्यांना वैकुंठात जायचे असेल त्यांनी योगेश्वर श्रीकृष्णांचे दर्शन घ्यावे. या दोन प्रकारातील तुम्हाला काय हवे आहे?

**प्रश्नकर्ता :** भक्ती, ध्यान ह्या गोष्टी नशा आहेत का?

**दादाश्री :** हो.

**प्रश्नकर्ता :** मग नशेवाले जीवन जगणे चांगले की नैसर्गिक?

**दादाश्री :** नैसर्गिक जीवन जगणे हे तर खूपच चांगले. पण आता नैसर्गिक राहिलेच कुठे आहे? निसर्गाने तर सगळे खूप सुंदर केले आहे! नैसर्गिक असेल तरच प्रगती आहे, नाहीतर प्रगती नाही.

**प्रश्नकर्ता :** कुंडलिनीचे ध्यान करत आहोत, तर ते उघड्या डोळ्यांनी केलेले चांगले की डोळे मिटून केले तर चांगले?

**दादाश्री :** त्याचे असे आहे की तुम्ही उघड्या डोळ्यांनी करा किंवा बंद डोळ्यांनी करा, तरी ते बंधनच आहे. कुंडलिनीचे ध्यान करायचे नसते. ध्यान स्वतःच्या स्वरूपाचे करायचे आहे. कुंडलिनी हे तर त्यात एक साधन आहे. साधनाचा उपयोग करायचा आहे. स्वतःच्या स्वरूपाची रममाणता उत्पन्न झाली तर तीच मुक्ती आहे.

**प्रश्नकर्ता :** सांख्ययोग कोणत्या प्रकारे प्राप्त होतो?

**दादाश्री :** फक्त सांख्य म्हणजे एक पंख. एका पंखाने उडता येत नाही. म्हणून सांख्य आणि योग, अशा दोन पंखानी उडता येते! योगाशिवाय, मानसिक पूजेशिवाय पुढे कसे जाता येईल? मानसिक पूजा वगैरे सर्व व्यवस्था केलेली आहे, ती किती चांगली व्यवस्था आहे!

सांख्य म्हणजे ज्ञान जाणले पाहिजे. शरीराचे धर्म, मनाचे धर्म, बुद्धीचे धर्म, आत्म्याचे धर्म, हे सर्व जाणून घेतले पाहिजेत. यालाच सांख्य म्हणतात. आणि योगाशिवाय सांख्य प्राप्त करता येत नाही. म्हणून योग म्हणजे इथे ज्यांच्या आधारे तुम्ही प्रगती करू इच्छिता त्यांच्या (गुरु महाराजांच्या) मानसिक पूजेचा आधार घ्यावा लागतो, अवलंबन करावे लागते, तरच पुढे जाता येईल.

**प्रश्नकर्ता :** शिव यांची ओळख काय आहे? शिव कुठे असतात.

**दादाश्री :** जे कल्याण स्वरूप झाले आहेत, त्यांना शिव म्हणतात.

**प्रश्नकर्ता :** निर्विचार आणि निर्विकल्प, या दोघांत काय फरक आहे?

**दादाश्री :** खूप फरक आहे. निर्विचार म्हणजे विचाररहित अवस्था आणि निर्विकल्प म्हणजे विकल्परहित अवस्था. विचार संपले म्हणजे शून्य झाला. साधू विचारशून्य बनतात, काही माणसेसुद्धा असे बनतात. विचार करणे बंद करतात, मग विचारांकडे लक्ष देत नाहीत. म्हणून मग

दिवसेंदिवस विचारशून्य म्हणजे दगडासारखे बनतात. तसे वरून ते सुंदर दिसतात, शांतमूर्ती वाटतात, पण त्यांना आत काही ज्ञान नसते.

**प्रश्नकर्ता :** निर्विकल्पचा अर्थ काही जण निर्विचार असे सांगतात.

**दादाश्री :** 'ज्ञानी पुरुषां'खेरीज इतर कोणीच निर्विकल्प असू शकत नाही. निर्विचारी अनेक जण असू शकतात. विचारशून्यतेतून त्यांना परत विचारांची भूमिका उत्पन्न करावी लागेल. मन विचार करणे बंद करते तेव्हा सर्व काही 'स्टॅन्डस्टिल' (स्थिर) होऊन जाते (थांबते). म्हणून कृपाळूदेवांनी म्हटले आहे, *'कर विचार तो पाम'* (विचार कर तर प्राप्त होईल.) म्हणजेच शेवटपर्यंत विचारांची आवश्यकता आहे आणि 'प्राप्ती' झाल्यानंतर मग विचारांची गरज नाही. मग विचार ज्ञेय होतात आणि स्वत: ज्ञाता होतो.

**प्रश्नकर्ता :** याचा अर्थ महावीर स्वामींनी जेव्हा अंतिम देशना दिली तेव्हाही त्यांना विचार होतेच, असेच ना?

**दादाश्री :** महावीर भगवंतांनाही शेवटपर्यंत विचार होते. पण त्यांचे विचार कसे होते की प्रत्येक *समयी* एक विचार येत आणि जात. त्यालाही निर्विचार म्हणता येईल. आम्ही लग्न समारंभात उभे असू तेव्हा सर्व लोक 'नमस्कार' करायला येतात ना! 'नमस्कार' करून पुढे जातात. म्हणजेच एका कर्माचा उदय झाला, त्याचा विचार आला आणि ते कर्म संपले, मग दुसरे कर्म उदयास येते. याप्रकारे कर्माचा उदय आणि अस्त होत राहतो. कोणत्याच जागी थांबत नाही. त्यांच्या मनाच्या ग्रंथी सर्व संपलेल्या असतात. म्हणून त्यांना विचार त्रास देत नाहीत! आम्हाला पण विचार त्रास देत नाहीत.

विचार हा तर मनाचा धर्म आहे. एक विचार येतो आणि जातो पण अजिबात स्पर्श करत नाही, याला मनोलयच म्हणतात. मनात वादळे निर्माण होत नाहीत. 'मन' बागेसारखे वाटते, जणू उन्हाळ्यात कारंजी उडत आहेत असे वाटते आणि निर्विकल्प तर फारच उच्च पद आहे. कर्तेपणाचा भाव सुटला की निर्विकल्प झाला. देहाध्यास गेल्यानंतर निर्विकल्प पद प्राप्त होते.

**प्रश्नकर्ता :** समाधी आणि सुषुप्त अवस्था याबद्दल सांगा.

**दादाश्री :** सध्या आपल्या देशात सुषुप्त अवस्थेलाच समाधी म्हणतात. काही महात्मा मनाच्या थरांत खूप खोल उतरतात. काहीजण बुद्धीच्या थरांत खूप खोल उतरतात. तेव्हा त्यांना बाह्य जगाचे भान राहत नाही. याला लौकिक समाधी म्हणतात.

समाधी कशाला म्हणतात? अखंड जागृतीपूर्वक समाधी म्हणजे समाधी! शरीरावर धुळीचा एक कण जरी पडला तरी समजते, याला समाधी म्हणतात. आपल्याकडे लोक 'हॅन्डल' मारून समाधी करायला जातात. त्याला समाधी म्हणत नाहीत. ती 'कल्चर्ड' समाधी आहे. मला निरंतर खरी समाधी असते. आधी, व्याधी आणि उपाधीतही समाधी राहते, तीच खरी समाधी! आता मला तुरुंगात टाकण्यासाठी पकडून घेऊन गेले तरी माझी समाधी जाणार नाही! अशीच्या अशीच दशा राहील! इथे मी मुक्त आहे, त्यात पण समाधी आहे, आणि तिथे तुरुंगातही समाधी असेल.

**प्रश्नकर्ता :** ध्यान करताना प्रकाशाचा अनुभव येतो तो मानसिक असतो की खराच असतो?

**दादाश्री :** तो प्रकाश नसतोच. ती केवळ कल्पना आहे. या सर्व कल्पनांनाच सत्य मानले गेले आहे.

मी 17–18 वर्षांचा होतो तेव्हा डोळे दाबून मी एक प्रयोग केला होता. तेव्हा एक मोठा झगझगाट झाला आणि अगदी उजेड–उजेड दिसला! मी विचारांत पडलो की हे काय झाले! मग लक्षात आले की हा तर डोळ्यांचा प्रकाश गेला.

जे भौतिक आहे ते कधीच आत्मा होणार नाही, आणि जो आत्मा आहे तो कधीच भौतिक होणार नाही. दोनही गोष्टी निराळ्या आहेत.

**प्रश्नकर्ता :** निर्गुण म्हणजे काय?

**दादाश्री :** निर्गुण म्हणजे जिथे प्रकृतीचा एकही गुण राहिला

नाही आणि सगुण म्हणजे देहधारी स्वरूपात परमात्मा आले असतील तर ते सगुण परमात्मा.

**प्रश्नकर्ता :** मोक्षाचा रस्ता कोणता?

**दादाश्री :** तुम्ही बांधलेले आहात असे तुम्हाला वाटते का? जो तुरुंगात बंद असेल त्याला मुक्ती हवी असते.

**प्रश्नकर्ता :** बंधन तर आहेच ना?

**दादाश्री :** बंधनात काय काय वाटते?

**प्रश्नकर्ता :** आता तर हा संसार खूप गोड वाटत आहे.

**दादाश्री :** कडू वाटत नाही?

**प्रश्नकर्ता :** खोल गेले तर कडू वाटेल.

**दादाश्री :** इतका कडू आहे, तरी पण बघा या जीवांचा स्वभाव कसा आहे? तो मग आंबा कापून खातो आणि झोपून जातो! अरे, आता तर बायकोबरोबर भांडला होतास, मग काय पाहून आंबा खातोस? आधी भांडण होते आणि मग बायको आंबा कापून खायला देते, याला काय अर्थ आहे? भांडण होत असेल तर काय उपयोग? तुम्ही चालवून घेता की नाही घेत? मग जेव्हा तुम्ही भांडता, तेव्हा ती पण चालवून घेते. दुसरे काय करणार? दोघेही 'मॅजिस्ट्रेट'!

**प्रश्नकर्ता :** मानवी जीवनाचा मुख्य हेतू साध्य करण्याचा मार्ग कोणता?

**दादाश्री :** हा मनुष्य जन्म यासाठीच मिळाला आहे की इथून आपली मुक्ती होऊ शकते, भगवंतांची प्राप्ती होऊ शकते. मनुष्यगतीतूनच मुक्ती होऊ शकते. अनंत जन्म आपण प्रयत्न करत आहोत, परंतु खरा मार्ग मिळत नाही. खरा मार्ग मिळाला तर मनुष्यजन्मातून मुक्ती मिळेल असे आहे. दुसऱ्या कोणत्याही योनीतून मुक्ती मिळू शकत नाही. मनुष्यजन्मातच अज्ञानातून मुक्ती होऊ शकते, देहासहित मुक्ती होऊ शकते.

हा मनुष्यजन्माचा हेतू आहे, आणि तो साध्य करण्याचा मार्ग तर जर आपल्याला 'ज्ञानी पुरुषां'ची भेट झाली तरच मिळू शकतो. आणि मग आपले काम सर्व प्रकारे पूर्ण होऊ शकते.

## असंयोगी तोच मोक्ष

**प्रश्नकर्ता :** आम्हाला मोक्ष नको पण संयोगरहित व्हायचे आहे.

**दादाश्री :** जिथे संयोग असतील, तिथे वियोग असतीलच, तुम्ही कान सरळ न पकडता उलटे पकडत आहात.

आत्म्याबरोबर कुठलाही संयोग राहिला नाही म्हणजेच मोक्ष झाला. इथे तर स्थूल संयोग, सूक्ष्म संयोग आणि वाणीचे संयोग मिळतच राहतात, शिवाय हे सर्व संयोग वियोगी स्वभावाचे आहेत. वियोगी म्हणजे दुसरी कुठली वस्तू नाही. म्हणूनच तुम्हाला फक्त संयोगासाठीच काळजी करायची की मला कोणताही संयोग न मिळो! फक्त संयोग मिळाले नाहीत तरी खूप झाले. म्हणूनच भगवंतांनी म्हटले आहे की, *'एगो मे साशओ अप्पा...*

*तम्हा संजोग संबंधम्, सव्वम् तिविहेण वोसरियामि...'*

म्हणजे तुम्हाला तर सर्व संयोग अर्पण करायचे आहेत आणि तरी पण तुम्ही मला मोक्ष नको असे म्हणता!

**प्रश्नकर्ता :** धर्माबद्दल माणसाला आकर्षण होत नाही, तसे थोड्या वेळेपुरता आकर्षण होते आणि मग तो सोडून देतो, नंतर परत धर्माकडे वळतो, तर असे का?

**दादाश्री :** या जगात फक्त आकर्षणच नसते, आकर्षण आणि विकर्षण दोन्हीही असतात, ते द्वंद्वरूप आहे. हे जगच द्वंद्वरूप आहे. फक्त आकर्षण किंवा फक्त विकर्षण नसते, नाहीतर आकर्षण होणारच नाही आणि फक्त धर्माचेच आकर्षण असेल तर लोक कंटाळून जातील. कारण या जगात जे धर्म चालतात, ते यथार्थ धर्म नाहीत. ते फक्त भ्रांतिधर्मच आहेत.

**प्रश्नकर्ता :** पण या भ्रांतिधर्माची पण गरज आहे ना?

**दादाश्री :** हो, 'डेव्हलप' होण्यासाठी गरज आहे. कुटत कुटत पुढे जायचे आहे. जसा जसा कुटला जातो, दळला जातो तशी तशी त्याची बुद्धी वाढत जाते. आणि बुद्धी वाढते तसतसा मनस्ताप वाढत जातो, म्हणून मग माणूस स्व-धर्माचा आश्रय शोधतो.

## खरी सामायिक

**प्रश्नकर्ता :** दादा, शास्त्र वाचता वाचता थकायला होते, सामायिक करता करता थकायला होते, प्रतिक्रमण करताना, थकायला होते, पूजा करताना थकायला होते, जर असे थकायला होत असेल तर काय करावे?

**दादाश्री :** भगवंतांनी सामायिक कशाला म्हटले आहे? ज्याला आर्तध्यान आणि रौद्रध्यान होत नाहीत, त्याला संपूर्ण दिवस सामायिकच आहे, असे म्हटले आहे! पाहा तरी, महावीर भगवंत किती समंजस होते! त्यांनी तुम्हाला अजिबात कष्ट करायला सांगितलेले नाही. आणि या लोकांची एकही सामायिक भगवंत स्वीकारत नाहीत. आर्तध्यान आणि रौद्रध्यान एक गुंठाण्यासाठी, म्हणजेच 48 मिनिटांसाठी पूर्ण थांबायला हवे. 'मी चंदुभाई आहे' असे समजून सामायिक करतात. हे कडुनिंबाचे झाड कापले तरी पण पुन्हा उगवते ना! आणि परत ते कडूच राहते ना? का? कापून आतमध्ये साखर भरली तरी पण कडूच राहील?

**प्रश्नकर्ता :** हो, कारण मुळात ते तसेच आहे, दादा.

**दादाश्री :** मूळ स्वभावातच तसे आहे! तसेच जर हे 'चंदुलाल' सर्व राग-द्वेष बंद करून सामायिकसाठी बसतील, तर ते कसली सामायिक करतील? आत्म्याला जाणले नाही, मिथ्यात्व म्हणजे काय ते पण माहीत नाही! ज्याला मिथ्यात्व समजले असेल त्याला समकित झाल्याशिवाय राहणारच नाही. म्हणजेच सामायिक करण्यासाठी शेठ बसतात, पण त्यांना दुसरे काही येत नाही, मग ते काय करणार? स्वत:भोवती एक वर्तुळ काढतात आणि दुसरे कसले विचार आले, दुकानाचे, पैशांचे, विषयाचे, तर त्यांना त्या वर्तुळाच्या बाहेर हाकलत राहतात! जसे एखाद्या

आवारात गायीची वासरे घुसली, कुत्रे घुसले त्यांना आपण हाकलत राहतो आणि आत येऊ देत नाही, तसे ते करतात, त्यालाच ते सामायिक म्हणतात. तरी पण ती सामायिक होते, कारण त्यात त्यांना आर्तध्यान आणि रौद्रध्यान होत नाहीत.

**प्रश्नकर्ता :** आर्तध्यान आणि रौद्रध्यान त्यात होत नाही मग तर त्याला समताच म्हणावे लागेल ना?

**दादाश्री :** पण आर्तध्यान आणि रौद्रध्यान जात नाहीत ना? ते तर राहतातच. म्हणून सामायिक करण्यापूर्वी असा विधी करावा लागतो, 'हे भगवंत! हा चंदुलाल, माझे नाव, माझा हा देह, मी स्वत:, माझे मिथ्यात्व, सर्व काही तुम्हाला अर्पण करत आहे. आता मला ही सामायिक करत असताना वीतराग भाव द्यावा.' असे विधीपूर्वक केलेत तर काम होईल.

**प्रश्नकर्ता :** तीर्थंकर बनण्यासाठी या काळात कोणत्या गुणांची आवश्यकता आहे?

**दादाश्री :** निरंतर जगत् कल्याणाची भावना हवी, दुसरी कोणतीच भावना नसते. मग खायला काहीही मिळो, झोपायला काहीही मिळो, अगदी जमिनीवर झोपायला लागो, तरी पण निरंतर कसली भावना असते? तर जगाचे कल्याण कसे होईल? अशी भावना कोणाला उत्पन्न होते? तर ज्याचे स्वत:चे कल्याण झालेले आहे, त्यालाच अशी भावना उत्पन्न होते. ज्याचे स्वत:चेच कल्याण झालेले नाही तो जगाचे कल्याण कसे करणार? त्याने तशी भावना केली तर होईल. त्याला जर 'ज्ञानी पुरुष' भेटले तर ते त्याला त्या स्टेजवर पोहोचवतील आणि त्या स्टेजवर आल्यानंतर त्यांच्या आज्ञेत राहिला तर त्याला अशी भावना करता येईल.

**प्रश्नकर्ता :** नमस्कार आणि वंदन या दोन्ही गोष्टी सारख्याच आहेत की त्यात वेगळेवेगळे भाव आहेत?

**दादाश्री :** दोन्ही वेगवेगळ्या भावाने आहेत. नमस्कार हे तर फार उच्च कोटीचे आहे. असे नुसते डोके खाली करून उभ्या उभ्या हात

जोडतो त्याला वंदन म्हणतात आणि नमस्कारासाठी किती अंगांचा जमिनीला स्पर्श व्हावा लागतो. आपल्यात साष्टांग नमस्कार म्हणतात ना? म्हणजेच आठही अंगाचा जमिनीला स्पर्श होतो तेव्हाच त्याला नमस्कार म्हणतात. पण असा नमस्कार एकदाच जरी मन:पूर्वक केला तरी खूप झाले!

**प्रश्नकर्ता :** ज्ञान विकता येते का? काही जणांच्या प्रवचनाला तिकीट असते.

**दादाश्री :** जिथे पैशांची देवघेव आहे, तिथे ज्ञान नसतेच. ते संसारी ज्ञान असते, मोक्षाचे ज्ञान नसते.

**प्रश्नकर्ता :** जीवांचा असा काही क्रम आहे का की एकदा मनुष्यजन्माला आल्यानंतर पुन्हा मनुष्य जन्मच मिळेल, की मग दुसऱ्या गतीत जाईल?

**दादाश्री :** हिंदुस्तानात मनुष्यजन्मात आल्यावर चारही गतीत फिरावे लागते. फॉरेनच्या लोकांचे तसे नाही. तिथे 2-4 टक्के अपवाद सोडले तर बाकीचे सर्व वर चढतच राहतात. (उर्ध्वगतीत जातात).

**प्रश्नकर्ता :** हे लोक विधाता असे म्हणतात, तर ते कोणाला म्हणतात?

**दादाश्री :** ते निसर्गालाच विधाता म्हणतात. विधाता नावाचा कोणी देव नाही. 'सायंटिफिक सरकमस्टेन्शियल एविडेन्सेस्' (वैज्ञानिक संयोगिक पुरावे) म्हणजेच विधाता. आपल्या लोकांची अशी मान्यता आहे की जन्माच्या सहाव्या दिवशी विधाता लेख (भविष्य) लिहून जातो. विकल्पी दृष्टीने पाहिले तर हे सर्व बरोबर आहे, पण खरे जाणायचे असेल तर मात्र हे बरोबर नाही.

**प्रश्नकर्ता :** निर्दोष बाळाला शारीरिक यातना सहन कराव्या लागतात, त्याचे काय कारण?

**दादाश्री :** बाळाची उदय कर्मे बाळाला भोगावी लागतात आणि

'आई'ला ती पाहून भोगावी लागतात. मूळ कर्म बाळाचे, आणि त्याला आईचे अनुमोदन होते, म्हणून आईला पाहून भोगायला लागते. करणे, करविणे आणि अनुमोदन देणे ही तीनही कर्मबंधनाची कारणे आहेत.

**प्रश्नकर्ता :** स्वस्तिकचा अर्थ काय?

**दादाश्री :** 'स्वस्तिका'चा अर्थ काय? स्वस्तिक 'सिम्बोल' (चिन्ह) गतीसूचक आहे, त्याच्या चार भुजा चार गती दाखवितात आणि केंद्रस्थानी मोक्ष आहे. चार गतीतून शेवटी मोक्षालाच जावे लागते. चार गती म्हणजे मनुष्यगती, देवगती, तिर्यंचगती आणि नरकगती. या चारही गती पाप आणि पुण्याच्या आधारावर आहेत. आणि पाप–पुण्य रहित होऊन ज्ञान प्राप्त झाले तर मोक्षगती मिळते. तिथे 'क्रेडिट' पण नाही आणि 'डेबिट' पण नाही. इथे 'क्रेडिट' असेल तर देवगती मिळते किंवा तो पंतप्रधान बनतो. तुम्ही 'एस.ई.' बनलात ते पण 'क्रेडिट'मुळे. आणि 'डेबिट' असेल तर? गिरणीत नोकरी करावी लागेल! संपूर्ण दिवस कष्ट केले तरी पुरेसे पैसे मिळत नाहीत, आणि जर 'क्रेडिट–डेबिट' झाले नाही तर मोक्ष मिळतो.

## देवळांचे महत्त्व

**प्रश्नकर्ता :** जर देवळे नसती, जिनालये नसती तर मग ज्या प्रकारे आमच्यासाठी दादाजी प्रकट झाले, त्या प्रकारे त्यांच्यासाठी पण कोणी तरी प्रकट झालाच असता ना?

**दादाश्री :** ते बरोबर आहे. तो एक प्रकारचा विकल्प आहे. असे घडले आहे, आणि जर असे घडले नसते तर दुसरा काही तरी उपाय मिळाला असता. दुसरे काही ना काही मिळालेच असते. पण हा देवळांचा उपाय खूप चांगला आहे. हिंदुस्तानचे हे सर्वात मोठे 'सायन्स' आहे. ही सर्वात उत्तम परोक्ष भक्ती आहे, परंतु जर हे समजले तर! सध्या मी जिनालयात जातो तेव्हा मी महावीर भगवंतांना विचारतो की 'हे सर्व लोक तुमचे इतके दर्शन घेतात तरी पण त्यांना एवढ्या सर्व अडचणी का येतात?' तेव्हा महावीर भगवंत काय म्हणतात, 'हे लोक दर्शन

करताना माझा फोटो घेतात, त्याचबरोबर बाहेर ठेवलेल्या त्यांच्या चपलांचा पण फोटो घेतात, आणि सोबत दुकानाचा पण फोटो घेतात! म्हणून असे होत आहे. आता कोणी चपला चोरून नेईल, त्याचाही फोटो घेतात.'

## अंतिम समयी राम नाम

**प्रश्नकर्ता :** जन्म-मरणाचा फेरा टाळण्यासाठी माणसांना श्रीराम, श्रीकृष्ण अशी सर्व नावे सांगितली आहेत, पण अंतिम समयी यातील काहीच आठवत नाही. मग अंतिम समयी आत्म्यात राहण्यासाठी आणि मोक्षाला जाण्यासाठी काय करायला हवे?

**दादाश्री :** तुम्ही बरोबर बोलत आहात, अंतिम समयी यातील काहीच आठवत नाही. अंतिम समयी पूर्ण जीवनाचे सार आठवते. सारात तर सर्व काही रेखाटलेले असते. तुम्ही जर वारंवार देवळात जात असाल तर ते खाते थोडे मोठे असते. ते थोडे-फार हजर होते. नाहीतर मुली डोळ्यासमोर दिसतात, हिचे लग्न करायचे राहिले. तेव्हा मुले म्हणतात 'काका, नवकार मंत्र म्हणा.' तर काका म्हणतील, 'ह्याला अक्कलच नाही.' अरे, आता चालला आहेस, आता तरी सरळ हो ना! असे अक्कलेचे पोते, विकायला गेलो तर चार आणे पण मिळणार नाहीत! आता जाण्याची तयारी चालू आहे, तिरडी बांधण्याची तयारी चालू आहे, तेव्हा आता हा हिशोब करत बसला आहे! कसला माणूस आहेस रे तू?

म्हणजे शेवटच्या क्षणी जीवनाचा सारांश समोर येतो. यात दुसरे काही चालतच नाही, म्हणून प्रथम आत्म्याचे करून घ्या.

## दादा भगवान कोण?

**प्रश्नकर्ता :** 'दादा' भगवान म्हणजे कोण?

**दादाश्री :** हे जे दिसत आहेत ते 'दादा भगवान' नाहीत. तुम्हाला जे आठवतात ते खरे 'दादा भगवान' आहेत! हे जे दिसत आहेत ते 'ए. एम. पटेल' आहेत आणि आतमध्ये जे बसले आहेत, प्रकट परमात्मा स्वरूप, ते 'दादा भगवान' आहेत.

**प्रश्नकर्ता :** ते 'दादा भगवान' कधी हजर राहतात?

**दादाश्री :** निरंतर हजरच असतात. या सर्वांना निरंतर हजर असतात.

**प्रश्नकर्ता :** पण लोक आपश्रींना 'दादा भगवान' का म्हणतात?

**दादाश्री :** हे आपश्री तुम्ही कोणाला समजता? हे जे समोर दिसत आहेत त्यांना म्हणता का? तुम्ही तर त्यांनाच ओळखता ना? 'आपश्री' तुम्ही मला म्हणता ना? ते कोण आहेत? हे जे दिसतात ते तर भादरण गावचे पटेल आहेत आणि ते 'कॉन्ट्रक्ट'चा व्यवसाय करतात. आतमध्ये जे व्यक्त झाले आहेत, आत्मा व्यक्त झाला आहे, प्रकट झाला आहे, ते 'दादा भगवान' आहेत, त्यानांच संसारी लोक 'प्रकट पुरुष' म्हणतात.

**प्रश्नकर्ता :** माणूस कधीच ईश्वर किंवा परमात्मा होऊ शकत नाही, तरी पण काही लोक स्वत: ईश्वर किंवा परमात्मा असल्याचा दावा करतात, ईश्वरी चमत्कार असल्याचा दावा करतात, ते योग्य आहे का?

**दादाश्री :** तसा दावा करण्याची गरजच नाही. 'परमात्मा आहे' असा दावा कोणी करूच शकत नाही, आणि जर कोणी केला तर तो मूर्खच म्हटला जाईल.

लोक मला भगवान म्हणतात, पण ते भगवान कोणाला म्हणतात? या देहाला कधीच भगवान म्हणत नाहीत. हे तर पटेल आहेत. हे जे दिसतात ते 'दादा भगवान' नव्हे. 'दादा भगवान' तर आतमध्ये जे प्रकट झाले आहेत, ते आहेत, देहधारीला भगवान कसे म्हणता येईल?!

**प्रश्नकर्ता :** भगवान व्यक्तीच्या रूपात आहेत की शक्तीच्या रूपात?

**दादाश्री :** दोन्ही खरे आहेत, पण जे व्यक्तीच्या रूपात पुजतील त्यांना जास्त लाभ मिळेल. व्यक्तीच्या रूपात म्हणजे जिथे भगवान व्यक्त

झाले आहेत तिथे! फक्त मनुष्यातच भगवान व्यक्त होऊ शकतात, इतर कोणत्याही योनीत भगवान व्यक्त होऊ शकत नाहीत. आत्मा हाच परमात्मा आहे, पण व्यक्त झाला पाहिजे. व्यक्त झाला, खुलासे झाले की सर्व चिंता जातात, उपाधी जातात.

**प्रश्नकर्ता :** भगवान कुठे व्यक्त होतात?

**दादाश्री :** भगवान व्यक्त होतील असे नाहीत. ते अव्यक्त रूपात असतात!

**प्रश्नकर्ता :** तुमच्यासारख्यातच व्यक्त होतात, इतरांमध्ये व्यक्त होत नाहीत, म्हणूनच आम्ही इथे आलो आहोत.

**दादाश्री :** ते इतर कुठे नसतात, एखाद्याच्याच घरी पूर्ण प्रकाश होतो. मग त्या प्रकाशाद्वारे दुसरे सर्व दिवे प्रज्वलित होतात. एका दिव्यातून दुसरा दिवा प्रज्वलित होतो. परंतु अचानक दिवा मात्र क्वचितच प्रकट होतो! आमचा दिवा सूरत स्टेशनवर अचानक प्रज्वलित झाला होता!

**प्रश्नकर्ता :** तुमचा जो व्यवहार आहे, तो पण शुभ व्यवहारातूनच उत्पन्न होत आहे ना?

**दादाश्री :** जगात एक शुभ व्यवहार असतो आणि दुसरा अशुभ व्यवहार असतो. जगातील माणसे फक्त शुभ व्यवहारात राहू शकत नाहीत. ते शुभाशुभ दोन्ही व्यवहारात असतात! संत शुभ व्यवहारात असतात आणि जे चारही वेदांपलीकडे गेले आहेत, असे 'ज्ञानी पुरुष' शुभाशुभ व्यवहारांच्याही पलीकडे शुद्ध व्यवहारात असतात.

**प्रश्नकर्ता :** गुरु कोणाला म्हणतात?

**दादाश्री :** गुरुमध्ये चुका नसतात. परंतु अशा कोणत्या चुका असतात की ज्या चालवून घेता येतील? तर ज्या चुका दुसऱ्यांना नुकसानकारक नसतील त्या. त्यांना स्वत:लाच समजते की माझ्यात अजून ह्या चुका शिल्लक आहेत. म्हणजेच सूक्ष्मतर आणि सूक्ष्मतम चुका असतात. नाहीतर परमात्म्यात आणि त्यांच्यात फरकच काय राहिला?

'ज्ञानी पुरुष' स्वत: देहधारी रूपात परमात्माच आहेत. त्यांची एक पण स्थूल चूक नसते आणि एक पण सूक्ष्म चूक नसते.

जगाला दोन प्रकारच्या चुका समजतात : एक स्थूल आणि एक सूक्ष्म. स्थूल चुका तर सर्वसामान्य माणसांनाही समजतात आणि सूक्ष्म चुका बुद्धिमान माणसांना समजतात. 'ज्ञानी पुरुषा'त या दोन्ही चुका नसतात!

**प्रश्नकर्ता :** 'ज्ञानी पुरुष' कोणत्या पुण्याच्या आधाराने भेटतात?

**दादाश्री :** पुण्यानुंबधी पुण्याच्या आधारावर! तुम्हाला आसपास जे पुण्य दिसत आहे ते पापानुबंधी पुण्य आहे. पापानुबंधी पुण्य म्हणजे बंगला, गाडी, घरातील सर्व सुखसोयी, हे सर्व पुण्याच्या आधारावर मिळत असते, पण त्या पुण्यातून विचार मात्र वाईट येतात. कोणाचे हिसकावून घेऊ, कोणाचे लुटून घेऊ, कसे गोळा करू, कोणाचे उपभोगू! तो बिन हक्काचे भोगायला तयारच असतो. बिन हक्काची लक्ष्मी सुद्धा हिसकावून घेतो, याला पापानुबंधी पुण्य म्हणतात. पुण्याच्या आधारावर सुखे भोगतात पण नवीन अनुबंध मात्र पापाचे होतात.

आणि ज्या पुण्याने फारशी सुख-सुविधा नसते पण विचार मात्र उत्तम येतात, कोणालाही दु:ख होणार नाही असे मी वागावे, मला अडचण झाली तरी चालेल, पण माझ्यामुळे कोणाला अडचण होता कामा नये, अशा पुण्याला पुण्यानुबंधी पुण्य म्हणतात. म्हणजेच नवीन अनुबंधसुद्धा पुण्याचेच होतात.

**प्रश्नकर्ता :** मला तुमच्याकडून 'ज्ञान' घ्यायचे आहे. पण आम्ही अगोदरच दुसऱ्यांना गुरु केले आहे, तर त्यामुळे काही अडचण येणार नाही ना?

**दादाश्री :** नाही, तुमचे गुरु राहू द्यात, गुरुशिवाय कसे चालेल? ते गुरु आपल्याला सांसारिक धर्म शिकवतात. 'कोणत्या चांगल्या गोष्टी करायच्या आणि कोणत्या वाईट गोष्टी सोडायच्या' अशा सर्व गोष्टी ते आपल्याला शिकवतात. पण संसार तर चालूच राहील ना? आणि

आपल्याला तर मोक्षाला जायचे आहे. त्यासाठी वेगळे 'ज्ञानी पुरुष' हवेत. 'ज्ञानी पुरुषां'ना भगवानपक्षी म्हणतात. व्यवहारात ते गुरु आणि निश्चयात हे ज्ञानी! दोन्ही असतील तर काम होईल. म्हणून तुमचे जे गुरु आहेत त्यांना असू द्या. तिथे पण दर्शन घ्यायला जात जा.

**प्रश्नकर्ता :** हे सत्पुरुष तर सगळ्यांना एकसारखाच पाऊस देतात परंतु जर माझे कडुनिंब असेल आणि त्याचा आंबा असेल तर बीमुळे फरक पडेल ना? मग सगळ्यांवर एकसारखा परिणाम कसा होईल?

**दादाश्री :** आपल्याकडे बी ची काही समस्या नाही. इथे तर तुम्ही मला विनयपूर्वक म्हणायचे की, 'साहेब माझे कल्याण करा.' इथे परम विनयाद्वारे मोक्ष आहे.

हे पाचव्या आऱ्यातील सडलेले पुद्गल आहे. ते कधी दुरुस्त होणार नाही. इथून दुरुस्त केलेत तर तिथून तुटेल आणि तिथून दुरुस्त केलेत तर इथून तुटेल. याऐवजी 'अक्रम विज्ञान' आतून शुद्ध करते आणि तुम्हाला वेगळे ठेवते!

**प्रश्नकर्ता :** 'दादा' मला ज्ञान देतील पण माझ्यात समजण्याची शक्ती नसेल तर मी काय करू?

**दादाश्री :** आतमध्ये आत्मा आहे, आणि तुम्ही जिवंत आहात, म्हणून सगळे होईल. तुमच्याकडे समजण्याची शक्ती आहे की नाही असे जर मी पास करायला बसलो तर कोणीच पास होणार नाही. म्हणून मी सुरुवातीला ऋषभदेव भगवंतांच्या मूर्तीबरोबर संवाद करून त्यांना विचारले होते की हे अक्रम विज्ञान द्यायचे असेल तर कोणाला देऊ? पास होण्यासाठी 33 टक्के मार्कस् हवेत आणि इथे तर 3 टक्केच्या वर कोणीच येत नाही. तेव्हा भगवंत म्हणाले की तीन टक्केवाल्यांना द्या. त्यानंतर (त्याहीपेक्षा कमी) पार वेल्युवाले म्हणजे शून्य मार्कस्वाल्यांना देऊ लागले. आणि आता तर मायनस मार्कस्वाल्यांना पण हे ज्ञान दिले जात आहे.

**प्रश्नकर्ता :** आठवण केली की लगेच आम्हाला दादा भगवान

यांचे दर्शन होते आणि ते रस्ता दाखवतात, हे कोणत्या वैज्ञानिक प्रक्रियेमुळे होते?

**दादाश्री :** हे सर्व स्वभावानेच आहे! यात शुद्ध चेतन 'सायलेन्ट' असते. हा 'प्रकाश' 'सायलेन्ट' आहे. 'प्रकाशा'च्या आधाराने सर्व क्रिया केल्या जातात की नाही? 'प्रकाशा'चा फायदा मिळतो.

**प्रश्नकर्ता :** आठवण करताच 'दादा भगवान' हजर होतात. ही क्रिया शुद्ध चेतनाच्या आधाराने होणारी बाह्य क्रिया आहे का?

**दादाश्री :** आधाराने नाही. ती तर स्वाभाविक क्रिया आहे. आत सूक्ष्म शरीराचे आकर्षण होणे, ही स्वाभाविक क्रिया आहे.

**प्रश्नकर्ता :** पण ती 'पुद्गलाच्या' भागात होते ना?

**दादाश्री :** ते सर्व पुद्गलच आहे. जग त्याला चेतन मानते, पण प्रत्यक्षात तिथे चेतन नसतेच. चेतनापर्यंत कोणी पोहोचलेलाच नाही! चेतनाच्या सावलीपर्यंत पण कोणी पोहोचला नाही!

**प्रश्नकर्ता :** ज्ञानी आणि ज्ञान-अवतार या दोघांत काय फरक आहे?

**दादाश्री :** त्यांच्यात खास काही फरक नसतो. पण ज्ञानी तर सगळ्यांनाच, म्हणजे शास्त्रांचे ज्ञान असणाऱ्यांना सुद्धा आपण ज्ञानीच म्हणतो ना? मग ते कुठलेही शास्त्र असो. कुराणाचे ज्ञान असणाऱ्यांना पण आपण ज्ञानी म्हणतो. म्हणूनच ज्ञान-अवतार असे म्हटले आहे. दुसऱ्या कोणाकडून ज्ञान-अवतार असे लिहिले जाऊ शकत नाही, फक्त एक ज्ञानीच लिहू शकतात, एवढा फरक आहे.

**प्रश्नकर्ता :** कृपाळूदेवांना ज्ञान-अवतार म्हणता येईल ना?

**दादाश्री :** हो, ते तर ज्ञान-अवतार आहेत.

**प्रश्नकर्ता :** आत्मज्ञानी आणि केवळज्ञानी यात काय फरक आहे?

**दादाश्री :** काहीच फरक नाही. आत्मा 'केवळज्ञान-स्वरूप' आहे,

पण सत्तेच्या कारणामुळे फरक आहे. सत्ता म्हणजेच आवरणाच्या कारणामुळे केवळज्ञान दिसत नाही. बाहेरचे दिसते. सत्ता तर तीच असते. पण जसे एखाद्याला दीड नंबरचा चष्मा असतो आणि एखाद्याला चष्मा नसतो, यामुळे फरक पडतो ना? तसा फरक असतो.

**प्रश्नकर्ता :** आपल्या शासन काळात 'युग पुरुष' प्रकट होतील का?

**दादाश्री :** होतील ना! ते जर प्रकट झाले नाहीत तर जग कसे चालेल? निसर्गालाच गरज आहे, आपल्याला गरज ठेवण्याची गरजच नाही. जन्मपत्रिका बघण्याची पण गरज नाही. ते तर निसर्गाच्या नियमानुसारच होईल. तुम्ही मात्र तुमची तयारी ठेवा, गाशा गुंडाळून वाट पाहा की कधी गाडी येईल आणि आपण बसू, अशी तयारी ठेवा.

**प्रश्नकर्ता :** गाडी बरोबर आली आहे की चुकीची, ते कसे कळणार?

**दादाश्री :** अशी शंका असेल तर घरी चालू लागायचे. भगवंतांकडे शंकेखोरांना स्थानच नाही. या गाड्या बरोबर की चुकीच्या असे करायचे नसते. समजण्यात चूक का बरोबर ते पाहायचे असते.

**प्रश्नकर्ता :** भक्त आणि ज्ञानी या दोघांत फरक आहे का?

**दादाश्री :** हो, सेव्य आणि सेवक इतका फरक आहे. भक्त सेवक आहे, तो नंतर सेव्य होईल. ज्ञानी सेव्य आहेत आणि भक्त सेवक आहे. सेव्यचे सेवन केल्याने सेव्य बनत जातात आणि रूप तर एकच आहे. पण अवस्थांमुळे ते बदलते. ज्यांनी आत्मा प्राप्त केला आहे त्या सर्वांना ज्ञानी म्हणतात. पण सर्वच जण 'स्वत:ला' ज्ञानी म्हणू लागले तर काय उत्तर द्याल? म्हणजेच ज्ञानींना श्रुतज्ञानही असायला हवे. वीतराग भगवंतांचे पूर्ण श्रुतज्ञान, त्याचप्रकारे वेदांतमार्गाचे सर्व श्रुतज्ञान असेल तरच त्यांना ज्ञानी म्हणता येईल. असेच कोणालाही ज्ञानी म्हणत नाहीत!

**प्रश्नकर्ता :** आशीर्वाद मागितला आणि जर तो दिला, तर तो फलित होतो का?

**दादाश्री :** हो, पण नेहमीच सर्व फलित होत नाहीत. त्यात आपले वचनबळ पण हवे, तरच ते फलित होईल. तरी पण आपण आशीर्वाद तर द्यायला हवा. बाकी, कोणी दिल्यामुळे तर होत नसते, खरे तर ज्याचे काम होणार असते, त्याच्यासाठी ते निमित्त बनते. ज्यांचे यशनामकर्म असते, ते निमित्त बनतात. मग ते आशीर्वादाची दुकाने उघडतात. स्वत:कडे तर संडासाला जाण्याचीही शक्ती नाही, मग तो काय आशीर्वाद देणार? ते तर यशनामकर्म असते त्यामुळे होते, थोर माणसांचे यशनामकर्म खूप चांगले असते.

जगत् कल्याणाची भावना पुष्कळ काळापासून, पुष्कळ जन्मांपासून केलेली असते अशा लोकांचे यशनामकर्म खूप मोठे असते. यशनामकर्म तर जगत्कल्याणाच्या भावनेतूनच उत्पन्न होते. जगातील लोक सुखी व्हावेत ही भावना ज्या प्रमाणात असते, त्यातून यशनामकर्म बांधले जाते. आणि जर जगाला दु:ख दिले तर अपयशनाम कर्म बांधले जाते. अपयशनामकर्मवाल्याने कितीही काम केले तरी त्याला अपयशच मिळते! इथे बरेच लोक मला म्हणतात की 'मी खूप काम केले तरी पण मला अपयशच मिळते.' 'अरे बाबा, तू अपयश घेऊनच आला आहेस, म्हणून अपयशच मिळेल. तू तर तुझे काम करायचे आणि अपयश मिळवायचे.'

**प्रश्नकर्ता :** तुम्ही विधी करविता. तर त्यासाठी स्थान म्हणून अंगठ्यालाच एवढे महत्त्व का देता?

**दादाश्री :** ज्या मार्गाने भगवंतांशी लवकर तार जोडली जाते त्या जागी विधी करवितो. दुसऱ्या जागी केला तर विधी उशीरा पोहोचेल. आपल्याला आपला संदेश लवकर पोहोचवायचा आहे ना, म्हणून. तुला आवडले नाही का?

**प्रश्नकर्ता :** 'क्विक सर्विस' तर सगळ्यांनाच आवडते.

**दादाश्री :** म्हणजे हे लोक म्हणतात ना, की अमृत पाझरते, तर तसे अमृत पाझरते असे वाटते का? तुला थोडाफार अनुभव आला आहे का?

**प्रश्नकर्ता :** हो.

**दादाश्री :** मग ठीक आहे. आपल्यासाठी तर ज्या काही मार्गाने, पण अमृत पाझरते तेच उत्तम!

**प्रश्नकर्ता :** 'सर्वज्ञ' कोणाला म्हणतात?

**दादाश्री :** या कविराजांनी माझ्यासाठी 'सर्वज्ञ' शब्द वापरला आहे. वास्तवात तर हे कारणसर्वज्ञ आहेत. 360 डिग्रीचे असतात त्यांनाच सर्वज्ञ म्हणतात. आम्ही तर 356 डिग्रीचे आहोत आणि आम्ही सर्वज्ञ होण्याच्या कारणांचे सेवन करत आहोत.

स्वत: एक समय पण पर-समयात जात नाहीत. निरंतर स्व-समयात राहतात, ते सर्वज्ञ! आम्ही संपूर्ण अभ्यंतर निर्ग्रंथ आहोत. आम्हाला ज्या वेषात 'ज्ञान' झाले होते त्या वेषात परिवर्तन होणार नाही. आम्हाला तर हे कपडे काढले तरी हरकत नाही आणि ठेवले तरी हरकत नाही. आम्हाला लुटले तरी हरकत नाही.

**प्रश्नकर्ता :** तुमच्यात किती कर्मांचा अभाव आहे?

**दादाश्री :** आमच्यात सर्व कर्मांचा अभाव आहे. फक्त ह्या देहाच्या पोषणासाठी आवश्यक असेल तेवढीच कर्मे असतात. ती कर्मे पण संवरपूर्वक निर्जराच्या रूपात असतात. आम्हाला दुसरा कोणताच विचार येत नाही.

**प्रश्नकर्ता :** म्हणजे तुम्हाला अनंत ज्ञान, अनंत दर्शन प्रकट झाले आहे?

**दादाश्री :** सर्व काही प्रकट झाले आहे. फक्त चार डिग्रीचीच उणीव आहे. जेवढे केवळज्ञानींना ज्ञानात दिसते, तेवढे आमच्या समजमध्ये आलेले असते. त्यांचे केवळज्ञान म्हटले जाते आणि आमचे केवळदर्शन म्हटले जाते. म्हणून तर आम्ही सांगतो की पूर्ण जगाविषयीचे प्रश्न इथे विचारले जाऊ शकतात!

**प्रश्नकर्ता :** 'केवळज्ञाना'शिवाय केवळदर्शन होऊ शकते?

**दादाश्री :** क्रमिक मार्गात 'केवळज्ञाना'शिवाय 'केवळदर्शन' होऊ शकत नाही. 'अक्रम मार्गात' 'केवळदर्शन' होते. मग 'केवळज्ञान' होईपर्यंत काही काळ लागतो. हे सर्व बुद्धीचे विषय नाहीत, हा ज्ञानाचा विषय आहे.

**प्रश्नकर्ता :** तुम्ही साक्षात्कारी पुरुष आहात, तर तुम्ही देवळात जाता त्यामुळे देवळात जाण्याची प्रतिष्ठा उत्पन्न होत नाही का?

**दादाश्री :** आम्ही जिथे जातो, तिथे सर्व जागी दर्शन घेण्यासाठी जातो. जिनालयात, महादेवाच्या देवळात, माताजींच्या मंदिरात, मशिदीत, सर्व ठिकाणी दर्शन घ्यायला जातो. आम्ही गेलो नाही तर लोक पण जाणार नाहीत. त्यामुळे चुकीची प्रथा पडेल. आमच्यामुळे चुकीच्या प्रथा पडू नये अशी जबाबदारी आमच्यावर असते. आमचे उपाय लोकांना कशा प्रकारे सुख मिळेल, कशा प्रकारे शांती लाभेल असे असतात.

हे अक्रम विज्ञान इतके अधिक फलदायी आहे की एक मिनिट पण वेळ का घालवावा? असा योग पुन्हा कुठल्याही जन्मात मिळणार नाही. म्हणून या जन्मी काम पूर्ण करून घ्यायचे आहे.

**प्रश्नकर्ता :** दादा, काम पूर्ण करून घ्या, असे सांगितले, तर ते कशा प्रकारे?

**दादाश्री :** आम्ही जोपर्यंत इथे आहोत, तोपर्यंत इतर ठिकाणी वेळ वाया दवडू नये. आम्ही इथून बडोद्याला गेलो तर ज्यांना तसे अनुकूल संयोग असतील आणि पैसे असतील त्यांनी तिथे बडोद्याला यावे. जितके जमेल तितका जास्त वेळ आमच्याबरोबर घालवावा. फक्त आमच्या सत्संगात येऊन बसावे. बाकी काहीही करायची गरज नाही.

**प्रश्नकर्ता :** तुमची ओळख सांगता का?

**दादाश्री :** तुम्ही 'मला' ओळखू शकणार नाही. तुम्ही ज्यांना पाहता ते तर अंबालाल पटेल आहेत- भादरण गावचे! 'मला' तर तुम्ही ओळखू शकणार नाही ना! कारण अशा प्रकारे दिसेन असा 'मी' नाहीच.

हा जो बोलत आहे, तो म्हणजे 'ओरिजिनल टेपरेकॉर्डर' आहे. तुमचा पण 'ओरिजिनल टेपरकॉर्डर' आहे. पण तुम्हाला अहंकार आहे, म्हणून 'मी बोललो, मी बोललो' असे तुम्ही म्हणता. आम्हाला अहंकार नाही म्हणून आम्हाला अशी काही भानगड नसते. हे जे दिसतात ते भादरणचे पटेल आहेत आणि आतमध्ये 'दादा भगवान' बसले आहेत! इथे ते व्यक्त झालेले आहेत आणि तुमच्यात ते अव्यक्त रूपात आहेत. तर ह्या व्यक्त झालेल्यांजवळ विनयपूर्वक बसल्याने तुमचे पण व्यक्त होत जातील. हा परम विनयाचा मार्ग आहे. इथे पैशांची गरज नाही. इथे सेवेचीही गरज नाही. इथे कोणत्याच गोष्टीची गरज नाही. इथे द्रव्यपूजा होत नाही. हा तर मोक्षाचा मार्ग आहे.

आमच्याबरोबर तुम्ही अविनय केलात तर आमची काहीच हरकत नाही, परंतु त्यामुळे तुम्ही स्वत:वर अंतराय आणीत आहात. तुम्ही आम्हाला शिव्या दिल्यात, तर ते तुम्ही स्वत:चेच नुकसान करत आहात. इथे तर खूप विनय हवा! परम विनय हवा! इथे एक शब्द देखील उलटसुलट बोलता कामा नये. जेव्हा तुम्ही मामलेदाराकडे जाता तेव्हा तर अगदी चूप बसता, एक अक्षरसुद्धा बोलत नाही! आणि हे तर ज्ञानी पुरुष! त्यांच्यासमोर बोलायचे असते का? ज्ञानी पुरुषांना तर देहधारी परमात्मा म्हणतात! त्यांच्याकडून सर्व काही प्राप्त होऊ शकते!

## स्वत: स्वत:चीच भक्ती

**प्रश्नकर्ता :** आम्ही बोलाविले नाही, तरी वस्तू आपोआप येतात. या झोपेला आणावे लागते का? ती आपोआपच येते. तसे हे ज्ञान पण आपोआपच येईल का?

**दादाश्री :** या सर्व 'रिलेटिव्ह' वस्तू आमंत्रण देण्यायोग्य नाहीत. आमंत्रण देण्यासारख्या गोष्टी कोणत्या? तर आपल्याला ज्या गावी जायचे आहे, त्याचे ज्ञान जाणण्यायोग्य आहे. बाकी सर्व तर आपोआप येईल.

आज धर्मात जे सर्व पुरुषार्थ चालू आहेत, त्यात तर ते सर्व शेती करतात, बी पेरतात, त्याचे त्यांना पाचशे पट मिळत राहते.

**प्रश्नकर्ता :** आपल्या या मार्गात पण थोडी शेती आहेच ना? आपल्यात पण आरती करतात ना?

**दादाश्री :** आपल्याकडे काय शेती असेल? खुद खुदा झाला ना! आपल्याकडे जी आरती आहे ती स्वत:ची आरती आहे, इथे प्रत्येक व्यक्ती स्वत:चीच आरती करत असतो. आपल्याकडे जी भक्तीपदे गायली जातात ती स्वत:चीच कीर्तनभक्ती आहे! आपल्याकडे स्वत: शिवाय इतर 'रिलेटिव्ह' गोष्टी नाहीतच.

**प्रश्नकर्ता :** स्वत:ची कीर्तनभक्ती करणारा कोण?

**दादाश्री :** स्वत:, स्वत:च.

**प्रश्नकर्ता :** तो कोणता भाग आहे?

**दादाश्री :** ती प्रज्ञाशक्ती आहे, तीच काम करत आहे.

**प्रश्नकर्ता :** अज्ञा नाही ना?

**दादाश्री :** नाही, अज्ञा तर राहणारच नाही. अज्ञा असेल तर तिथे संसार उत्पन्न होईल. संसाराच्या बाबतीत सल्ला देते ती अज्ञाशक्ती.

इथे आपण स्वत:चीच कीर्तनभक्ती करत आहोत, हे ज्याला माहीत नसेल त्याला तर नुकसानच होईल ना? पण हे समजल्यानंतर तुम्ही नुकसान होऊ देणार नाही! इथे जी भक्ती करतात, ती माझ्यासाठी, 'ए. एम. पटेल' साठी नाही तर 'दादा भगवान' यांच्यासाठी आहे. आणि 'दादा' तर सगळ्यांच्यात बसलेले आहेत, फक्त माझ्यातच बसलेले आहेत असे नाही तर ते तुमच्यातही बसलेले आहेत, आणि ही त्यांचीच भक्ती आहे! ही आरती वगैरे सर्व त्यांचीच आहे, म्हणूनच इथे सर्वांना आनंद वाटतो, तुमच्याबरोबर मी पण आत बसलेल्या 'दादांना' नमस्कार करत असतो.

**प्रश्नकर्ता :** त्या वेळी सगळ्यांना आनंद वाटतो, त्याचे कारण काय?

**दादाश्री :** कारण हे 'दादा' जर देहधारी रूपात असते तर लोकांना वाटले असते, की हे स्वत: आपलेच गाणे गात बसतात. पण प्रत्यक्षात ते तसे नाही. श्रीकृष्णांनी पण गीतेत याच तऱ्हेने गायले आहे! पण लोकांना ते समजत नाही ना! 'तू'च श्रीकृष्ण आहेस, परंतु जोपर्यंत स्वरूपाचे भान झालेले नाही, तोपर्यंत हे कसे समजणार?

ऐकणारा पण स्वत:चाच सत्संग करीत आहे आणि बोलणारा पण स्वत:चाच सत्संग करत आहे. हे विज्ञान अशा प्रकारचे आहे की कोणाला दुसऱ्यासाठी करण्याची गरज नाही. स्वत: स्वत:साठीच करत आहेत.

तुम्हाला जे दिसतात ते 'दादा भगवान' आहेत का? नाही, ते दादा भगवान नाहीत, ते तर 'ए. एम. पटेल' आहेत, भादरण गावचे आहेत. 'दादा भगवान' तर आतमध्ये प्रकट झाले आहेत, ते आहेत!

त्यांचे स्वरूप काय आहे? ज्ञान, दर्शन, चारित्र्य आणि तप हे त्यांचे स्वरूप आहे! ज्ञान, दर्शन, चारित्र्य आणि तप यांच्या आधारावर जे अनुभवास येते ते 'दादा भगवान' आहेत.

नाहीतर हे ए. एम पटेल आहेत. हा बुडबुडा जेव्हा फुटेल तेव्हा लोक त्याला जाळतील आणि 'दादा भगवानां'ना कोणी जाळू शकत नाही. कारण अग्नि तर स्थूल स्वरूप आहे आणि आत्मा सूक्ष्म आहे. स्थूल सूक्ष्माला कसे जाळू शकेल? तसेच ज्ञान, दर्शन, चारित्र्य आणि तप या स्वरूपात असलेले 'दादा भगवान' तुमच्या आत पण विराजमान आहेत! ते तुम्ही स्वत:च आहात!

**– जय सच्चिदानंद**

# मूळ गुजराती शब्दांचे समानार्थी शब्द

*अशाता* : दुःख परिणाम

*आरा* : कालचक्राचा बारावा भाग

*उपरी* : मालक, वरिष्ठ

*गलन* : डिस्चार्ज होणे, रिकामे होणे

*निकाल* : निपटारा

*निर्जरा* : आत्मप्रदेशातून कर्मे वेगळी होणे

*पुद्‌गल* : ज्याची निर्मिती आणि नाश होतो, ते

*पूरण* : चार्ज होणे, भरले जाणे

*वळगण* : (बंधन, भूतावेश, बला)

*शाता* : सुख परिणाम

*संवर* : शुद्ध उपयोगपूर्वक कर्मांची निर्जरा, ज्यामुळे नवीन कर्मे चार्ज होत नाहीत

नोंद : अत्यंत राग किंवा द्वेष यासह खूप काळ लक्षात ठेवणे, नोट करणे

# संपर्क सूत्र

## दादा भगवान परिवार

**अडालज** : **त्रिमंदिर**, सीमंधर सिटी, अहमदाबाद-कलोल हाईवे,
पोस्ट : अडालज, जि.-गांधीनगर, गुजरात - 382421
**फोन** : 9328661166, 9328661177
E-mail : info@dadabhagwan.org

**मुंबई** : **त्रिमंदिर,** ऋषिवन, काजुपाडा, बोरिवली (E)
फोन : 9323528901

| | | | |
|---|---|---|---|
| **दिल्ली** | 9810098564 | **बेंगलूर** | 9590979099 |
| **कोलकता** | 9830093230 | **हैदराबाद** | 9885058771 |
| **चेन्नई** | 7200740000 | **पूणे** | 7218473468 |
| **जयपुर** | 8890357990 | **जलंधर** | 9814063043 |
| **भोपाल** | 6354602399 | **चंडीगढ** | 9780732237 |
| **इन्दौर** | 6354602400 | **कानपुर** | 9452525981 |
| **रायपुर** | 9329644433 | **सांगली** | 9423870798 |
| **पटना** | 7352723132 | **भुवनेश्वर** | 8763073111 |
| **अमरावती** | 9422915064 | **वाराणसी** | 9795228541 |

**U.S.A.** : **DBVI Tel. :** +1 877-505-DADA (3232),
**Email :** info@us.dadabhagwan.org

**U.K.** : +44 330-111-DADA (3232)

**Kenya** : +254 795-92-DADA (3232)

**UAE** : +971 557316937

**Dubai** : +971 501364530

**Australia** : +61 402179706

**New Zealand** : +64 21 0376434

**Singapore** : +65 91457800

**www.dadabhagwan.org**

## आप्तवाणी, सर्व धर्मांचे सार!

आप्तवाणीची ख्याती दिवसेंदिवस खूपच वाढेल. साऱ्या जगातील खुलासे यातून मिळतील. सर्वच धर्म यातून प्राप्ती करतील, म्हणजेच ह्या आप्तवाणींमधून हेच लोक तत्त्व काढून घेतील, याचीच गरज आहे.

आप्तवाणी वाचून तर अनेक लोक म्हणतात की आता आम्हाला आणखी कोणती धार्मिक पुस्तके वाचण्याची गरज उरणार नाही. म्हणजेच ह्या आप्तवाणींनीच सर्व काही चालेल. आपली ही पुस्तके लोकांना खूप मदत करतील.

म्हणूनच मी सर्वांना सांगितले आहे की ही पुस्तके छापून घ्या. एकदा छापली गेली ना, तर आता यावरून लोक आणखी छापतील. पण आता हे हरवणार नाही. ह्या गोष्टी आता हरवणार नाहीत.

– दादाश्री

आत्मविज्ञानी 'ए.एम.पटेल' यांच्या आत प्रकट झालेल्या

# दादा भगवानना
# असीम जय जयकार हो

dadabhagwan.org

ISBN 978-93-91375-35-5
9 789391 375355
Printed in India
Price ₹100